# प्रस्तावना



नवयुग विद्यार्थीधर्म हें पुस्तक आज विद्यार्थ्यांच्या हातीं देण्याचा योग येत आहे, याबद्दल संतोष वाटतो. विद्यार्थ्यांच्या उपयोगाकरितां त्यांच्या जीवनक्रमाचा सांगोपांग विचार करून लिहिलेली पुस्तकें मराठी भाषेंत फार थोडींच आढळतात. आपटेशास्त्रीकृत सद्वर्तन या नावाचें एक लोकप्रिय पुस्तक एके काळीं होतें. त्यानंतर अलीकडे किरकोळ गोष्टींची व बक्षिसें देण्याजोगीं पुस्तकें बरींच निघालीं आहेत. त्या सर्वांत कै. वा. हरी नारायण आपटे यांचें 'मुलांना थोडा उपदेश' हें पुस्तक बरें आहे. पण या पुस्तकांत त्याच त्याच विषयांची पुनरुक्ति, व पाल्हाळ बराच आहे. मगरण हरीभाऊंनी वेळोवेळीं जी व्याख्यानें दिलीं त्यांचा संग्रहच पुस्तकरूपानें बाहेर काढलेला आहे. प्रस्तुत लेखकाचें विद्यार्थीधर्म हें दहा वर्षांपूर्वी प्रसिद्ध झालेलें पुस्तक सनातनी छापाचें झालेलें आहे. त्या पुस्तकावर जुनें समर्थ विद्यालय व प्राज्ञपाठशाळा यांची छाप पडली असल्यामुळे त्यातील विचार नवयुगांतील विद्यार्थ्यांच्या दृष्टीनें एकांगीच वाटतात. एतावता आजच्या विद्यार्थ्यांच्या हातांत देण्याजोगें त्यांच्या जीवनावर प्रकाश पाडणारें असें सूचनात्मक व चर्चात्मक पुस्तक मराठी भाषेंत नाही, ही गोष्ट सत्य आहे. इंग्रजी भाषेंतील Tod's student's manual आणि Smile's character ही पुस्तकें एका काळीं फार लोकप्रिय होतीं पण आतां तीं जुनीं झालीं. अलीकडे प्रसिद्ध झालेलीं Lord Cheterfield's advice to his son आणि What a young man ought to Know ही पुस्तकें चांगली आहेत. पण तीं तिकडील विद्यार्थ्यांनाच अधिक उपयोगी आहेत. आपल्या सामाजिक जीवनाचा अभ्यास करून विद्यार्थ्यांकरिता लिहिलेलींच पुस्तकें इकडे पाहिजेत.

अशा तऱ्हेच्या पुस्तकाची वाण भरून काढावी म्हणून हें पुस्तक लिहिण्याचे विचार गेलीं कांहीं वर्षें घोळत होते. गेल्या जुलैपासून या विचाराला जास्त जोरानें गति मिळाली. हल्लींच्या विद्यार्थ्यांशीं लेखकाचा साक्षात् संबंध नाहीं, म्हणून शेंकडों शिक्षकांशीं, अनेक पालकांशीं व अनेक संस्थांशीं

लेखकाने विद्यार्थ्यांच्या जीवनाबद्दल चर्चा केली. रॉबर्टसन हायस्कूल बऱ्हाणपूर, मोसायटीज् हायस्कूल बऱ्हाणपूर, गव्हर्मेंट हायस्कूल भुसावळ, न्यू इंग्लिश स्कूल अकोला, नार्मल स्कूल अकोला, नार्मल स्कूल उमरावती, विवेकवर्धिनी पाठशाळा हैदराबाद, पटवर्धन हायस्कूल रत्नागिरी, आर्यन ए. मोसायटीज हायस्कूल मुंबई, राजाराम कॉलेज कोल्हापूर व मिरज हायस्कूल अशा अनेक संस्थांतील शिक्षकांशी लेखकाने खाजगी चर्चा केली, व अनेक हायस्कुलांच्या हेडमास्तरांशी विचारविनिमय केला. काही हायस्कूलांमधून हेडमास्तरांनी निवडक शिक्षक बोलावून एक छोटी परिषदच भरविली, व नवयुगातील विद्यार्थ्यांना काय सांगावे याची चर्चा केली. अशा संस्था म्हणजे न्यू इंग्लिश स्कूल अकोला, पटवर्धन हायस्कूल रत्नागिरी व आर्यन ए. मो हायस्कूल मुंबई या होत. कांही ठिकाणी स्वत. लेखकाने शेदोनशें प्रौढ विद्यार्थ्यांशी अनेक विषयांसबंधी चर्चा करून त्यांचेही मनोगत समजून घेतले. राजाराम कॉलेजचे प्रिन्सिपाल डॉ. बाळकृष्ण प्रो. पटवर्धन कोल्हापूर, प्रो. माटे पुणे, रा. एस्. डी गोखले सांगली अशा या विद्वान् मंडळींचें वैचारिक साहाय्य या पुस्तकाला लाभलेले आहे. अनेक पालक, अनेक शिक्षक, अनेक संस्था आणि शेंकडो प्रौढ विद्यार्थी यांच्या मनाचा ठाव घेऊन परिस्थितीचा विचार करून नवयुगीन विद्यार्थ्यांना उपयुक्त असें हें पुस्तक निर्माण केलें आहे. यांत जो चांगलेपणा आहे तो सर्व इतरांचा असून दोषांचा धनी लेखक आहे, हें येथें नमूद करावेंसे वाटते. नवयुगांतील विद्यार्थ्यांना जे सांगावयाचें ते पहिल्या पधरा प्रकरणामध्यें सांगितलें आहे शिक्षक व पालक यांना उद्देशून जें लिहिलें आहे, तेही अनेक सत्प्रवृत्त शिक्षक व पालक यांना जे वाटतें त्याचेंच शब्दचित्र रेखाटलें आहे त्यामुळें या पुस्तकाला प्रामाण्य अधिक आलें आहे.

हा ग्रंथ तयार करण्याचे कामी ज्या अनेक ग्रंथांचें साक्षात् व परंपरेनें साहाय्य झालें, त्या सर्व प्राचीन व अर्वाचीन ग्रंथकारांचे आम्ही फार आभारी आहोत तसेच वर ज्या अनेक संस्थांचा व व्यक्तींचा उल्लेख केला आहे त्या त्या संस्थांचे व व्यक्तींचे आम्ही फार ऋणी आहो.

नवयुगांतील विद्यार्थ्यांमध्यें विद्यार्थिनीही येतात पण विद्यार्थिनींचे क्षेत्र अगदी भिन्न पडतें. त्यांच्या विषयी लिहावयाचें म्हणजे आणखी शंभर

र्थानांचा ग्रंथ वाढला असता व इतके लिहूनही ते विवेचन अपुरेंच राहिलें असतें. यास्तव तो विषय बुद्धिपुरस्सर वगळला आहे.

ग्रंथांतील प्रत्येक प्रकरणांतील विषय स्वतंत्र पुस्तकरूपाने सांगण्याजोगा आहे. कांही विषयावर स्वतंत्र पुस्तकेंही आहेत; तथापि ती ती सर्व पुस्तकें मिळविणें व वाचणे विद्यार्थ्यांना जमत नाहीं आणि प्रस्तुत पुस्तकात प्रत्येक विषयाची सांगोपांग चर्चा केली असती तर पुस्तक घेणें विद्यार्थ्यांच्या आटोक्यांत राहिलें नसतें; म्हणून शक्ति, युक्ति, शील, अभ्यास, स्वच्छता, अन्न, वस्त्र, खेळ, व्यायाम, ब्रह्मचर्य, शिष्टाचार, देशकार्य, अशा सर्व विषयांचा अवश्य तेवढा भरपूर ऊहापोह येथें केला आहे, त्याचा उपयोग विद्यार्थी करून घेतील व त्याप्रमाणें वागण्याचा यत्न करोत म्हणजे ग्रंथ लिहिण्याचें सार्थक्य झालें असे म्हणतां येईल.

लेखकाच्या प्रकृतीला काळजीपूर्वक तपासणारे व औषधोपचार करणारे मुंबईचे डॉ. हरीभाऊ टिळकसाहेब, डॉ. कैंकिणीसाहेब, डॉ. एम. डी. जोशी साहेब, डॉ. गोखले डेंटिस्ट, पुण्याचे डॉ. पळसुले व वामनराव लिमये मसाजिस्ट, कऱ्हाडचे कातेगांवकर वैद्य (पिता पुत्र) आणि मिरजेंतील डॉक्टर व वैद्य यांचेकडून वेळोवेळी जें निरपेक्ष साहय मिळतें त्याबद्दल कृतज्ञता व्यक्त करण्यास खरोखरीच शब्द अपुरे पडतात ईश्वर या सर्वांचें कल्याण करो अशी आमची प्रार्थना आहे.

आमचे कलाभिज्ञ स्नेही सुप्रसिद्ध शंकरराव किर्लोस्कर यांनीं अल्प वेळांत सुंदरसा ब्लॉक करवून दिला व पुस्तकाची शोभा वाढविली याबद्दल त्यांचे आभार मानतो.

हिंदुसमाजोद्धारक मालेच्या जन्मापासून तिची जोपासना व विस्तार करण्याविषयी अत्यंत तत्पर असणारे जे अनेक सद्गृहस्थ आहेत, त्यांत नागपूरच्या श्री. वासुदेवराव चितळ्यांचा निर्देश अग्रस्थानी करावासा वाटतो. श्री. काकासाहेब यांचा उत्साह, व्यवस्थितपणा, व टापटीप हे गुण तरुणाना लाजविणारे आहेत—याशिवाय श्रीपादराव अनगरकर वकील गुलबुर्गा, आमचे बाळमित्र श्री ग. ल. आजरेकर वकील विजापूर, दे. भ. काकासाहेब बर्वे वकील धुळे, दे. भ. नानासाहेब फडके कल्याण, आर्यसमाज कोल्हापूर या संस्थेचे मंत्री श्री. मालक, श्रीयुत बाबुराव वकील

मोतूर, श्री. वा. भि. प्रभु बेळगांव, श्री. नीलकंठराव सदाफळ वकील नागपूर, श्री. गो. गं भागवत इंदोर, श्रीमंत मोटे उमरावती, श्रीमंत दाजीसाहेब तांबे अॅडव्होकेट बडोदें, श्रीयुत बाबूराव गोखले विलेपार्ले, व्यवस्थापक किर्लोस्करप्रेस, श्री. बाबूराव फडके बऱ्हाणपूर, श्रीमंत बाबुकाका राहतेकर रहाते, श्री. वि. ना. मंडपे वकील, भुसावळ, श्री. वि. ना. मराठे चांदा, मित्र अप्पासाहेब हळबे मालेगांव, माढेकर ब्रदर्स हैद्राबाद, भक्तमंडळ फैजपूर, श्री. अंबादासपंत टेंबुर्णीकर सोलापूर, चि. गो. वाघ मंदसोर इत्यादि अनेक सद्गृहस्थांचा नामनिर्देश कृतज्ञता व्यक्त करण्याकरितांच (त्यांच्या इच्छेविरुद्ध) येथें करीत आहे. मालेच्या सर्व पुस्तकाचा प्रसार या थोर मंडळींच्या उदार प्रोत्साहनामुळें व प्रयत्नामुळेंच होत आहे हें येथें सांगणें अवश्य आहे.

कागदाची महर्घता, आणि दुरंगी चित्राचा खर्च इत्यादि कारणा-मुळें पुस्तकाची किंमत १ रुपयापेक्षां कमी ठेवणें अशक्य झालें.

मिरजेस आल्यापासून आमच्या मालेच्या कार्यास साहय करणारे मित्र भाऊराव आपटे यांचें या पुस्तकास लेखनसाहय व इतर साहय फार उत्तम तऱ्हेचें झालें. अनाथ विद्यार्थी गृहाच्या मुद्रण शाखेचे व्यवस्थापक श्री. शं. रा. दाते यानी पुस्तक ठरल्याप्रमाणे व्यवस्थित व सुबक छापून दिलें याबद्दल उभयतांचे आभार मानणें अवश्य वाटतें.

शेवटी सर्व जगावर जी नियामक शक्ति आहे व जिच्या प्रेरणेनें ही ब्रह्मांड घटना घडत आहे, त्या शक्तिस्वरूपी परमेश्वराचें स्मरण करून व तो असेंच अखंड कार्य आमच्याकडून घेवो अशी प्रार्थना करून हे प्रास्ताविक निवेदन पुरे करितो.

अधिक ज्येष्ठ शु॥ १५<br>मिरज

हिंदुसमाजाचा सेवक<br>महादेवशास्त्री दिवेकर

# अनुक्रमाणिका

# नवयुग विद्यार्थिधर्म

## प्रकरण १ लें

## विषयप्रवेश

प्रस्तुतचें पुस्तक हें या नवयुगातील विद्यार्थ्यांकरिता आहे ; आणि अंशतः पालक व शिक्षक यांकरिताही आहे. सांप्रत एका नव्या युगाला प्रारंभ झालेला आहे. नवयुग म्हणजे नवा काल होय ! नव्या कालांत क्षण, प्रहर, दिवस, रात्र हे कांहीं नवे येनात असें नाही; तर या कालात नवी तत्त्वे, नव्या कल्पना नव्या भावना, नवे विचार हे फार झटाझाट येत आहेत, म्हणून आजचें हें नवयुग आहे. कृत, त्रेत, द्वापर, व कलि अशी पूर्वीची चार युगें होती. पूर्वीसुद्धा त्या त्या युगांत नव्या कल्पना व नवे धर्म आलेले आहेत. आता ती पूर्वीची चतुर्युगें संपली. शास्त्रीय युग सांप्रत चालू झालें आहे. मंत्रयुग जाऊन, तंत्रयुग संपून, आताचें हें यंत्रयुग उद्भवलें आहे, म्हणूनच याला नवयुग असें म्हणतात. ज्ञानाचीं साधनें, वाहतुकीचीं साधनें, शोध आणि शास्त्रसामुग्री यांमुळे सांप्रतचें जग फार जवळ जवळ आलें आहे. जागतिक स्पर्धाक्षेत्रात प्रत्येक राष्ट्र पडल्यामुळे सांप्रतचा काल हा मोठा संक्रमणकाल आहे. या नवयुगाचा परिणाम इष्ट असो वा अनिष्ट असो, स्वेच्छेने असो वा अनिच्छेनें असो, तो आपल्या राष्ट्रावरही होऊं लागलेला आहे.

सांप्रत आपल्या समाजांत विचार, कल्पना, भावना आणि ध्येयें यामध्ये मोठ्या त्वरेनें क्रांति होऊं लागली आहे. गेल्या पंचवीस वर्षांत आपल्या देशत कशा क्रांतिकारक गोष्टी घडल्या हें थोडक्यात पाहू. मुलींनी शाळेंत जाणें हें कृत्य अधर्म्य समजत, तर त्याउलट आता मुलींनी शिक्षण न घेणें म्हणजे मूर्खपणा आहे असें वाटू लागलें आहे. पूर्वी ज्याची सावलीही अंगावर पडली तर स्नानाची आवश्यकता उत्पन्न होत असे, त्याच लोकांची

अस्पृश्यता काढून त्यांच्याशी इतरांप्रमाणे सर्व व्यवहार करण्यांत काही अधर्म घडत नाही, असें आज वाटू लागलें आहे. शाळेतील पोरासोरांना पूर्वी धाकांत ठेवण्याची प्रथा होती, ती जाऊन आता त्यांना अधिक अधिक स्वातंत्र्य कसें द्यावे असे विचार चालू आहेत. पूर्वी खेळकर मुलाना चोप मिळत असे, तर हल्ली उत्तम खेळाडूना जगात मान मिळू लागला आहे पूर्वी क्रमिक पुस्तकांत, खेळात काल व्यर्थ जातो, सोवत्यानी खेळण्याचा विचार जरी केला तरी 'खेळु नये आपण की व्यर्थचि खेळात काळ जो गेला' अशा तऱ्हेच्या कविता असत तर त्याउलट हल्ली क्रमिक पुस्तकात खेळावर पाठ दिले असून शाला-गृहाला जोडून क्रीडांगणाची सोय करण्यांत येत आहे पूर्वी या पोरासोराच्या बोलण्याकडे कोणीच लक्ष देत नसे, तर आज तरुणाच्या सघटनेकडे, त्यांच्या संस्थांकडे आणि त्यांच्या हालचालींकडे जगांतील विचारी लोकांचें लक्ष लागलेलें दिसतें. या व इतर अनेक उदाहरणांवरून नव्या युगाला प्रारंभ झाला आहे हें सहज सिद्ध होतें

विद्यार्थ्यांनो, तुम्ही भारत–संतान आहांत. तुम्ही ज्या देशात राहतां त्याला भारतवर्ष, भरतखंड अशीं नावे असून त्याची व्याप्ति आणि मर्यादा निसर्गानेच ठरविली आहे उत्तरेस हिमवान्, दक्षिणेस महासागर, पूर्वेस आणि पश्चिमेस रत्नाकर यामध्यें सामावलेला असा हा मोठा विस्तीर्ण देश आहे.

उत्तरं यत्समुद्रस्य हिमाद्रेश्चैव दक्षिणं ।
वर्षं तद्भारतं नाम भारती यत्र संततिः ॥

या देशात अनादि कालापासून भारतसंतान वास्तव्य करीत आहे. हा भारतवर्ष विस्तीर्णत्वामुळे जरी एकाद्या खंडासारखा भासला तथापि तो एकराष्ट्र आहे एकराष्ट्रीयत्वाची अनेक बंधनें व तत्त्वे भारतसंतानांत नांदत आहेत. या आपल्या राष्ट्राचा पूर्व इतिहास मोठा उज्ज्वल आहे. म्हणूनच भविष्यकालही उज्ज्वल येण्याची आशा वाटत आहे 'राजते तत् राष्ट्रम्' जे प्रकाशमान असतें ते राष्ट्र होय! अर्थात् आपल्या राष्ट्राची पूर्वपरंपरा जगावर प्रकाश पाडणारी अशीच आहे.

या भारतवर्षाला कर्मभूमि असेंही म्हणतात. ही भोगभूमि नाही. या जगात मनुष्यजन्म दुर्लभ आणि भरतखंडात तर तो विशेष दुर्लभ आहे, असे उद्गार व्यासांनी काढले आहेत.

दुर्लभं मानुषं जन्म भारते तत्र दुर्लभम् ।

खरोखर अद्‌भुत व आकर्षक सृष्टिसौंदर्य, उत्कृष्ट हवापाणी, सर्व तऱ्हेची ामृद्धता ही पाहिली म्हणजे हा आपला देश ईश्वराला प्रिय आहे, असें वाटते. ा आपल्या मातृभूमीची, पितृभूची, पुण्यभूची योग्यता थोर आहे. तिच्या ऱ्णांतून मुक्त होण्याकरिता तुम्हीं या विद्यार्थीदशेत कसे वागावें हे या ग्रंथांत ांगावयाचें आहे.

नवयुगीन विद्यार्थ्यांनो ! भारतमाता ही आपल्या सुपुत्राकडून आपल्या द्धाराची सारखी इच्छा करीत आहे. याकरितां तुम्ही तुमच्या विद्यार्थी-शेमध्यें अनेक सद्‌गुण संपादले पाहिजेत. भारतीय विद्यार्थी हा मर्द, धडाडीचा नपजला तरच तो

उदंड खस्तिचीं कामें । मर्द मारूनि जातसे ।

ऐसें करून दाखवील. भारतीय विद्यार्थी हा स्वाभिमानी, कर्तव्यतत्पर, रीरानें कणखर, बुद्धीनें कुशाग्र, मनानें धैर्यवान, बाहूनें पौरुषवान, शीलयुक्त, हाव्रती, महाभोक्ता, जयस्वी व मनस्वी अशा तऱ्हेचा निपजावयास पाहिजे. हे गुण विद्यार्थ्यांत म्हणजे पुढच्या तरुण पिढीत जर न येतील तर इंग्रज सरकाराकडून क्रमाक्रमानें मिळणारे स्वराज्य चालवितां येणार नाही राष्ट्राची मदार अशा सर्व विद्यार्थ्यांवर आहे अर्थात् हिंदुस्थानांतील तरुणांकडे कर्त्या लोकांची दृष्टि मारली गिळलेली आहे.

पूर्वी देशभक्त मॅझिनीने इटलीतील तरुण पिढीला आपणाकडे आकर्षून घेतलें. समर्थ रामदास स्वामींची दृष्टि विशीचाविशीच्या तरुणांकडेच असे. छत्रपति शिवाजी महाराजांनी तरुण मराठा मंडळच आपणा भोवताली जमविलें. आज रशियांत, अमेरिकेंत, जर्मनीत आणि इंग्लंडातही तरुणांच्या चळवळी, त्यांच्या संस्था याना पुष्कळ महत्त्व आहे याचें कारण हेंच की तरुणानीं मनावर घेतल्यास राजकारण, धर्म, समाज, यांमध्यें हा हां म्हणता क्रांति होते हें काही राष्ट्रांचे अलीकडील इतिहास पाहिल्यास दिसून येतें.

तारुण्य ही एक बहुमोल वस्तु आहे. बाल, तरुण, वृद्ध या शरीराच्या तीन अवस्था असल्या तरी तारुण्याचीच योग्यता अधिक असते. अंगांत सळसळणारें नवें रक्त, वृत्तींतील उच्छृंखलपणा, प्रबळ जिज्ञासा, दुर्दम्य महत्त्वाकांक्षा, खंडोल मनोवृत्ति, आपत्ति व संकटे यांविषयीं

शारीरिक कणखरपणा, कोणत्याही प्रसंगांत उडी घालण्याची सिद्धता इत्यादि गुण या तारुण्यातच दृग्गोचर होतात. तारुण्य हें आल्हादजनकही आहे व भयप्रदही आहे. शारदीय पूर्णिमा, वसंत ऋतु, कोकिळेचा पंचम आलाप यांप्रमाणे तारुण्य जसें आनंददायक आहे, तसेंच ते अग्नि व दारू यांप्रमाणे भयप्रदही आहे. उडणारी दारू शोभा देते, दिपविते, भडकते, पण प्रसंगी ती दुसऱ्यास जाळूनही टाकते. तसेंच तारुण्याचेंही आहे. तारुण्यात उत्साह असला तरी तो उत्साह अविवेक व उन्माद यांकडे खर्च न होतां विद्या, शील, व सद्गुण यामध्ये त्याचा विनियोग झाला तरच हित होतें.

राष्ट्राचे सामर्थ्य अथवा राष्ट्रीय संपत्ति म्हणजे तरुण पिढी होय! राष्ट्र राष्ट्र म्हणून जें म्हणतात ते सोन्यानाण्यांत नसतें, पर्वतनद्यांमध्यें नसतें, दऱ्याखोऱ्यात व जमिनीतही नसते तर खरें जिवंत राष्ट्र हे पुढच्या तरुण पिढीतच असते. आजचे विद्यार्थी हे उद्याचे नागरिक होत. अर्थात् उत्तम नागरिकांचा पुरवठा विद्यार्थीवर्गातूनच होत असतो.

विद्यार्थ्यांनो! तुमचें हें वय फार महत्त्वाचें आहे. या वेळीं घणानी ठोकून बसविलेल्या मेखांप्रमाणे अंगामध्ये सद्गुण व दुर्गुण पक्के भिनविता येतील. ते एकदा भिनले की मग किती जोर केला तरी ते निघणें शक्य नाही. म्हणून या वेळीं अवगुण न लागतील व सद्गुण जडतील अशी तुम्ही काळजी घेतली पाहिजे. जमिनीमध्यें जें बी पेरावें तें उगवते. जमिनीची नांगरणी व पेरणी हीं सर्व व्यवस्थित झाली पाहिजेत. पेरणी, कापणी, मळणी व्यवस्थित झाली म्हणजे मग सुगीच्या दिवसांत हाती फळ येतें. चांगली नांगरणी, चांगल्या बियाची पेरणी आणि चांगली मशागत झाली म्हणजेच पीक उत्तम येतें. पण जर कां यात बिघडलें व हयगय झाली तर सर्व हंगाम फुकट जातो! जें पेरावें तें उगवतें. सराटे पेरून गव्हाचें पीक येत नाहीं. तशीच गोष्ट या तारुण्याची आहे. या वयात धैर्य, आज्ञाधारकपणा, कर्तव्यतत्परता, उद्योग वगैरे गुण जर अंगीं रुजविले तरच मग आयुष्याचा हंगाम फार सुखाचा जातो.

विद्यार्थ्यांनो! तुम्हांला मुलें असें म्हणतात. पण तुम्ही मूल म्हणजे राष्ट्राचें मूळ आहां. मुळाला कीड लागली नाहीं, तरच त्या लहान रोपट्यांचा वृक्ष फोफावतो; तसेंच तुमच्या आयुष्याचें आहे. झाडाला जपण्याचें व पाणी घालण्याचें काम जसें माळी करतो, त्याप्रमाणे तुमच्या आयुष्याचें हे नाजूक

रोपटें वृक्षरूपानें चांगलें फोफावावें म्हणून आई, बाप, शिक्षक, आप्त आणि अनेक संस्था खटपट करीत असतात.

विद्यार्थ्यांनो ! तुमचें आयुष्य हें नारळासारखें आहे राष्ट्रधारणेला उपयुक्त असा सत् तत्त्वाचें खोबरेंच या नारळांतून निघालें पाहिजे. हें आयुष्य विषयांत व विलासात लोळण्याकरिता नाही ; तर तें कर्तव्याकरितां आहे. राष्ट्राच्या विपत्कालीं तारुण्य हें विषयोपभोगात घालविणें म्हणजे प्रेताला शृंगारसाज चढविणें किंवा चितेवर पडून सुखानें निद्रा घेण्यासारखेंच हास्यास्पद आहे. विद्यार्थीदशा ही रत्नांची पेटिका आहे. या पेटिकेंत या वेळी सद्गुणांची रत्नें भरावयास पाहिजेत. तारुण्याच्या पुष्पाला त्याग, कर्तृत्व, शील, प्रज्ञा इत्यादि सद्गुणांच्या सुगंधांनीं युक्त करुन तें राष्ट्ररूपी ईश्वराच्या चरणी अर्पावयास पाहिजे. तारुण्याच्या सुवर्णताटांत अनेक सत्कार्यांचीं पक्वान्नेंच भरली पाहिजेत, परंतु त्या सुंदर ताटांत विषयवासनेनें विष मुळींच कालवता कामा नये. विद्यार्थ्यांनो ! तारुण्य ही एक आयुष्याच्या हत्तीवर घातलेली सुंदर अंबारी आहे अशी कल्पना केल्यास त्या अंबारींत धृति, भृति, नीति, कला, यांचीच प्रस्थापना केली पाहिजे त्या अंबारींत जर स्वार्थाचा केरकचरा कोणी टाकील तर तें अनुचित नव्हे काय ? हिऱ्याला गारगोटी समजणें, चिंतामणीचा गोफणगुंडा करणें, हें जेवढें असमंजस, तेवढेंच तारुण्य हें केवळ चैनीकरितां आहे असें समजणें असमंजस होय !

आयुष्यरूपी भव्य प्रासादाचा पाया म्हणजे विद्यार्थीदशा होय ! कोणत्याही प्रासादाचा पाया जितका भरभक्कम असेल तितका तो प्रासाद चिरकाल टिकतो. हा पाया या विद्यार्थीदशेंत भरावयाचा असतो. अनेक सद्गुणांचा परिपोष याच कालात करावयाचा असतो दुर्गुण, दुर्व्यसनें, दुष्ट संवयी यांपासून अलिप्त राहण्याचा व मनोनिग्रहाचा कालही हाच आहे या वयांत जें मिळवितां येतें तें पुढें येऊं शकत नाहीं. या वयांत जें करता येतें तें पुढें जमू शकत नाही. वयाच्या पंचवीसतीस वर्षांपर्यंतच खरी विद्यार्थीदशा असते. आणि विशेषत बरेंवाईट कळू लागण्याचा काळ म्हणजे चौदा ते पंचवीसतीस वर्षे हाच असतो. याच कालाला विद्यार्थीदशा समजतात.

पूर्ववयात अशी इश्यें करावीत कीं ज्यांमुळें वार्धक्यांतही सुख होऊं शकेल. दिवसभर जो चांगले श्रम करतो व कष्टाची भाकर खातो, . .

रात्री सुखाने झोप येते. मानवी आयुर्मर्यादा साधारण शंभर वर्षांची धरतात. शंभर वर्षेपर्यंत सुखाने व कर्तृत्वाने हे आयुष्य जर भोगावयाचें असेल तर या विद्यार्थीदशेत सर्व तऱ्हेची शारीरिक, मानसिक व बौद्धिक संपत्ति संपादन केली पाहिजे.

कोणत्याही काळी व कोणत्याही स्थळी तत्त्व हें सनातन असतें, मात्र त्याचा आविष्कार किंवा तपशील हा परिस्थितीप्रमाणें बदलत असतो. पूर्वी उपनयन होतांच विद्यार्थी गुरुगृहात जाऊन विद्यार्जन करीत, भिक्षा मागून निर्वाह करीत. अर्थात् मोठमोठ्या गुरुकुलांना राजाश्रयही असे. ब्रह्मचर्याश्रमांतील सर्व नियम त्या काळी उपयुक्त होते. त्या सर्व नियमांतील एक सनातन तत्त्व म्हणजे विद्यार्थीदशेतील शिस्त व नियम हें होय! आजही शिस्त पाहिजे, नियम पाहिजेत, मात्र ते आजची विद्येची साधनें, आजचा देश-काल व आजचीं विद्यालयें या दृष्टीने पाहिजेत. आज जगांत जी उत्कृष्ट विद्यापीठें आहेत व ज्यांनी लक्षावधी कर्ते व विद्वान् माणसें उत्पन्न करण्याचें श्रेय संपादन केले आहे, त्यांचेंच अनुकरण आपण केलें पाहिजे.

नवयुगातील भारतीय विद्यार्थ्यांनो! हा ग्रंथ तुमच्याकरिता आहे. येथे विद्यार्थीधर्म हा नव्या युगाला अनुसरून व भारतीय विद्यार्थीवर्ग डोळ्यांपुढें ठेवून सांगावयाचा आहे. कारण पूर्वीचा काल आता बदलला. गुरुगृहें गेली, चातुर्वर्ण्य लोपलें, जातिसंस्था अपुरी पडू लागली, आणि त्यापेक्षा उच्चतर समाजव्यवस्थेची भूक समाजामध्ये उत्पन्न झालेली आहे. अशा वेळीं जुने असें होतें, तसें होतें, असें सांगण्यापेक्षा आज काय आहे व आजच्या युगात विद्यार्थ्यांनी कसें वागावें, हेंच मुख्यत येथे सांगावयाचें आहे.

नवयुगातील विद्यार्थ्यांनो! विद्यार्थीधर्म हे शब्द वाचल्याबरोबर गांगरून जाऊ नका. कारण धर्म म्हणजे अद्भुत, अदृष्ट, अपूर्व असें काहीं असतें अशी समजूत आहे. पण तसलें येथे कांहीं एक सांगण्याचा हेतु नाही. विद्यार्थीधर्म म्हणजे विद्यार्थ्यांनी स्वच्छता कशी राखावी, अभ्यास कसा करावा, अन्न व वस्त्र या बाबतीत कशी दक्षता घ्यावी, ब्रह्मचर्यविघातक असें कोणतें वर्तन करू नये, व्यायाम कसा घ्यावा, प्रवास कसा करावा, बहुश्रुत कसें व्हावें, विद्वान् कसें व्हावें आणि असें होण्यास मदत ते सर्व उपाय कसे करावेत, हें सर्व सांगण्याकरिता हा ग्रंथ आहे. भारतीय विद्यार्थी हे महारथी, महाभक्त,

जातें, सद्‌गुणसंपन्न, धीरोदात्त आणि शीलवान् कसे होतील हें सांगणारा हा *विद्यार्थीधर्म ग्रंथ आहे*. येथें सर्व धर्म प्रत्यक्ष आहे. मनुष्य हा जन्मभर जरी शिकत असला तथापि खरा विद्यार्जनाचा काल हा वयाच्या बाराव्या वर्षा-पासून पंचवीस वर्षांपर्यंत फार तर तीस वर्षांपर्यंत असतो व या कालालाच विद्यार्थीदशा म्हणतात. या विद्यार्थीदशेंतील विद्यार्थ्यांनी शक्ति, युक्ति व शीलसंपन्न होऊन ज्या आपल्या पितृभूचें, पुण्यभूचें पुनरुत्थान केलें पाहिजे, तिच्या थोरवीची कल्पना पुढील प्रकरणांत देतो

---

## प्रकरण २ रें

# धन्य माझी भारतभूमि

*जगातील प्रत्येक मनुष्य कोठें तरी एका देशात जन्म घेत असतो. अर्थात्* ज्या भूमीत तो लहानाचा मोठा होतो, ज्या भूमीत त्याचे वाडवडील होऊन गेलेले असतात, त्या भूमीचा अभिमान प्रत्येकाला असणें हें स्वाभाविक आहे. परंतु यापूर्वी स्वदेशप्रेमाला इतकें महत्व आलेलें नव्हतें. विश्वावर प्रेम करावें, देवाची भक्ति करावी, राजनिष्ठ असावें, राजाबद्दल आदर ठेवावा, इत्यादि विचारच समाजात वावरत होते. परंतु अलीकडे देशसेवा, देशभक्ति, देशा-भिमान यांना पद्धतशीर असें शास्त्रीय स्वरूप आलेलें असून राष्ट्रीयत्व व स्वदेशभक्ति हा आजच्या युगातील धर्म बनलेला आहे जगातील सुधारलेल्या राष्ट्रात पूर्वी क्रमिक पुस्तकामध्ये जे राजनिष्ठेचे पाठ घालतेले असत त्या-ऐवजी आता आधी स्वदेशनिष्ठा, मुख्य स्वदेशभक्ति व नतर सर्व कांही, अशा तऱ्हेचे विचार ग्रथित केले जात आहेत. कारण राजा ही व्यक्ति अल्पकालची, *तर देश ही वस्तु चिरंतरची. शिवाय हल्ली राजाला सत्ता अशी थोडी असल्या-*मुळें राजाचा राजेपणा देशातील लोकांच्या हातातच आलेला आहे.

जगाचें नियामक तत्त्व सगुण आहे का निर्गुण आहे याचा शोध अद्याप अपुराच आहे. तथापि या विद्यमान जगात अत्यंत सुसंस्कृत व उन्नत प्राणी असेल तर तो मनुष्यच होय! मनुष्यत्वाची उन्नति आणि मानव्याचा विकास हेंच या जगातील परमोच्च कर्तव्य होय! हे कर्तव्य विवक्षित क्षेत्रात करणें हेच उचित असतें. या दृष्टीनें स्वदेशाची म्हणजे देशातील लोकांची सर्वांगीण उन्नति करणें हा आजच्या काळाचा श्रेष्ठ धर्म झालेला आहे. ईश्वर सर्वत्र असला तरी कोठें तरी त्याचें प्रतीक अथवा त्याचा प्रतिनिधि मानूनच ईश्वराची उपासना होते. त्या तत्त्वास अनुसरून स्वराष्ट्र हें ईश्वराचें प्रतीक समजून स्वराष्ट्राच्या उन्नतीचा यत्न करणें म्हणजेच ईश्वराची सेवा करणें होय, असें हल्ली निश्चित झालें आहे.

मनुष्य समाजाच्या विकासाबरोबर त्याच्या ईश्वरविषयक कल्पनांमध्येंही विकास झाला आहे. मनुष्य जेव्हा रानटी होता, तेव्हां त्यानें ईश्वरावर तो जुलमी, क्रूर, दाडगेश्वर असा असावा असें आरोप केले. मनुष्य समाजात कुटुंबसंस्था येऊन प्रेम, वात्सल्यादि गुण वाढू लागल्यावर त्यानें ईश्वरालाही परम करुण, भक्तवत्सल, भक्तकामकल्पद्रुम असें बनविलें. पूर्वी वैदिक धर्मात यज्ञाला प्राधान्य होतें. यज्ञामध्यें इंद्र, वरुण, सोम, सूर्य, अग्नि अशा देवतांना त्यांनी संकटातून रक्षण करावें म्हणून हविर्द्रव्यें अर्पण करीत असत. पुढें यज्ञाचें स्थानी देव व देवळें येऊन मूर्तींच्या स्थापना व त्याचे उत्सवसमारंभ यांकडे संपत्तीचा विनियोग होऊं लागला. अर्थात् यज्ञकर्मावरून समाज सगुण भक्तीवर आला, आणि आज त्या ईश्वरभक्तीवरून त्याचेंच प्रतिनिधिभूत जें राष्ट्र त्यावर आला! राष्ट्राच्या भक्तीला आजच्या जगात समाजानें प्रमुख मान दिलेला आहे.

जगात पुष्कळ देश व पुष्कळ राष्ट्रें असली तरी या आपल्या भारताला काही विशेष महत्त्व आहे. इतर देशांतील लोकांनां आपल्या देशावर प्रेम करण्याला आवश्यक अशीं जीं कांहीं स्थानें असतील तीं सर्व या देशात आहेतच ! तथापि त्या सर्वांपेक्षा या भारताचा विशेष काय आहे हें स्वामी विवेकानंदांचे शब्दांतच येथें सांगतों.

"धन्य! माझी मातृभूमि धन्य आहे! जो कोणी या भूमीवर उभा राहील त्याला जगातील अत्यंत पवित्र आणि अत्यंत

हृदयांतून उद्भवणारे विचारतरंग आपल्याभोवतीं घिरट्या घालीत आहेत, असा प्रत्यय अवश्य येईल. आज हजारो वर्षे ही पवित्र अंत:करणें पशूचे देव बनविण्यांत गुंतली आहेत. त्यांनी आपल्या कार्याला आरंभ केव्हा केला, हे इतिहास, पुराणें सांगू शकत नाहीत. माझ्या मातृभूमीचें सारे वातावरण आध्यात्मिक विचारानी दुमदुमून गेले आहे नीति आणि अध्यात्म याची जन्मदात्री हीच भूमि! आपल्या पशुवृत्तीला एकसारखें चिकटून राहण्याचा यत्न मनुष्य करीत असतां तशाही स्थितीत मध्यंतरी विसाव्याच्या जागा त्याला येथें सापडतात. ही वृत्ति सोडून तो 'न जायते म्रियते वा कदाचित्।' अशा पदवीला जात असता त्याला योग्य मार्गदर्शकही येथेंच भेटतात. सुख आणि दु:ख, सामर्थ्य आणि दौर्बल्य, संपत्ति आणि विपत्ति, हास्य आणि अश्रु, जीवित आणि मृत्यु, इत्यादि द्वंद्वांचे परस्परविरोधी प्रवाह उच्छृंखलपणें वाहत असतां अनंत शांति आणि स्थैर्य यांस प्राप्त करून देणारें तत्त्व प्रथम याच मानव समुद्रांतून बाहेर पडलें. ज्या भूमींत जीवित आणि मृत्यु यांची अगम्य कोडी सोडविली गेलीं ती भूमि हीच!

"धर्माला प्रत्यक्ष आणि व्यवहार्य रूप आहे, हे प्रथम याच भूमीत निदर्शनास आलें. ज्याप्रमाणें इतर देशांतील स्त्रीपुरुषें ऐहिक सुखोपभोगार्थ संसारसमुद्रांत नि:शंकपणें उड्या घेतात आणि आपणाहून अधिक दुर्बल अशा बांधवांवर मनसोक्त अंमल चालवितात, त्याचप्रमाणें अनंत सुखाच्या प्राप्ती-करितां कसल्याही यातनांच्या समुद्रात स्वत:ला कडेलोट करून घेणारी स्त्री-पुरुषें प्रथम याच भूमींत पैदा झाली. याच भूमीत मानवी अंत:करण विस्तार पावत पावत इतकें मोठें झालें की त्यांत केवळ मनुष्येंच मावलीं असें नाहीं, तर पशुपक्षी, झाडेंझुडपें आणि दगड यांचाही त्यात अंतर्भाव झाला अत्यंत उच्च प्रतीच्या देवाधिदेवापासून तो गवताच्या पातीपर्यंत सर्वांचा समावेश एक मानवी अन्त:करण करूं शकतें, आणि स्वत: अनंतरूप राहतें, ही गोष्ट प्रथम येथेंच सिद्ध झाली. 'सर्व विश्व मीच आहें, त्यांत कोठेंही खंड नाहीं, त्यात उडणारी प्रत्येक नाडी माझीच नाडी आहे' अशा प्रकारचा अन्याग मनुष्य प्राण्यानें प्रथम याच भूमीत केला!" (विवेकानंद खंड ३ पान २६३).

स्वामी विवेकानंदाच्या वरील उदात्त उद्गारावरून आपल्या भारत-भूचें, पितृभूचें, पुण्यभूचे वैशिष्ट्य अध्यात्मदृष्ट्या काय आहे हें निदर्शनास

येईल. राष्ट्राला ज्ञान आणि विज्ञान ही दोन्ही लागतात. अध्यात्म ज्ञानाबरोबर भौतिक ज्ञानही अवश्य पाहिजे. हे ज्ञान पूर्वी एका काळी होते, पण तें मध्यंतरी लुप्त झाले! ज्योतिषशास्त्र, गणित, भाषाशास्त्र, व्याकरण, तर्कशास्त्र, भूगोलशास्त्र, शिल्पशास्त्र, वैद्यशास्त्र, काव्यशास्त्र, अलंकारशास्त्र, भूमिती, इतिहास, मानसशास्त्र, कामशास्त्र, समाजशास्त्र, अर्थशास्त्र अशी शेकडो शास्त्रे या देशात पूर्वी चांगलीच वाढलेली होती. याशिवाय चित्रकला, गायनकला, रेखाकला, कर्तनकला अशा चौसष्ट तऱ्हेच्या कलाही येथें पूर्णत्वास गेलेल्या होत्या

निसर्गाची तर कृपा या देशावर परिपूर्ण आहे चित्रविचित्र पक्षी, वन्य आणि ग्राम्य पशु यांचे येथे वैपुल्य आहे समशीतोष्ण हवामानामुळें सर्व प्रकारची धान्ये या देशात अगदी मुबलक पिकतात. खनिज संपत्ति, औषधी आणि वनस्पती यांचे वैपुल्य येथे इतके आहे की त्यांचा पुरवठा जगासही करता येईल. तीन बाजूंनी या भूमीचें रक्षण अफाट आणि गंभीर असा रत्नाकर अखंड करीत आहे नगाधिराज हिमाचलाची भिंत तर उत्तरेस परमेश्वरानेच एवढी उत्तुंग बांधलेली आहे की तिची शैलशिखरे पाहण्यातच किल्पेकांना धन्यता वाटेल सह्याद्रि, विंध्याद्रि अशा पर्वतश्रेणींनी या भारतभूला अवर्णनीय शोभा आणली असून प्रसन्न-पुण्य-सलिला अशा सरित् प्रवरा, गंगा, यमुना, नर्मदा, सिंधु, गोदावरी, कृष्णा सुसमृद्ध जलसंपत्तीने अखंड वाहत आहेत इतकी शोभा, इतकी समृद्धि, इतके वैभव जगात मिळणार नाही म्हणूनच या देशाला अमरनिवास, जगताचे उद्यान, नंदनवन अशीही नावे देण्यात आलेली आहेत

अशा या देशावर प्रेम करा, या आपल्या भारताची सेवा करा असें भारतीय विद्यार्थ्यांना सांगण्याचे वास्तविक प्रयोजन नाही परंतु आजचे वाढते दारिद्र्य, वाढती बेकारी आणि पारतंत्र्य हीं पाहून निराश होणाऱ्या अंत:करणांना तुमचे पूर्ववैभव, तुमची पूर्वपरंपरा, ही ध्यानी घेऊन देशाच्या सेवेचे महत्त्व काय आहे हे सांगणें अवश्य आहे.

देशाचे महत्त्व हे पर्वत, नद्या, निसर्गकृपा, पशुपक्षी, यावरच नसते; तर तें देशांतील वर्त्या माणसावर असते. त्या दृष्टीने पाहिल्यास आजच्या या पडत्या काळांतसुद्धा अनेक नररत्ने उत्पन्न झालेली पाहून कोणाला अभि-

मान वाटणार नाही ? महात्मा गांधी, लोकमान्य टिळक, रवींद्रनाथ टागोर, केशवचंद्र सेन, महर्षि दयानंद, स्वामी रामतीर्थ, स्वामी विवेकानंद, राजा राममोहन रॉय, न्यायमूर्ति रानडे, नामदार गोखले, महात्मा जोतिबा फुले, दे. चित्तरंजन दास, पं. मोतीलाल नेहरू, प्रो. कर्वे, डॉ. आंबेडकर, राजर्षि शाहू महाराज, श्रीमंत सयाजीराव, लाला लजपतराय, दादाभाई नवरोजी, संशोधक राजवाडे, जगदीशचंद्र बोस, प्रो. रामन, पुण्यश्लोक मालवीय इत्यादि अनेक कर्तबगार पुरुष याच भूमीत निपजले आहेत. श्रीशिवाजी महाराज, समर्थ रामदास या दोघांची नावे उच्चारताच मराठेशाहीतील अनेक कर्मवीरांचें आणि धर्मवीरांचे स्मरण सहजच होते. कालिदास, भवभूति यांच्यासारखे कवी, आर्यभट्ट, भास्करभट्ट, कुमारील भट्ट, यांच्यासारखी विद्वद्रत्ने, श्रीशंकराचार्य, मध्वाचार्य, रामानुजाचार्य, वल्लभाचार्य, भगवान् बुद्ध, जिनेश्वर, बसवेश्वर, महावीर, कबीर, चैतन्य, नानक, गुरु गोविंदसिंग यासारखे तत्त्वज्ञानांचे आणि धर्मपथाचे प्रवर्तक जेथे होऊन गेले त्या भारतभूचे अध्यात्म-वैभव काय वर्णन करावे ? नल, राम, युधिष्ठिरासारखे राजे, सीता सावित्री-सारख्या पतिव्रता, कर्णार्जुनासारखे योद्धे, शुकजनकासारखे त्यागी आणि योगी, चंद्रगुप्त, समुद्रगुप्त, प्रतापसिंह, सिंघण, यादव यासारखे रणगाजी जेथे होऊन गेले त्या भूमीच्या कुशीतून पुनश्च अशा तऱ्हेचे श्रेष्ठ पुरुष उत्पन्न होणार हे सांगावयास पाहिजे काय ? पाणिनी आणि व्यास यासारखे जगात अत्यंत बुद्धिमान्, सर्वज्ञ आणि सर्वश्रेष्ठ ग्रंथकार जे झाले ते येथेंच ! अणूची प्रक्रिया मांडणारा गौतम आणि कणाद हे येथेच जन्मले. आदिकवी वाल्मिकीला क्रौंच मिथुनामुळे जो कळवळा आला व काव्य रचण्याची जी स्फूर्ति झाली ती येथेंच. वसिष्ठ, विश्वामित्रादि तपस्वी आणि मनस्वी जे यशस्वी झाले, ते या भारतभूमध्येंच. जगात सप्त आश्चर्ये आहेत असें समजतात, पण त्या सर्व आश्चर्यांमध्ये अत्यंत श्रेष्ठ असें आश्चर्य कोणते असेल तर ते वैदिक वाङ्मयच होय ! जगांतील प्राचीन वाङ्मय—पठणपाठण परंपरेने निदान दहा हजार वर्षें अगदी जसेंच्या तसें जिवंत ठेवलेले वाङ्मय जर कोठें असेल तर ते येथेंच आहे. मानवजातीच्या अभ्यासूला या वाङ्मयाला अभिवंदन वंदन केल्यावांचून पुढे जाववणार नाही. दुष्टदंडन आणि सुष्टपालनाचे कार्य ईश्वर जें वेळोवेळी अवतार घेऊन करतो असें समजतात, त्या ईश्वराचे ते

अवतारही येथेंच झाले आहेत तात्पर्य, ईश्वराची कृपा, अध्यात्मदृष्टि, निसर्गानें आनुकूल्य, बुद्धिमान् व कर्तृत्ववानांची परपरा आणि अशी जी जी कांही देशावर प्रेम करण्याची लोभनीय अशी स्थाने आहेत, ती सर्व येथे परिपूर्ण आहेत, न्यून असे कोणतेंही नाही याचे स्मरण अखड ठेवून अशा या भारताच्या पुनरुत्थाना-करितां नवयुगीन तरुणानी कबर कसली पाहिजे, आणि विद्यार्थीदशेंतच भारताच्या सेवेचा मार्ग, आपला स्वभाव, आपली बुद्धि, आपली परिस्थिति, व आपले आनुकूल्य ही सर्व ध्यानात घेऊन निश्चित केला पाहिजे विद्यार्थ्यांनी या नवयुगातील परिस्थितीचें आकलन करुन स्वत चे निरीक्षण कसे करावे आणि ध्येय कसे ठरवावे याचा विचार पुढील प्रकरणी करू.

---

## प्रकरण ३ रें

# आत्मनिरीक्षण करा व ध्येय ठरवा

जन्माला आलेल्या मनुष्याचें जगणें, जिवत राहणें, पोट भरणें, हेच ध्येय आहे, असे म्हणता येणार नाही कारण पशुपक्षीसुद्धां जगतात व जिवत राहतात मानवी जीवन हे पशुपक्ष्यांपेक्षा उच्च व उदात्त आहे. अर्थात् हिंदुस्थानासारख्या परतंत्र देशातील तरुणांच्या आयुष्याचे ध्येय हे उच्च आणि उदात्तच असावयास पाहिजे. तरुणानी हे ध्येय स्वत चे, देशाचे व एकंदर परिस्थितीचें निरीक्षण करुन विद्यार्थीदशेंतच ठरविले पाहिजे कारण जे संस्कार लहानपणी प्रबळ असतात त्याचाच विकास पुढे होत असतो. सुप्रसिद्ध लेखक, चित्रकार आणि गवई याच्या अशा आख्यायिका सांगण्यात येतात की त्यांनी वयाच्या चौदा पधरा वर्षांपासूनच लहान लहान लेख लिहिणें, गमतीदार चित्रें काढणें, सुस्वर व मजुळ गाणीं म्हणणें. असा शोधाम प्रारंभ केला होता. टिळक, आगरकर, दयानद सरस्वती, जोतिबा फुले यांचीं चरित्रें

पाहिली तर त्यांच्या भावी कामगिरीचे बीज विद्यार्थीदशेंतच रुजले गेलेले होते असें दिसते. टिळक, आगरकर हे कॉलेजमध्यें असतांना ध्येयाबद्दल त्यांच्या चर्चा रात्रभर चालत ! पुढें जें करावयाचे त्याचा खरोखरी असा निदिध्यास वयाच्या विसाव्याविसाव्या वर्षीच लागला पाहिजे.

देशाला स्वायत्तता मिळून द्यावयाची आहे, स्वराज्य हे राष्ट्राचे ध्येय निश्चित झालें असून इंग्रज सरकारनेही त्याला मान्यता दिली आहे, हे सर्व खरें असलें तरी तरुणानी आपले पालक व शिक्षक यांच्या मदतीने राष्ट्रीय ध्येयाला पोषक असे आपले भावी ध्येय अठराबीस वर्षांपर्यंत निश्चित केलें पाहिजे. ध्येय अथवा साध्य निश्चित ठरले की त्या मानानें साधनें अचूक जमवितां येतात, व कार्यक्षेत्रात पदार्पण करता येते. जगतील मोठ्या लोकांचे इतिहास पाहिले तर असे आढळते की त्यानी भर जवानीतच ध्येय ठरवून धकाधकीच्या मामल्यामध्यें उड्या घेतल्या होत्या.

## तारुण्यांतच कार्यारंभ करा

छत्रपति श्रीशिवाजी महाराज यांनी तर तरुण मराठा मंडळ आपल्या भोवती वयाच्या तेराव्या वर्षीच जमा करुन तोरणा किल्ला हस्तगत करुन स्वराज्याचे जणु तोरण बांधले ! तेजस्वी संभाजी महाराजांचे तारुण्यही निरनिराळ्या आपत्तींना तोंड देऊन लढण्यातच गेले. श्रीसमर्थ रामदास स्वामींनी वयाच्या बाराव्या वर्षीच 'सावधान' हे शब्द ऐकताच विवाहमंडपांतून उड्डाण केलें ! थोरल्या बाजीरावाने बाविसाव्या वर्षी, नानासाहेबाने एकोणिसाव्या वर्षी, थोरल्या माधवरावाने वयाच्या सतराव्या वर्षी मुख्य प्रधानाची सूत्रें हातीं घेऊन अखिल भारताचे राजकारण आक्रमिले होतें. विश्वासराव हा भारतीय अभिमन्यूप्रमाणें अवघ्या सोळाव्या वर्षीच मोठमोठ्या स्वाऱ्यावर जाऊ लागला होता. लॉर्ड क्लाइव्हचेही उदाहरण असेच आहे. हा अत्यंत व्रात्य व खोडकर मुलगा, पण त्याच्या आयुष्याला तारुण्यात जी दिशा लागली, तिनेच हिंदुस्थानात इंग्रजी राज्याचा पाया घातला. टिपू, हैदर, बाबर या कर्त्या पुरुषांच्या चरित्रातही हेंच दिसते की, त्यांनी तारुण्याच्या जोमात नटकाफडकीनें आपापल्या आयुष्यांतील कार्याला बेगुमानपणें प्रारंभही केला होता.

—जो विद्यार्थी वयाच्या सोळा ते अठराव्या वर्षापर्यंत आपले ध्येय निश्चित करतो व जो पुढें मी अमुक होऊन अमुक करणार असें ठरवितो, त्याचेंच आयुष्य

यशस्वी होतें. कारण ध्येय हस्तगत होण्यास ऐन कर्तृत्वाची बाराचौदा वर्षे त्याकरितां खर्च करावी लागतात चोविसावे वर्षी एखादा तरुण निश्चित ध्येयानें एखाद्या कार्यक्षेत्रात जर अचुक यत्न करीत उतरेल तर त्याचे मधुर फळ वयाच्या चाळीस वर्षांपर्यंत त्याच्या पदरी खास पडल्याविना राहणार नाही. पुष्कळ तरुण गतानुगतिक असतात एकाने केलें म्हणून दुसऱ्याने करावयाचे हा अधपरंपरा न्यायच सर्वत्र दृष्टीस पडतो. पुष्कळ विद्यार्थी मुळी ध्येयाचा विचारच करीत नाहीत. आणि कित्येक जे करीत असतात ते केवळ मनोराज्यच असतें. कुणी म्हणतो मी परदेशाला जाणार, कुणी म्हणतो मी इंग्लडात व अमेरिकेत जाऊन अमुक विद्या शिकणार, कुणी जपानची, कुणी जर्मनीची, कुणी परान्सची भाषा बोलत असतो, द्रव्य जमविण्याची तयारी करतो, पण पुष्कळ वेळा स्वत चे ध्येय अनिश्चित असल्यामुळे काही साधत नाही. अर्थात् महत्त्वाकांक्षेच्या ऊर्मी जेथल्या तेथें जिरतात आणि मग हे आत्मप्रत्ययशून्य विद्यार्थी कुठें तरी व कांहीं तरी करीतच बसलेले आढळतात !

स्वतःचे योग्य निरीक्षण न करिता, स्वतःच्या शक्तीचा अंदाज न घेतां भलत्या आकाक्षा धारण करणारे तरुण हे पुष्कळ वेळां लोकाना शिव्या देत बसलेले आढळतात. कोणी बॅरिस्टर, कोणी वकील, कोणी डॉक्टर, कारखानदार अशी ध्येयें ठेवून खूप पैसा मिळविण्याचे मनोराज्य करीत असतात पुढें मनोराज्य ढासळतें; मिळालेल्या पैशात समाधानानें राहण्याचे संस्कार नसल्यामुळें हे असले लोक इतके नादान बनतात की त्यांचेकडे पाहून कीवच येते. पुस्तकातले उच्च विचार उडून जातात, मन हलके होतें, अपेक्षेप्रमाणें पैसा नसल्यामुळे ना प्रपच, ना देशकार्य, ना लौकिक असे होऊन पुष्कळांची स्थिति त्रिशंकूप्रमाणे होते.

विद्यार्थ्यांमध्ये अभिनिवेश, दम व आत्मविश्वास असा पाहिजे की, मी माझ्या क्षेत्रात कुठे तरी व केव्हा तरी खास चमकणार दीर्घोद्योग, चिकाटी व दृढनिश्चयाच्या अभावी आज हे कर, उद्या ते कर, परवा हे शीक, नतर दुसरेच काही तरी कर, अशा चाचल्यामुळे पुष्कळांच्या आयुष्याला स्वरूपच येत नाही. या सर्व अपयशाचे कारण म्हणजे विद्यार्थी आपले ध्येय ठरवीत नाहीत हे होय !

सांप्रत विद्यार्थ्यांमध्यें उत्साह नाही, अभ्यासाविषयीं आस्था नाही, विविध विषय खोल बुद्धीनें अभ्यासण्याची हौस नाहीं, एकादें काम नेटानें करण्याची हिंमत नाहीं, अशी तक्रार पुष्कळ शिक्षक व पालक करीत असतात. पण ही स्थिति होण्याचें कारण ध्येयाचा अभाव हेंच होय.

विद्यार्थी जे गप्पागोष्टी, टिवल्याबावल्या व टिंगल करीत बसतात, आपुकमापुक वाचून मनोरंजन करुन घेतात याचें कारण शिकून व पास होऊन मुद्दां पुढील मार्ग दिसत नाही हे होय. सांप्रत दुर्दैवानें आपल्या राष्ट्रांत गुणापेक्षां जातीला मान फार आला आहे. गुणहीन, विद्याहीन माणसें केवळ अमुक एका जातीची म्हणून पुढें येत आहेत. पैशाच्या जोरावर निवडणुकी जिंकून •सी दिवाणही होत आहेत, हें दृश्य पाहून तरुणांना विद्या, कर्तृत्व, शील यांविषयीं कशी आस्था वाटेल? तथापि विद्यार्थ्यांनी हें ध्यानीं ठेवावें की सांप्रतची संक्रमणावस्थेतील स्थिति सदैव टिकणार नाही. पैशापेक्षा गुणाला, जातीपेक्षां कर्तृत्ववान् माणसाला मान जगाच्या अंतापर्यंत मिळणार आहे. पैसा हें साध्य नसून साधन आहे. यास्तव सुविद्य, सुशील व सुसस्कृत नागरिक होण्याचें ध्येय केव्हांही उच्च आहे.

गेल्या अर्ध शतकाचें सिंहावलोकन केल्यास असें दिसेल की तरुणापुढें प्रथम उत्तम नोकर होणें हे ध्येय होतें. त्यानंतर नोकरीची रुपेरी बेडी तोडून देशभक्त होण्याचें ध्येय पुढें आलें. देशाकरिता पुष्कळांनी आत्यंतिक त्याग केला, कष्ट सोसले, कित्येकांनी स्वार्थाची होळी केली आणि कित्येकांचीं कुटुंबें नर भिकेस लागली. आज मात्र स्थिति अशी आहे की तरुण पिढी ही बेकारीमुळे ध्येयविहीन, उदासीन व निराश झालेली दिसते!!

पण तरुणांनी इतकें निराश होण्याचें कारण नाहीं. राष्ट्राचें आयुष्य हें शतकांनीच मोजावयाचें असतें. अवघें पाव शतक आता कोठें कार्याला झालें आहे. आणखी पंचवीस वर्षे तरी असा सतरंगीर उपक्रम जोरानें केल्यास त्याचें फळ मिळाल्याविना राहणार नाहीं. गेल्या पाव शतकांत इंग्रजी राज्याचा अधिक परिचय झाला, नोकरशाहीचा पहिला डौल गेला, परक्या गोष्टींबद्दलचें •कुतूहल नष्ट झालें; आणि पद्धतशीर यत्न करण्याची दिशा अधिक स्पष्ट झाली. राजकीय जुलूम जसा नको तसा सामाजिक व धार्मिक जुलमही आता नष्ट करण्याकडे प्रवृत्ति होऊ लागली असून गेल्या पंचवीस तीस वर्षांत सामाजिक

मळवळीनें खानपान, पोषाख, आचारविचार, भावना, कल्पना, विद्या व व्यवसाय अशा सर्व क्षेत्रांत एकरूपता उत्पन्न केली आहे पुण्याचा ब्राह्मण, *मुंबईचा भाटचा, मरु प्रदेशातील मारवाडी, कलकत्याचा बाबू, अलाहाबादचा* भैय्या याच्यामध्यें सांस्कृतिक एकरूपता पुष्कळ आली असून, स्पृश्य अस्पृश्य, ब्राह्मण अब्राह्मण, हिंदु अहिंदु, अशा सर्वांमध्यें विचार, नीति, भावना आणि ध्येयें यांसबंधी एकवाक्यता उत्पन्न होऊं लागली आहे स्वराज्य हे आता मिळण्याच्या मार्गावर आहे, आणि त्याला उपयुक्त अशा प्रकारची तयारी धार्मिक, सामाजिक क्षेत्रात चालू आहे यास्तव तरुणानी निराश न होता अधिक व्रतशील, अधिक विवेकी, अधिक दमाचे होऊन निश्चित ध्येयदृष्टी बनले पाहिजे.

राष्ट्राला स्वातन्त्र्य प्राप्त करून देणे, राष्ट्राचा दर्जा वाढविणे, हे आज *आपल्या राष्ट्राचे ध्येय आहे जगातील परतंत्र राष्ट्रानी स्वतन्त्र होण्याकरिता* जे उद्योग, जी घटना, जी रचना केली, आज जगातील तरुणवर्ग कसा संघटित होत आहे, तिकडे बारकाईने लक्ष देणें, त्याचा अभ्यास करणे, हे आजच्या तरुणाचें एक कर्तव्य आहे वर्तमान जगातील हालचालीकडे जसे तरुणानी पाहिले पाहिजे, तसेंच आपल्या भूतकालीन इतिहासातील काही घडामोडी अभ्यासिल्या पाहिजेत कारण त्यातूनही आपल्या आजच्या जीवनाला उपयोगी पडण्याजोगा एखादा ग्राह्य अंश निघू शकेल ! राष्ट्रातील सपन्न तरुणानी मनाशी अशा प्रतिज्ञाच केल्या पाहिजेत की, आपले राष्ट्र स्वतन्त्र व वैभव-संपन्न होण्याकरिता आम्ही अमुक एक करणार ! निश्चित ध्येय व निश्चित *साधने यावरच तरुणाची आयुष्ये आदर्शभूत होतात. अतएव तरुणांनी आपल्या* आयुष्याचे ध्येय उच्चात उच्च, आकर्षक आणि आपल्या परिस्थितीच्या दृष्टीने आटोक्यातील असे ठरविले पाहिजे

गेल्या पाव शतकातील झालेली सर्व स्थित्यतरे लक्षात घेऊन तरुणानी भविष्यकालीन ध्येय ठरविले पाहिजे भविष्यकाल हा धर्मगुरूंचा, प्रेषिताचा, अवताराचा नसून बुद्धिप्रधान, विज्ञानवादी, जबाबदार नागरिकाचा आहे. नागरिकाचे पहिले लक्षण राष्ट्रीयत्व हे आहे. जगातील सर्व राष्ट्रें राष्ट्रीयत्वाच्या भावनेवरच जगत आहेत. विश्वबंधुत्वाची कल्पना मोठी उच्च व उदात्त जरी असली तथापि ती अवजड व न झेपणारीच आहे राष्ट्रीयत्व.

ही कल्पना विश्वबंधुत्वाच्या थलीकडची असली तथापि तीच व्यवहार्य आहे, आणि जीवनाला उपयुक्त आहे.

भविष्यकाळ हा भौतिक शास्त्रसंपन्नतेचा, देशाभिमानाचा व संघटितपणाचा आहे. ज्याच्याजवळ हें सर्व त्याच्या हातात सत्ता, असा हा मामला आहे. भविष्यकालीन स्वराज्य हे संघटितपणा, देशाभिमान व शास्त्रीय शोध यांवर टिकणारे असल्यामुळें तरुणांनी ज्ञानाची व शास्त्राची सर्व क्षेत्रे पटकावली पाहिजेत. पुढील पंचवीस वर्षात या अखिल भारतात दहा हजार शास्त्रज्ञ निर्माण झाले पाहिजेत. मानवी जीवनाची विविध अगें वाढत असून प्रत्येक अंगावर व उपांगावर अनेक शास्त्रें उत्पन्न होत आहेत. या सर्व शास्त्रांची उपेक्षा करून भागणार नाही. पूर्वी आपल्याकडे न्याय, व्याकरण, वेदांतादि सहाच मुख्य शास्त्रें होतीं. पण हल्ली जवळ जवळ सहाशें शास्त्रें झालेली आहेत. आरोग्यशास्त्र, शिक्षणशास्त्र, भूगोलशास्त्र, खगोलशास्त्र, मानवशास्त्र, वंशशास्त्र, मस्तिष्कशास्त्र, भूपृष्ठशास्त्र, खनिजशास्त्र, पदार्थ-विज्ञानशास्त्र, रसायनशास्त्र, विद्युत्शास्त्र, वायुशास्त्र, भाषाशास्त्र, प्राणिशास्त्र, जतुशास्त्र, पिंडशास्त्र, भूस्तरशास्त्र, जीवशास्त्र, अशी एक ना दोन किती सांगावी? या सर्व शास्त्रामध्ये भारतीय तरुण चमकले पाहिजेत आणि ते सर्व लंडन, बर्लिन, पॅरिस, न्यूयॉर्क अशा मोठमोठ्या ठिकाणाच्या शास्त्रज्ञांच्या मांडीला मांडी लावून बसले पाहिजेत. एखादा बोस, एखादा रमण, एखादा रॉय, एखादा गोडबोले होऊन काम भागणार नाही. या शास्त्रज्ञांनी आपल्या भारताचा लौकिक खास वाढविला आहे यात शंका नाही! पण जगांतील शास्त्रीय ज्ञानाच्या सर्व शाखा भारतीय तरुणांनी भरून काढल्या पाहिजेत. विद्वान्, शोधक, मुत्सद्दी, कारखानदार, कलानिधी अशा विविध नात्यांनी जगांत जे जे मोठे लोक असतील, त्यांच्याशी आपले दळणवळण सुरू ठेवून आपण त्यासारखे होऊन आपल्या राष्ट्राचा लौकिक वाढविण्याची आकांक्षा तरुणांनी बाळगिली पाहिजे व परदेशांमध्ये याच उच्च हेतूनें गेलें पाहिजे.

पुष्कळ तरुण परदेशांत केवळ चैनीकरिता जातात. श्रीमंत विद्यार्थी तिकडे जाऊन नाना प्रकारचे रंग करतात व येतांना बरोबर गोरकाय लटांबर घेऊन येतात. निश्चित ध्येय, निश्चित यत्न व त्याकरितां अवश्य तेवढी

सर्व मिळुना अशा पद्धतीने जे परदेशात जातील, त्यानाच काही तरी करता येईल व अशाचीच राष्ट्राला जरूर आहे.

काही तरुणानी धर्म व समाजकारण इकडे लक्ष देऊन ही दोन्ही राष्ट्रीय ध्येयाला पोषक होतील असा यत्न करावयास पाहिजे शिस्त, धिमेपणा, दूरदृष्टि, चिकाटी, करारीपणा, राष्ट्रप्रेम व राष्ट्राच्या कीर्तीची चाड, लोकोत्तर कर्तव्यनिष्ठा, शोधकता, सहकार्य, स्वाभिमान, आत्मविश्वास, संघटना आणि यशासारखे काम करीत राहणे, हे गुण इग्रजापासून घेण्यासारखे आहेत. इंग्रजाचे राज्य हे परकीय तर खरेच ! पण ज्या गुणामुळे त्यानी आक्रमण केले त्या गुणाकडे दुर्लक्ष करून कसे भागेल ?

आपल्या देशात सामाजिक व सामुदायिक जीवन अद्याप यावयाचे आहे. आपणच नियम करून त्या नियमाचे दास्यत्व पतकरणे हा मोठाच गुण समजला पाहिजे. ही वृत्ति अगदी खालच्या थरापासून तो वरच्या थरापर्यंत आणण्याचा यत्न तरुण पिढीने केला पाहिजे गेल्या पिढीने शिक्षणविषयक संस्था व स्थानिक स्वराज्य संस्था एवढ्याच चालवून दाखविल्या. इतर अनेक संस्थाना अद्याप प्रारंभ व्हावयाचा आहे. समाजात द्वेष, उदासीनता, सुटकपणा, मत्सर, बेपर्वाई व देशाभिमानशून्यता, समूहरूपाने कार्य करण्याची नालायकी, स्वार्थाची हाव, आळस, हेळसांड, परावलंबन इत्यादि जे दोष कित्येक शतकापासून मुरलेले आहेत, ते सर्व या नव्या काळात नष्ट केलेच पाहिजेत गेल्या पिढीतील दोष टाकून पुढच्या पिढीने अधिकाधिक जोरकस व उच्च ध्येयसपन्न झाले पाहिजे.

### जयाकरितां जग

यावदादित्यस्तपति यावद्भ्राजति चंद्रमाः ।
यावत्प्लवायते वायुस्तावज्जीव जयाय च ॥

जोवर सूर्य तापत आहे, चंद्र प्रकाशत आहे, वायु वाहत आहे तोपर्यंत जग, मात्र जयाकरिता जग, असा येथे उपदेश आहे मनुष्य प्राणी हा स्थूल देहाने अल्पकाल जगला तरी कीर्तिरूपाने तो चिरजीव होतो. महत्कार्य करून कीर्ति मिळविणे ही आकाक्षा तारुण्यातच उदित होते. मनुष्याने दैन्यरहित *विजयी वृत्तीने, आत्मश्रद्धेने जगण्याचा हव्यास धरावा आणि स्वतःचे मन,* दुर्गुण, दुरिच्छा, दुष्ट सवयी यांवर प्रथम जय संपादन करावा. समाजांत

ज्या दुष्ट रूढी असतात त्यांवरही जय मिळविला पाहिजे. वेडगळ कल्पना, भ्रामक समजुती, स्वतःचे व राष्ट्राचे हितशत्रु, कामक्रोधादि विकार या अन्तर्बाह्य शत्रूंवर जय मिळवून कोणत्या तरी शाखेत आपण भरीव कामगिरी करणार, अर्थात् त्याकरिता आपला जन्म आहे, एवढे तरुणांनी अखंड ध्यानात वागविले पाहिजे.

प्रत्येक मनुष्य निखळ पंडित होत नाही, किंवा सेनापति होत नाही, हे जरी खरें असले तथापि प्रत्येक मनुष्य शास्त्री, हरिदास, पुराणिक, वैदिक, व्यापारी, वकील, डॉक्टर, भंगी, शेतकरी, सराफ असा कोणी तरी होतोच. आपापल्या शाखेत मी उत्तमात उत्तम होईन, असे ध्येय सामान्यांनासुद्धा दृष्टीपुढे ठेवता येते. सामान्य माणसात असा जिवतपणा आला की त्यातूनच विशेष ध्येयाची व अभिनिवेशाची माणसे निपजत असतात. म्हणून प्रत्येक विद्यार्थ्याने आपल्या आयुष्याचे ध्येय अठरा ते वीस वर्षांपर्यंत निश्चित केले पाहिजे. आपले ध्येय ठरविण्याकरिता विद्यार्थ्यांनी आपले शिक्षक, आपले पालक व आपले हितचिंतक यांचेही अवश्य ते साहाय्य घ्यावे. पुष्कळ पालक केवळ जन्महेतु आणि शिक्षक केवळ टाकभाड्याने काम करणारे असे असतात हे खरे. तथापि पुष्कळ पालक व शिक्षक विचारसंपन्न व अनुभवसंपन्न असतात, तेव्हा त्यांचा उपयोग शक्य तेवढा करून घेणें योग्य आहे.

नवयुगीन भारतीय विद्यार्थ्यांनो! तुमच्याकरिता अनेक कार्यक्षेत्रें वाट पाहत आहेत. "माणसाचा दुष्काळ व कामाचा सुकाळ," असे सूत्र सर्वत्र घोषित केले जाते. प्रत्येक गावात, शहरात, संस्थेत, जोमदार, स्वाभिमानी, कार्यकुशल अशी माणसे पाहिजेच आहेत. राष्ट्राला शास्त्रज्ञ पाहिजेत, लेखक, वक्ते व कवीही पाहिजेत, वीर, मुत्सद्दी व संशोधक पाहिजेत. चित्रकार, शिल्पशास्त्री, कारखानदार, सवई, शेतकरी असे एक ना दोन हजारों क्षेत्रात हजारों माणसे पाहिजे आहेत. सर्वांना काम आहे व सर्वांची आवश्यकता आहे, हे सर्व ध्यानात घेऊन तारुण्यीच उराउठी ध्येयाचा निश्चय करा.

---

प्रकरण ४ थें

# हे मारक विचार फेकून द्या

*गेल्या प्रकरणात सांगितल्याप्रमाणे भारतीय विद्यार्थ्यांनी आपल्या* एकंदर परिस्थितीचा विचार करून आपले ध्येय ठरवून ध्येयसिद्धीच्या उद्योगास लागावे. विशिष्ट ध्येय व विशिष्ट आकांक्षा धारण करून सतत धडपड करणारा मनुष्य प्राणी आहे. ह्यास्तव ध्येयसिध्यर्थ सतत यत्न करणे हे क्रमप्राप्त येते. कोणत्याही माणसाची किंमत त्याच्या ध्येयावरून जशी ठरते त्यापेक्षा त्या ध्येयाकरिता तो किती व कसा यत्न करीत आहे, यावरूनच त्याची खरी किंमत अजमावता येते. ध्येय कोणतेही असो. कोणतेही ध्येय गाठण्याला जे अविरत आणि अखंड श्रम करावे लागतात, त्याच्या मार्गामध्ये अनेक विघ्ने आणून हताश व निराश करणारे जे विचार असतात त्यांची हकालपट्टी तरुणांनी प्रथमच केली पाहिजे. आडरानात जसे वाटमारे भेटतात व असेल नसेल ते लुबाडून नेतात, त्याचप्रमाणे ध्येयसिध्यर्थ निघालेल्या साधकाला गाठून वाटमाऱ्याचा धंदा करून त्याला फजीत करणारे जे हे पुढील विचार आहेत, त्यांना भारतीय विद्यार्थ्यांनी आश्रय देता कामा नये.

आपल्या समाजात पुढील जे दुर्बल विचार आहेत, त्यांचा संस्कार मुलाच्या मनावर लहानपणापासून होतो आणि लहानपणी एकदा संस्कार दृढ झाला की मग तो जाणे कठिण असते. म्हणून शकुन, मुहूर्त, भुतेखेते, कलिकाल, दैववाद, ग्रंथाचे अपौरुषेयत्व, जगाचे मिथ्यात्व आणि दुःखमयत्व, असल्या सर्व कल्पना नितान्त असत्य आहेत असे विद्यार्थ्यांनी प्रथमच समजावें.

मांजर आडवे आले, विधवा स्त्री पुढें आली, बोडका ब्राह्मण पुढें आला, की कार्यहानि होते, अशा तऱ्हेच्या समजुती समाजात आहेत. या सर्व दुबळ्या मनाच्या द्योतक आहेत. शिंक येणें, जांभई येणे, डोळा लवणें, बाहू स्फुरणें, तळव्याना कंड सुटणे हे सर्व शरीरधर्म आहेत. यांचा व कोणत्याही कार्यसिद्धीचा मुळीच संबंध नाही. वावटळ सुटणें, चंद्राच्या भोंवती खळें दिसणें, वीज पडणें, इंद्रधनुष्य दिसणें इत्यादि गोष्टी निसर्गनियमाप्रमाणे स्वाभाविक होतात. यांचा मनुष्याच्या कार्यास शुभ अथवा अशुभ या दृष्टीने

कांही उपयोग होत नाही. बाहेर पडले असतां समोर एकादें प्रेत येणें, भारद्वाज पक्षानें उजवीकडून जाणें, अंगावर पाल पडणें, घुबड, टिटवी यांचे शब्द कानी पडणें, कावळ्याने अंगावर बसणें, सरडयाचा स्पर्श होणें, याही गोष्टी काकतालीय न्यायाने घडतात ! त्यांत कांही हेतु असतो असे नाही. त्याचा व माणसाच्या कार्यसिद्धीचा बादरायण संबंधही असत नाही. तेव्हां हे शकुन आणि त्याचें शुभाशुभत्व हें सब झूट आहे, असेच विद्यार्थ्यांनी समजावे अंतस्फूर्ति हाच खरा शुभशकुन होय ! आतून कार्याची जोराची प्रेरणा उत्पन्न झाली की योग्य यत्नाला लागावें मग प्रेत पुढें येवो अगर विधवा पुढें येवो, कावळा डोक्यावर बसो अगर पाल अंगावर पडो, कुणाची व कशाची क्षिति न बाळगतां अचूक यत्न करीत असावें

शकुनाप्रमाणें मुहूर्ताचेंही बरेच वेड आहे, तेंही सर्व थोताड आहे. पुष्कळ माणसे व्यतिपात, वैधृति, दग्धयोग व मृत्युयोग हीं पंचांगात असली की प्रवासार्थ बाहेर पडत नाहीत. इंग्रजी कोर्ट या योगाना जुमानीत नसल्यामुळें पुष्कळ भोळया पक्षकारांचें ते कोर्टात न आल्यामुळें नुकसान होतें. पंचांगाच्या प्रत्येक पानावर मृत्युयोग व अमृतसिद्धियोग हे एकदोनदा तरी असतातच. मृत्युयोगावर आरंभिलेलें कार्य नष्ट होतें व अमृतसिद्धि योगावर आरंभिलेलें कार्य सिद्धीस जाते असे मुळीच नाही. कार्याच्या सिद्धीला लागणारी खरी कारणें निराळीच असतात ! पण भोळ्या माणसाना हे समजत नसल्यामुळें, त्याना मुहूर्ताचें महत्त्व वाटतें. शेतकऱ्याला तर पेरणें, वेचणें, खळें करणें, निवडा रोवणे, गजी घालणे यालासुद्धा मुहूर्त लागतो.

मुहूर्ताप्रमाणें फलज्योतिषाचें वेडही समाजात आहे. पण विद्यार्थ्यांनी हें लक्षांत ठेवावें की, आजवर जगात जे मोठे पुरुष होऊन गेले, ते कांही आपल्या पत्रिका घेऊन ज्योतिषांकडे कधीच गेले नव्हते नवग्रह हे जगात आहेत व त्यांची आकर्षणेंही आहेतच ! पण शनिमहात्म्य वाचल्यानें शनीची पीडा कमी होते, पांढरी वस्तु दिल्याने गुरूची पीडा कमी होते, आणि तावडया वस्त्राच्या दानानें मंगळाची पीडा कमी होते हें अत्यंत असत्य आहे. ग्रहांचे कार्य ग्रह करीतच आहेत, हे लक्षात ठेवून आपण आपले काम करीत रहावें, मेवढेंच विद्यार्थ्यांनी ध्यानात ठेवावें.

लहानपणी भूतें, मुंजे, समंध, डाकिणी, शाकिणी, हडळ यांच्याही गोष्टी

मुलांना सांगण्यात येतात. अद्भुतपणामुळे मुलांना त्या खऱ्या वाटतात पण त्यातही काही तथ्य नाही असेच समजावे. वरात ओल आली की मुले तेथे वावरल्यामुळे आजारी पडतात. त्यांना पडसे, खोकला आला की भुताचे अंगारे लगेच लावण्याल येतात. भुते व मुंजे बोकांडी बसल्यामुळे आजार येतो, हेही सर्व खोटे आहे. अलीकडे भुते पुष्कळ कमी झाली, याचे कारण अज्ञान नष्ट झाले हे होय!

पूर्वी औदुंबर, गाणगापूर, नृसिंहवाडी, अशा ठिकाणी शनि घेण्याकरिता भुते फार येत असत. पण अलीकडे त्यांची शिरगणती फार कमी झालेली आहे. पूर्वी दुर्याखोऱ्यात व अरण्यात वेताळाचे राज्य असे. हल्ली मोटारी व आगगाड्या यांच्या दणक्यामुळे त्यांची दाणादाण झालेली आहे. ज्ञान जसजसे वाढेल तसतसे भुताचे अस्तित्व व त्यापासून होणारे त्रास नष्ट होतील. म्हणून विद्यार्थ्यांनी भुताच्या कल्पना खऱ्या मानू नयेत हे उत्तम! भुते पछाडतात, बोकांडी बसतात, माणसाना पीडा देतात, ती सर्वसमर्थ आहेत, अशा समजुतीने स्वराज्यप्राप्तीकरिता एकादे भूत प्रसन्न करून घेण्याचा मार्ग जर कोणी अवलंबू लागेल तर ते वेड आहे असे समजून त्याचा धिक्कारच करावा!

भुते जशी अंगात येतात तशी कोणाच्या अंगी लक्ष्मी येते, बहिरोबा येतो, खंडोबा येतो असे म्हणतात. शिवाजी महाराजाच्या अंगी देवी भवानी येत असे. या समजुतीपासून तो आजच्या अंगात येण्याच्या ज्या कल्पना आहेत त्या सर्व झूट आहेत. प्रत्येक माणसाच्या हृदयात हृदयस्थ ईश्वर वास करीत असतो. त्या हृदयस्थाच्या प्रेरणेने मनुष्य कर्म करतो. ही प्रेरणा पूर्वसंस्काराप्रमाणे होते, एवढेच यातील सत्य आहे. हे सत्य ध्यानात ठेवून विद्यार्थ्यांनी वागावे.

शकुन, मुहूर्त, भुतखेते, याप्रमाणे आणखी एक मारक कल्पना समाजात वावरत आहे. ती म्हणजे कलिकल्पना होय. हल्लीचा काल कलिकाल आहे. कलीमध्ये धर्म नष्ट होतो. नीति बुडते, सत्य, ज्ञान, दया, परोपकार यांचा नायनाट होतो, लोक विषयलोलुप होतात. सारांश, जेवढे वाईट तेवढे या युगात होते, म्हणून माणसाने प्रतिकार न करता जे वाईट होईल, ते युगमहात्म्य समजून सहन करावे व स्वस्थ बसावे अशी समजूत प्रचलित आहे. नवयुगातील विद्यार्थ्यांनी या कलिकल्पनेला थारा देता कामा नये. सकाळ,

दुपार,सायंकाळ याप्रमाणेंच कृत, त्रेत, द्वापर व कलि ही कालाची नांवें आहेत. अमुक कालात तमुक होतें असें नाही. पाहिजे त्या कालात पाहिजे तें होते, अर्थात् ते सर्व करणाऱ्यावर अवलंबून आहे. खरें म्हटले तर हे जग करणाऱ्यांचें आहे. गाणाऱ्याचा गळा व रावणाऱ्याचा मळा म्हणतात त्याचप्रमाणें करणाऱ्याचें हे जग आहे.

हा कलि जपानमध्यें नाही, अफगाणिस्थानात नाही व इंग्लंडकडेही जात नाही. तो येथेच आहे, त्यावरून भित्र्या लोकांच्या मागें लागणारा हा प्राणी असें समजून भारतीय विद्यार्थ्यांनी त्याचे दमन केले पाहिजे. प्राचीन काळीसुद्धा ही आजची कलिकल्पना नव्हती. ही मध्यकाली आली. महाभारत व मनुस्मृत्यादि ग्रंथात 'राजा कालस्य कारणम्' व 'राजाहि युगमुच्यते' असेंच उद्गार आहेत. आजच्या कालांत 'प्रजाहि युगमुच्यते' असें म्हणावें लागेल. तात्पर्य कलीचें कृतयुग बनविणे हे आपल्या हातचे आहे. सचशक्ति, देशाभिमान, शोध व शास्त्र यावर जगातील राष्ट्रें या कालाला कृतयुग बनवीत असताना आम्ही मात्र कलियुग म्हणून स्वस्थ बसणें, हा वेडेपणा आहे.

लहानपणापासून विद्यार्थ्यांचा समज घरीं आणि दारीं असा एक केला जातो की दैवानेंच सर्व काही होतें; नशिबात असेल तर विद्या, राज्य, आरोग्य व मुलें मिळतात. नशीब पाहिजे. नशिबी असेल तर सर्व होतें असें म्हणून कपाळाला हात लावून बसण्याची प्रवृत्ति समाजात आहे. जगात जें काही मिळतें, तें अचूक यत्नाने मिळतें. दैवावर हवाला ठेवून स्वस्थ बसल्याने कोणीही विद्वान्, धनवान् व पराक्रमी होत नाही. दैवाने मुलगा पंडित होईल असें म्हणून त्याला शाळेंत न धाडता निरक्षर ठेवलें तर काय होईल? नशिबात असेल तर मृत्यु येईल म्हणून जर कोणी कड्यावरून उडी घालील अगर विषप्राशन करील तर काय होईल? तात्पर्य, दैववादाने जगात काही होत नाही. दैववाद हा वस्यांचा, दुबळ्याचा व रड्याचा मार्ग आहे. कर्त्या लोकांनी दैवाला लाथ मारली व आपला मार्ग चोखाळला. दैवाच्या नादीं जे लागले ते बुडाले. म्हणून विद्यार्थ्यांनी हा दैववाद मुळीच न मानता, उद्योगवादच पुढें आणला पाहिजे. उद्योगवादाला किती महत्त्व आहे हें सदैव ध्यानात राहावें म्हणून विद्यार्थ्यांनी पुढील वचनें तोंडपाठ करून ठेवावीत.

'आस्ते भग आसीनस्योर्ध्वस्तिष्ठति तिष्ठतः ।
शेते निपद्यमानस्य चराति चरतो भगः ॥ वेद ॥
अलसस्य दैवपरः क्षिप्रमेव विनश्यति । भारत ॥
विद्या तपो वा विपुलं धनं वा । सर्वं ह्युद्योगव्यवसायेन शक्यम् ॥ भारत ॥
मूढैः प्रकल्पितं दैवं तत्परास्ते क्षयं गताः ।
प्राज्ञास्तु पौरुषार्थेन पदमुत्तमतां गताः ॥ योगवासिष्ठ ॥
येत्याने होत आहेरे । आधी केलेचि पाहिजे ॥
यत्न तो देव जाणावा । अंतरीं धरिता बरें ॥
अचूक यत्न तो देवो । चुकणें दैव जाणिजे ॥ श्रीसमर्थ ॥

अर्थ — जो बसतो त्याचे नशिबही बसते. जो उभा राहतो त्याचे नशिबही उभे राहते. निजणाऱ्याचे दैव निजते व चालणाऱ्याचे नशिब त्याच्या मागोमाग येते. तात्पर्य, माणसाने उद्योगी व साक्षेपी झाले पाहिजे.

दैववादी मनुष्य निःसंशय समूळ बुडतो. विद्या, तप व विपुल धन इत्यादि सर्व उद्योगानेच मिळतात. मूढांनी कल्पिलेल्या दैवाच्या मागे जे लागले ते आटपले. पण ज्या महात्म्यांनी उद्योगाची कास धरली त्यांनी मात्र उन्नति करून घेतली.

विद्यार्थ्यांनी भविष्यकालाच्या दृष्टीने हीही एक कल्पना टाकून दिली पाहिजे की सर्व धर्मग्रंथ हे ईश्वराने केलेले आहेत. जगांत अनेक धर्म आहेत व अनेक धर्मग्रंथ आहेत अर्थात् ते अनेक ग्रंथ करण्याला अनेक ईश्वर मानले पाहिजेत जगात ईश्वर हा एकच पाहिजे व तो एकच बोलणारा पाहिजे. एकच ईश्वर अनेक धर्मग्रंथात जर परिस्थितीप्रमाणे वेगवेगळें बोलू लागेल तर ते ग्रंथ ईश्वराने केलेले नाहीत, असेच समजले पाहिजे. किंवा अनेक ईश्वर अनेक ग्रंथात परस्परविरुद्ध सांगतील तर तेंही अविश्वसनीय आहे, असें मानले पाहिजे. वेद, झेंदावेस्ता, त्रिपिटक, बायबल, कुराण इत्यादि सर्व धर्मग्रंथ माणसांनीच केलेले आहेत. अर्थात् त्या कालच्या मोठ्या माणसाची ती कृति आहे. त्यात ईश्वराचा मुळीच संबंध नाही असें समजावे.

ईश्वराने केलेला ग्रंथ हा माणसांना कसा कळणार ? तेव्हा बुद्धि अशी होते की हे ईश्वरकृत ग्रंथ नुसते पुजून ठेवावेत. फार तर त्यांना नमस्कार घालावा ! पण ही समजूत चुकीची आहे. ग्रंथ हे माणसानीच केलेले

असल्यामुळें ते माणसाकरितांच आहेत. अर्थात् ते माणसांनी वाचण्याला कांहींच हरकत नाहीं. ग्रंथ हा बुद्धीचा परिपाक आहे. ग्रंथ वाचून, विचार करून, बुद्धि चालवून माणसानें योग्यायोग्य निवडावें व वागावें; हाच ग्रंथांचा उद्देश असतो. तेव्हा कोणत्याही ग्रंथासंबंधीं अद्भुत, अपौरुषेय, अगडबंब अर्थात् ती ईश्वरी कृति अशा कल्पना न ठेवतां, त्या सर्व मनुष्यकृती आहेत व त्या सर्व माणसांकरतांच आहेत असें समजून चालावें.

विद्यार्थ्यांच्या मनावर 'जग हें असार आहे, क्षणभंगुर आहे, तें मिथ्या म्हणजे खोटें आहे, दुःखमय आहे, अशा तऱ्हेचे विचार लादले जातात. हेही विचार विद्यार्थ्यांनी स्वीकारूं नयेत. जगात कांही सार आहे व अर्थही आहे; म्हणूनच आपण जगतो व धडपड करतों. जग जर खोटेंच असेल तर तें गेली कित्येक हजार वर्षे अस्तित्वात का आहे? ते जर दुःखमय असेल तर माणसें पटापटा आत्महत्या कां करीत नाहीत? जग हें क्षणभंगुर नसून तें चिरकाल चालणारें आहे, म्हणूनच माणसें अनेक उलाढाली करतात. तात्पर्य, जग हें दुःखमय नसून आनंदमय आहे. क्षणभंगुर नसून चिरकाल टिकणारें आहे; तें खोटें नसून सत्य आहे. फार काय पण मनुष्याच्या कर्तृत्वाला क्षेत्र मिळावें म्हणूनच ईश्वराकडून हें जग उत्पन्न केलें गेलें! जगात राहून जगाशी वैर करण्याचें सोडून देऊन राष्ट्ररूपानें जो भाग परमेश्वरानें आपणाकरितां दिला आहे, त्यातील माणसांच्या उन्नतीकरिता आपला जन्म आहे; असेंच नवयुगांतील विद्यार्थ्यांनी समजलें पाहिजे.

विद्यार्थ्यांनी आणखी निःसंशय असें समजावें कीं कोणत्याही समाजातील जाती या परमेश्वरानें केलेल्या नाहीत. हिंदु समाजातील व इतर समाजातील सर्व जाती मनुष्यकृत आहेत. ईश्वराचा या जातीशी कांही संबंध नाही. पुष्कळ जाती धंद्यामुळें बनलेल्या आहेत. उदाहरणार्थ शिंपी, कुंभार, तेली, सुनार, न्हावी वगैरे. पुष्कळ जाती देशभेद, आचारभेद, उपासनाभेद व आहारभेद यांमुळें झालेल्या आहेत. शांति, लढाया, उत्पात, दुष्काळ अशांमुळेंही जाती बनतात. ईश्वरानें फक्त स्त्रीपुरुष निर्माण केले. बाकी सर्व माणसांतील भेद, जाति, उच्चनीचता व अस्पृश्यता ही सर्व माणसांनीच केलेलीं आहेत. कोकणस्थ व देशस्थ हे भेद देशामुळें झाले, स्मार्त व वैष्णव हे भेद उपासनेमुळें झाले. यात कोणीही उच्च

नाही, व नीच नाही. जन्माने सर्व मारखे आहेत. जन्मत कोणीही स्पृश्य नाही व अस्पृश्यही नाही. कारण अस्पृश्यता ही माणसानीच उत्पन्न केलेली आहे. ती माणसानीच काढून टाकली पाहिजे. असंख्य जाती माणसानीच उत्पन्न केल्या आहेत. त्या सोयीप्रमाणे माणसानी खुशाल कमी कराव्यात अमकी जात थोर व अमकी लहान असे काही नाही तसेच अमकी जात शुभ आणि अमकी अशुभ, अमुक जात स्पृश्य व अमुक अस्पृश्य असेही नाही माणसानीच आपल्या कल्पनेप्रमाणे हे सर्व ठरविले आहे अर्थात् ते सर्व परिस्थितीप्रमाणे माणसाना बदलता येते. हे विद्यार्थ्यांनी प्रथमच ध्यानी ठेवून उन्नतीच्या आड येणारे हे मारक विचार घालवून द्यावेत.

---

## प्रकरण ५ वें

# शक्ति, युक्ति व शील

शक्तीनें मिळती राज्यें । युक्तीनें यत्न होतसे
शक्ति युक्ति जयें ठायीं । तेथें श्रीमंत नांदती ॥ समर्थ ॥

तिसऱ्या प्रकरणात सागितल्याप्रमाणे विद्यार्थ्यांनी आपल्या आयुष्याचें ध्येय अथवा साध्य प्रथम ठरवावे त्या साध्याच्या मार्गात जे मारक विचार विघ्न करण्याकरता येतील त्याना गेल्या प्रकरणी सुचविल्याप्रमाणे थारा न देता, उद्योगास लागावे साध्य निश्चित झाले की साधने निश्चित ठरतात. साध्यानुसार साधने जमविणे हे एक कौशल्य आहे पुष्कळ विद्यार्थ्यांचे असे होते की त्याची साध्ये व ध्येये बदलत असतात त्यामुळें साध्यानुसार साधने जमविण्यातच आयुष्य जाते. किंवा साध्याला योग्य अशी साधने हाती नसल्यामुळें अपयश येते. प्रत्येक विद्यार्थ्याची बुद्धि, शरीरशक्ति, आर्थिक परिस्थिति ही भिन्न भिन्न असणार. अर्थात् त्या मानाने साधनेही निरनिराळी

असणार यांत शंका नाही. तथापि कोणतेही साध्य व ध्येय असले तरी प्रत्येक माध्याला सामान्यतः जी साधने आवश्यक आहेत, तीं म्हटली म्हणजे शक्ति, युक्ति व शील ही होत. प्रथम मनुष्य होण्याला व पुढे मोठा मनुष्य होण्यालासुद्धा हीच साधनें उपयोगी पडतात अशा सर्वमान्य आणि सर्वव्यापी साधनाचा विचार या प्रकरणात करतो.

शीर्षकामध्यें श्रीसमर्थाचे जे वाक्य दिले आहे ते नितांत सत्य आहे. जगांत ज्या उलाढाली होतात त्या शरीरबल व बुद्धिबल यांमुळेंच होतात. म्हणून माणसाला शक्ति पाहिजे व युक्ति पाहिजे; शस्त्र पाहिजे व शास्त्र पाहिजे. जग जे चालले आहे ते या दोहोंवरच चालले आहे. वसिष्ठ हे शास्त्री होते तर प्रभु रामचंद्र हे शस्त्री होते. गीतेतील योद्धा धनुर्धर पार्थ होता, तर त्याचा उपदेष्टा योगेश्वर म्हणजे महायुक्तिमान् श्रीकृष्ण होता. म्हणूनच गीतेच्या उपसंहारात योगेश्वर आणि धनुर्धर हे एकत्र झाले की तेथे 'श्री, विजय, भूति, नीति' इत्यादि नांदतात असे म्हटले आहे. इतिहासातसुद्धा अशा शक्तियुक्तीच्या जोड्या जेव्हा एकत्र येतात, तेव्हाच जगात काही अद्‌भुत होते असे दिसते. ग्रीस देशातील तत्त्ववेत्ता ॲरिस्टॉटल् व त्याचा शिष्य शिकंदर तसेच आपणाकडील श्रीसमर्थ रामदास स्वामी व छत्रपति शिवाजी महाराज यांच इतिहासही असाच आहे. व्यक्तीच्या व समाजाच्या उन्नतीला जे काही पाहिजे ते शक्ति, युक्ति आणि शील यांचा समन्वय होय! आज जगात जी सुधारलेली राष्ट्रे आहेत, तेथील लोकांची बुद्धि शक्ति विविध शास्त्रीय ज्ञानाच्या रूपाने वाढलेली आहे. तसेच प्रत्येक माणसाची शरीरशक्ति व आयुर्मान हीसुद्धा आरोग्यशास्त्राचे नियम यथायोग्य पाळले जातील अशा परिस्थितीमुळे वाढलेली आहेत. त्या सर्व राष्ट्रामध्ये राष्ट्रीय शील, राष्ट्रीय सद्‌गुण, देशाभिमान हा इतका जाज्वल्य आहे की या शीलावरच ती राष्ट्रें जगात पुढें आली आहेत.

ब्रह्मचर्याश्रम वा विद्यार्थीदशा ही मुख्यतः शरीरबलवृद्ध्यर्थ आहेत. म्हणून विद्यार्थ्यांनी 'शरीरमाद्यं खलुधर्मसाधनम्' ही कालिदासोक्ति अथवा 'नायमात्मा बलहीनेन लभ्यः' हा श्रुतिसंदेश सदैव डोळ्यापुढे ठेवावा गीतेतही भगवान् 'बलवतांचे बल मी आहें' असे म्हणतो (अध्याय ७). जगात न्याय, नीति ही थोडीबहुत असली तरी ज्याच्या मनगटात जोर तो

शिरजोर अथवा 'बळी तो कान पिळी' हाच न्याय सर्वत्र आहे. शरीर हेंच सर्व पुरुषार्थाचें मूळ! शरीर हेंच कर्तृत्वाचें साधन! शरीर हेच जगांतील अनेक उपभोग घेण्याचेंही साधन. शरीर म्हणजे जग व शरीर म्हणजेच आयुष्य म्हणून सर्व संपत्तीमध्यें शरीरसंपत्तीला अग्रस्थान आहे. गुळ्यापागळ्या श्रीमतीपेक्षां धट्टीकट्टी गरिबी बरी म्हणतात ते अक्षरशः खरे आहे. धिप्पाड व बळकट शरीर आणि उदात्त व विशाल बुद्धि ही जर माणसाजवळ असेल तर त्याला काय कमी आहे? म्हणून विद्यार्थ्यांनी या शरीरसंपत्तीकडे मुळीच दुर्लक्ष करू नये. दोन माणसातील साध्या झटापटीपासून तो महायुद्धापर्यंत सर्वत्र कणखर व धट्टाकट्ट्या शरीराची आवश्यकता सारखी आहे. शरीर निरोगी असलें की मन प्रसन्न असतें. मन.प्रसादामुळें विचार चांगले सुचतात व त्यामुळे कार्य उत्तम होतें. आमच्या तरुण पिढीवर पूर्वीपेक्षा पुढच्या काळांत कार्याचा भार अधिक पडणार आहे. म्हणून ते खरोखरीच शरीरानेंसुद्धा स्नभामारनें झाले तरच ते राष्ट्राचे आधारस्तंभ होतील.

यापुढें जगांत कांहींही करण्याला, फार काय पण जिवंत राहण्यालासुद्धां शरीरबलाची फारच आवश्यकता आहे म्हणून शरीरबलाकडे विद्यार्थ्यांनी लक्ष देऊन ती पहिली संपत्ति वयाच्या अठरा ते पचवीस वर्षापर्यंत मिळवून ठेवली पाहिजे. या वयांत एकदा का दुर्लक्ष झाले आणि शरीर एकदा दुर्बल बनलें की सर्व आयुष्य फुकट गेलें असें समजावें

### बुद्धिर्यस्य बलं तस्य ।

विद्यार्थ्यांनी विद्यार्थीदशेंत शरीरबलाप्रमाणें दुसरे जें साधन मिळवावयाचें तें बुद्धिबल हें होय! मनुष्यत्व म्हणजे बुद्धि. पशु व मनुष्य यांत बुद्धीचेंच अंतर मनुष्य प्राणी हा विचारवान् आहे. पशूला विचार करतां येत नाही ज्याची बुद्धि अधिक विचारी, अधिक सूक्ष्म व दूरचें पाहणारी तोच जगात मोठा होय. म्हणून अभ्यास करणें, विचारशक्ति वाढवणें, अनेक प्रकारची माहिती संग्रही ठेवणें हा सर्व उद्योग बुद्धिबलासाठी केला पाहिजे. बुद्धि प्रगल्भ होण्याला आणि तिजमध्यें कुशाग्रता येण्याला त्या बुद्धीवर विचाराचें चांगलेंच घर्षण करावें लागतें जगात जे मोठे झाले ते नुसते गलेलठ्ठ पैलवान नव्हते. गलेलठ्ठ पैलवानालासुद्धा कुस्तींत जर नाव करावयाचें असेल तर त्याला त्या शास्त्रांतील म्हणून पुन्हा बुद्धीही लागतेच. नुसतें डोकें मोठें,

व शरीर लुकडें, हे जसें अयोग्य त्याचप्रमाणें अक्कलशून्य व धिप्पाड शरीरही अयोग्यच होय. बुद्धिबळ व शरीरबळ यांचा मिलाफ पाहिजे. शरीरबलाकरता रोज व्यायाम जसा पाहिजे तसाच बुद्धिबल वाढविण्यासाठी बौद्धिक व्यायामही पाहिजेच! बुद्धीला अनेक फाटे फुटण्याचा संभव असतो. कुळंचट व अडाणी समजुती करून दिल्या जातात, त्या सर्वांपासून अलिप्त राहून बुद्धीला शुद्ध ठेवून तिचा उपयोग ज्ञानाकडे करणें हा विद्यार्थीदशेतील परम पुरुषार्थ होय!

विद्यार्थ्यांनी विद्यार्थी-दशेंत तिसरें जे महत्त्वाचे साधन हस्तगत करावयाचें तें म्हणजे शील हें होय! शील व चारित्र्य हे शब्द इतके व्यापक आहेत की त्यात सर्व सद्गुणाचा समावेश होतो. जितुकें काही उत्तम गुण। ते समर्थाचे लक्षण ।। असे समर्थ म्हणतात. त्याचप्रमाणे सत्य, सदाचार, दानत, निःस्पृहता, नियमितपणा, स्वाभिमान, सहकार्य, कर्तव्यदक्षता, व्यवस्थितपणा, टापटीप, शिस्त, अंग मोडून काम करणें, पाहिजे तें करण्याची वृत्ति असणें, तात्पर्य सर्व तऱ्हेच्या चांगल्या सवयी व सर्व सद्गुण या सर्वांचा अंतर्भाव शीलामध्यें होतो. मोठेपणी पुष्कळ माणसें आत्मनिरीक्षण करू लागली म्हणजे म्हणत असतात की "छे. बुवा! हें आपल्याला येत नाही. तें करवत नाही, आपल्या स्वभावाला तें जमत नाही, नाइलाज आहे इ०" असें होण्याचें कारण हेंच की तारुण्यांत त्यांनी आपल्या स्वभावाकडे व सवयीकडे जेवढें लक्ष द्यावयास पाहिजे होतें तेवढें दिलें नाही.

मनुष्यामध्ये शारीरिक व्यंगें असली तर त्यावरसुद्धा हल्ली उपाय निघाले आहेत. मग ज्या दुष्ट मानसिक वृत्ति असतात, त्या घालविणे अशक्य आहे काय? आळस, मत्सर, ऐदीपणा, अव्यवस्थितपणा, अप्रामाणिकपणा, कोतेपणा असले एक ना दोन किती तरी अवगुण विद्यार्थ्यांमध्यें असतात. विद्यार्थ्यांनी आपापल्या या अवगुणाकडे सारखें लक्ष दिले पाहिजे आणि सभ्यता, शालीनता, देशाभिमान, उद्योग, उत्साह इत्यादि अनेक सद्गुणांचा समुच्चय जे शील तें अंगी आणलें पाहिजे. त्याविषयीची एक गोष्ट पुढीलप्रमाणें आहे.

दुर्योधनानें धर्माला पराजित करण्याकरता जंग जंग पछाडलें, पण सर्वत्र लौकिक धर्माचा व दुर्लौकिक दुर्योधनाचा, अशी स्थिति झाली! दुर्योधन एकदा चिंताग्रांत बनला असतां धृतराष्ट्रानें त्याला विचारलें की

'तूं असा गोंकाकुल का आहेस ? ' तेव्हा दुर्योधन म्हणाला की 'कांही केले तरी धर्माचे महत्त्व काही कमी होत नाहीं म्हणून मला वाईट वाटते '. तेव्हा धृतराष्ट्र म्हणाला 'बाबा ! तुला जर धर्माची बरोबरी करावयाची असेल तर शीलवान् हो. या शीलाने सर्व जगाला जिंकता येते अरे ! या शीलाचा महिमा काय सांगू ?

शीलवान् भव पुत्रक ॥

हे पहा. एकदा शीलसंपन्न प्रल्हादाने इंद्राला पराभूत करून त्याचें राज्य घेतलें. राज्यभ्रष्ट झालेला इंद्र गेलेले राज्य परत मिळवण्याचा यत्न करू लागला प्रथम तो देवगुरूकडे गेला व नंतर तो दैत्यगुरूकडे गेला व शेवटी वेषांतर करून आपल्या शत्रूकडे गेला बटुवेषधारी इंद्राने आपला शत्रु दैत्याधिपति जो प्रल्हाद त्याची बारान् बारा चोवीस वर्षे उत्कृष्ट सेवा करून प्रसन्नता संपादिली. त्या काळच्या पद्धतीप्रमाणे प्रसन्न झालेल्या प्रल्हादानें पाहिजे तो वर माग असे म्हणताच बटुवेषधारी इंद्रानें राज्य, वैभव न मागता ज्या शीलाच्या योगाने प्रल्हाद त्रैलोक्याधिपति झाला ते शीलच मागितलें. प्रल्हादानें शीलाचे उदक त्याच्या हातावर सोडताच त्याच्या शरीरांतून एकेक सद्गुण दिव्य ज्योतीच्या रूपाने बाहेर पडू लागला धर्म, सत्य, सदाचार, बळ आणि इतर जे सद्गुण होते ते एकामागून एक तेजोरूपाने इंद्राच्या शरीरात प्रविष्ट झाले. शेवटी राज्यलक्ष्मीरूपी स्त्रीही ज्योतिरूपाने इंद्राकडे गेली व तिने त्याला राजा बनविले गेलेले राज्य परत मिळवू इच्छिणाऱ्यांनी हे भारतांतर्गत शांतिपर्वातील शीलाख्यान (अध्याय १२८) मनन करण्यासारखें आहे. पारतंत्र्यपंकात पडलेल्या आपल्या या राष्ट्राच्या उद्धाराकरता शीलाची फार जरूरी आहे परस्पर प्रेम, परस्पर विश्वास, सहकार्य, निर्मत्सरता, सौजन्यता, स्वाभिमान, कर्तव्यदक्षता, देशाभिमान, त्याग, धडाडी, धैर्य, साहस, अचंचलपणा, करारीपणा, समाजसेवेची वृत्ति, स्वच्छता, मनाचे पावित्र्य, इत्यादि सर्व सद्गुणांची म्हणजे शीलाची तीव्र आवश्यकता राष्ट्राला आहे. म्हणून विद्यार्थ्यांनी दररोज शरीरबलाचा, बुद्धिबलाचा, व शीलाचाही अभ्यास अवश्य केला पाहिजे ; ही साधनत्रयी हस्तगत करण्याचा नित्य अभ्यास ठेवला पाहिजे. म्हणून अभ्यासाची महती सांगण्याकडे आता वळतो

## प्रकरण ६ वें

# जयत्यभ्यासभास्करः।

भारतीय विद्यार्थ्यांनी आपले ध्येय ठरविले व त्या ध्येयाची साधनेंही निश्चित ठरविली, तथापि ती काही एकदम हस्तगत होतात असे नाही. कारण ध्येय शब्दच आंतरवाचक आहे. ध्येय व ध्याता यांमध्यें अंतर असते, म्हणूनच ध्येय गाठावयाचे असे आपण म्हणतो. ध्येयाकरता लागणारी साधनें प्रथम मिळवावीं लागतात. बुद्धिबल, शरीरबल, चांगल्या सवयी, व शील ही काही आकाशातून एकदम कोसळत नाहीत किंवा पृथ्वीतून वर उमळतही नाहीत ती साधनें नित्य अभ्यासानें संपादावयाची असतात. शाळेत शिकणाऱ्या विद्यार्थ्याला अनेक विषयांचा अभ्यास रोज थोडा थोडा करूनच ईयत्ता पुरी करावी लागते. ज्ञान, सद्गुण आणि शीलसंपादन यांचेंही तसेंच आहे

प्रत्येक विद्यार्थ्यानें स्वभाषेचें ज्ञान उत्तम करून घ्यावें. राष्ट्रभाषा व जागतिक भाषा यांचेंही ज्ञान अवश्य आहे. आपल्या राष्ट्राच्या इतिहासाचें ज्ञान प्रत्येक विद्यार्थ्याला पाहिजे आहे. स्वराष्ट्रेतिहास, स्वभाषा आणि स्वसंस्कृति याकडे जे दुर्लक्ष करतात त्यांना पूर्वपरंपरेच्या अभावी पुढे अचूक यत्न करण्यास उत्साह वाटत नाही संस्कृतीचा आत्मा स्वभाषा हा आहे. स्वभाषेचें ज्ञान उत्तम झालें म्हणजे इतर भाषाही झटाझट उचलता येतात विद्यार्थ्याला निदान स्वभाषेत आपले विचार व आपले मनोगत व्यवस्थितपणें सांगण्याजोगें वक्तृत्व पाहिजे, व लेखनकलाही पाहिजे. प्रत्येक विद्यार्थ्याला पुढे नागरिक व्हावयाचे आहे. म्हणून नागरजीवनाशीं संबद्ध अशा सर्व संस्थांचे व शास्त्रांचें ज्ञान विद्यार्थ्यांना हवे. आरोग्यशास्त्र, वैद्यक, पदार्थविज्ञान, हिशेब-ठिशेब, गणीत, अक्षर, सुतारकाम, गवंडीकाम, शिवणकाम, गायन, चित्रकला, इत्यादि विषयाचे ज्ञान विशेषतः प्राथमिक सर्वसामान्य ज्ञान अवश्य लागतें. सर्व विषयाचें विशेष ज्ञान प्रत्येकाला अशक्य आहे. म्हणून विद्यार्थ्यांनी सामान्य ज्ञानाचे विषय, विशेष ज्ञानाचे विषय, सामान्य चांगल्या सवयी व विशेष चांगल्या सवयी, स्वतःच्या ठिकाणी असणारे सामान्य गुण व अंगी यावे असे वाटणारे उत्कट गुण यांची स्वीकाराकरिता प्रथम यादी करावी. तसेंच अवगुण व ज्या दुष्ट

सवयी असतील त्याचीही यादी त्यागाकरिता करावी व अभ्यासास लागावें.

या जगात अभ्यासाने काय पाहिजे ते मिळतें. अभ्यास म्हणजे एकच कार्य पुनः पुन्हा करणे. (पौन.पुन्येन करणमभ्यास.) एकच विषय पुनः पुन्हा वाचणें म्हणजेच अभ्यास होय !

**असाध्य तें साध्य करितां सायास। कारण अभ्यास तुका म्हणे ॥**

असाध्य वस्तु साध्य करण्याचे, दुर्लभ वस्तु मिळविण्याचें, अवघड विषय सोपा करण्याचे, दूरचे ध्येय जवळ आणण्याचे, जर काही साधन असेल तर तो अभ्यास होय !

**अभ्यासाचेनि बळें। एका गति अंतराळें ॥ ज्ञानेश्वर ॥**

अभ्यासाच्या योगाने आज माणसे विमानातून आकाशांत उड्डाण करीत आहेत. कोणतीही गोष्ट नित्य केली, एकादा अवघड विषय नित्य अवलोकिला, त्याच्या मागे लागले, त्याचा पिच्छा पुरविला की तो हस्तगत होतो. चक्कू, ताड्या व धोड्या हे अभ्यासाचे तीन प्रकार होत, असे जे विनोदाने म्हणतात ते खरें आहे.

अभ्यासाचे श्रेष्ठत्व योगवासिष्ठासारख्या ग्रंथातसुद्धा किती उत्तम तऱ्हेनें सांगितले आहे हें पुढील उताऱ्यावरुन समजेल. या ग्रंथात अभ्यासाचे आणि उद्योगाचे जेवढे सप्रमाण मंडन केलेले आहे, तसे अन्यत्र क्वचितच आढळतें. हा अभ्यास विषय आबालवृद्धाना उपयोगी आहे अभ्यास म्हणजे यत्न, चिकाटी व दीर्घोद्योग होय ! अभ्यास हा एक सूर्य आहे. त्याचा अस्त कधी होत नाही व सारखा प्रकाश पडत राहातो असे येथे म्हटले आहे. अनेक विषयावरील संस्कृत उतारे देण्याचा मोह सुलभनेकरिता मुद्दाम आवरला आहे पण हा उतारा श्रेष्ठ वाटतो म्हणून येथे देत आहे.

**योगवासिष्ठ मु० व्य० प्रकरण**

सर्वस्य जंतुजातस्य सर्ववस्त्ववभासने ।
सर्वदैवैक एवोच्चैर्जयत्यभ्यासभास्करः ॥
पुण्यानि यान्ति वैफल्यं वैफल्यं यान्ति मानरः ।
भाग्यानि यान्ति वैफल्य नाभ्यासस्तु कदाचन ॥
पौनःपुन्येन करणमभ्यास इति कथ्यते ।

पुरुषार्थः स एवेह तेनास्ति न विना गतिः ॥
दुःसाध्याः सिद्धिमायान्ति रिपवो यान्ति मित्रताम् ।
विषाण्य मृततां यान्ति संतताभ्यासयोगतः ॥
अबन्धुर्बन्धुतामेति नैकट्याभ्यासयोगतः ।
यात्यनभ्यासतो दूरात् स्नेहो बन्धुषु तानवम् ॥
येनाभ्यास परित्यक्तः इष्टे वस्तुनि सोऽधमः ।
कदाचिन्न तदाप्नोति वन्ध्या स्वतनयं यथा ॥
न किंचन फलं धत्ते स्वाभ्यासेन विना क्रिया ॥

सर्व प्राण्यांना कोणतीही वस्तु ज्ञात करून देणारा एक अभ्याससूर्यच सर्वदा विजयी होतो. (प्रकाशत असतो.) प्रसंगी पुण्याई उपयोगी पडत नाही. फार काय पण प्रत्यक्ष आई व स्वतःचें ऐश्वर्य यांचाही उपयोग होत नाही. परंतु अभ्यास मात्र कधीही फुकट जात नाहीं; तो मनुष्याचें साह्य पाहिजे तेथें अगदी गेवकाप्रमाणें करीत असतो. अभ्यास म्हणजे दुसरें कांही नाही. पुनःपुनः तीच तीच गोष्ट करणें म्हणजे अभ्यास होय! हाच पुरुषार्थ होय! मनुष्याला अभ्यासावाचून अन्य मार्ग नाही. सतत अभ्यासानें दुःसाध्य वस्तु साध्य होते. निकट अभ्यासामुळे म्हणजे सहवासामुळें शत्रूही मित्र होतो. आणि प्रत्यक्ष बंधु असून तो निरंतर दूर राहिल्यामुळे स्नेहसंबंध कमी होऊन परक्यासारखा भासतो. ज्यानें इष्ट वस्तूचा अभ्यास सोडला तो अधम समजावा. वन्ध्येला जशी पुत्रप्राप्ति तशी अभ्यासहीनाला ध्येयप्राप्ति होत नाही. तात्पर्य, अभ्यासाविना कोणतेंच कृत्य फलद्रूप होत नाही.

वर सांगितलेलें हें अभ्यासाचें महत्त्व भारतीय विद्यार्थ्यांनी ध्यानांत ठेवावें व आपल्या ध्येयानुसार जें जें म्हणून इष्ट असेल, त्याच्या-प्राप्तीकरितां अखंड अभ्यास करावा. द्रव्य हें कणाकणानें मिळवावयाचें असतें; आणि विद्या ही क्षणाक्षणानें संपादन करावी लागते. आयुष्याचा प्रत्येक क्षण-फार महत्त्वाचा आहे. गेलेला क्षण पुन्हां कधीही मिळणार नाही. प्रत्येक क्षण जर सार्थकीं लावावयाचा असेल तर प्रत्येक क्षणाला कांही तरी मिळविलें पाहिजे. शरीर चालण्याकरितां रोज अन्नाचा अंश पोटांत गेला पाहिजे. त्याचप्रमाणें *प्रत्येक क्षणाला शरीर, मन व बुद्धि यांवर कांही तरी सुसंस्कार झाले पाहिजेत.* स्वच्छता, टापटीप, शिस्त, स्वाभिमान, देशाभिमान इत्यादि गुण अंगी

येण्यास त्यांची नित्य सवय पाहिजे. युद्धाचे प्रसंग वरचेवर आले म्हणजे स्त्रियासुद्धां पराक्रमी निपजतात. डोंगरांप्यावर चढण्याचे प्रसंग वरचेवर आले कीं चापल्य येतें. त्याप्रमाणें नित्य संवयीने व अभ्यासानें सर्व कांहीं मिळतें.

नित्य कोणत्याही गोष्टीचा अभ्यास ठेवला म्हणजे तरतरी राहते. बुद्धीची तरतरी ही आरसा व दांडी यांच्या स्वच्छतेप्रमाणे आहे. डोंगरावरचा दगड घरंगळत येऊन खाली पडला की त्यावर मातीची पुटें बसून तो मलीन होतो. पण आरसा रोज पुसला, भाड्यावरून रोज हात फिरविला, दिव्यावरील काजळी झाडली, दांत दररोज घासले, म्हणजे ते जसे स्वच्छ दिसतात तसें नित्य अभ्यास, नित्य वाचन आणि उजळणी केली म्हणजे बुद्धि तेजस्वी राहते. 'तेजस्वी नौ अधीतमस्तु' आमचें अध्ययन तेजस्वी असो अशी वैदिक प्रार्थना आहे. त्या दृष्टीनें नित्य अभ्यास केला पाहिजे. घर वरचेवर झाडावें लागतें, भिंतीवरून हात फिरवावा लागतो, ठाणबद्ध घोड्याला फिरवावें लागतें, म्हणजे जसें त्याचें तेज वाढतें तसेंच बुद्धीचें तेजही नित्य अभ्यासानें व घर्षणानें वाढतें. निकामी हत्याराला गंज चढतो रोज वापरात असणारा नांगराचा फाळ चकचकीत असतो. आणि वापरात नसणारा नांगराचा फाळ गंज चढून अगदीं काळा होतो कोणत्याही विषयाच्या अभ्यासाचेंही असेंच आहे.

५॥ ते ७ ईशस्तवन, पाठांतर, शौचमुखमार्जन ; गोधी, वस्त्रें विछाना यांची व्यवस्था; स्नान; वस्त्रें धुणें इ.
७ ते ७॥ व्यायाम, आसनें, नमस्कार, जोर, बैठका, पळणें इ.
७॥ ते ८ विश्रांति व न्याहारी.
८ ते १०॥ अभ्यास.
१०॥ ते ११॥ भोजन व विश्रांति.
११॥ ते ५ विद्यालयांतील शिक्षण.
५ ते ६ अल्पाहार, घरांतील कामें वगैरे.
६ ते ७॥ खेळ, व्यायाम, मंडळाचीं कामें, सभा इ.
७॥ ते ८ ईशस्तवन, भोजन.
८ ते ९॥ अभ्यास. ९॥ ते ५॥ निद्रा

वरीलप्रमाणें अगदीं आरंभीं, वेळीच असा नियम ठरवून नियमांतील प्रत्येक गोष्ट काळजीनें करण्याचा यत्न करावा.

आळस हा अभ्यासाचा शत्रु आहे. आळसाचा वैरी अभ्यास हा होय! आळस हा थोडी जागा मिळाली कीं आपले हातपाय पसरतो. आळसानें पसारा वाढविला कीं मग त्याचा प्रतिकार करणें कठिण होतें. म्हणून आळसाच्या कचाटींत न सापडण्याचा निश्चय विद्यार्थ्यांनीं केला पाहिजे. आज काम, उद्या काम, असें म्हणणारे विद्यार्थी पतनोन्मुख म्हणून समजावें. श्रीसमर्थ म्हणतात :—

म्हणोनि आळस सोडावा । यत्न साक्षेपें जोडावा ॥

येण्यास त्यांची नित्य सवय पाहिजे. युद्धाचे प्रसंग वरचेवर आले म्हणजे स्त्रियासुद्धां पराक्रमी निपजतात. डोंगरमाथ्यावर चढण्याचे प्रसंग वरचेवर आले की चापल्य येतें. त्याप्रमाणें नित्य संवयीने व अभ्यासाने सर्व कांही मिळतें.

नित्य कोणत्याही गोष्टीचा अभ्यास ठेवला म्हणजे तरतरी राहते. बुद्धीची तरतरी ही आरसा व भांडी यांच्या स्वच्छतेप्रमाणें आहे. डोंगरावरचा दगड घरंगळत येऊन खाली पडला की त्यावर मातीची पुटे बसून तो मलीन होतो. पण आरसा रोज पुसला, भांड्यावरून रोज हात फिरविला, दिव्यांवरील काजळी झाडली, दांत दररोज घासले, म्हणजे ते जसे स्वच्छ दिसतात तसे नित्य अभ्यास, नित्य वाचन आणि उजळणी केली म्हणजे बुद्धि तेजस्वी राहते. 'तेजस्वी नौ अधीतमस्तु' आमचें अध्ययन तेजस्वी असो अशी वैदिक प्रार्थना आहे. त्या दृष्टीने नित्य अभ्यास केला पाहिजे घर वरचेवर झाडावें लागते, भिंतीवरून हात फिरवावा लागतो, ठाणवद घोड्याला फिरवावें लागते, म्हणजे जसें त्याचें तेज वाढतें तसेंच बुद्धीचे तेजही नित्य अभ्यासाने व घर्षणाने वाढतें. निकामी हत्याराला गंज चढतो रोज कामात असणारा नांगराचा फाळ चकचकीत असतो आणि कामांत नसणारा नांगराचा फाळ गंज चढून अगदी काळा होतो. कोणत्याही विषयाच्या अभ्यासाचेही असेच आहे.

कोणताही अभ्यास वा सवय कंटाळवाणी न व्हावी अशी विद्यार्थ्यांनी आपली दिनचर्या आखावी. दिनचर्येमध्ये विविधता असावी. आपल्या दिनचर्येत सामान्यतः सर्व आवश्यक गोष्टींचा अंतर्भाव विद्यार्थ्यांनी करावा. विद्यार्थ्यांना नित्यापेक्षा नैमित्तिक गोष्टींचे महत्त्व अधिक वाटतें. तें उत्सवप्रियतेचें दर्शक आहे. तथापि नित्यक्रमाची एकदां गोडी लागली म्हणजे विद्यार्थी त्यातच तल्लीन होतात

बृहन्महाराष्ट्रातील हवापाणी, परिस्थिति आणि शिक्षणक्रमें या सर्वांचा विचार करून सामान्यतः पुढीलप्रमाणे रोजचा कार्यक्रम असावा. या नित्यक्रमांत अनुमानाप्रमाणें बदल करावा. स्थलपरत्वे व परिस्थितिपरत्वेंही बदल करावा. येथें सामान्य धोरण दाखविलें आहे.

## विद्यार्थ्यांचा नित्यक्रम

(१) पहांटे ५–५॥ वाजतां प्रातरुत्थान.

५॥ ते ७ ईशस्तवन, पाठांतर, शौचमुखमार्जन ; मोरी, वस्त्रें बिछाना यांची स्वच्छता; स्नान; वस्त्रें धुणें इ.

७ ते ७॥ व्यायाम, आसनें, नमस्कार, जोर, बैठका, पळणें इ.

७॥ ते ८ विश्रांति व न्याहारी.

८ ते १०॥ अभ्यास.

१०॥ ते ११॥ भोजन व विश्रांति.

११॥ ते ५ विद्यालयांतील शिक्षण.

५ ते ६ अल्पाहार, घरांतील कामें वगैरे.

६ ते ७॥ खेळ, व्यायाम, बाहेरचीं कामें, सभा इ.

७॥ ते ८ ईशस्तवन, भोजन.

८ ते ९॥ अभ्यास. ९॥ ते ५॥ निद्रा.

वरीलक्रमानें अगदी आरोग्य, ऐश्वर्य असा नित्यक्रम ठरवून नित्यक्रमांतील प्रत्येक गोष्ट वेळच्या वेळीं करण्याचा यत्न करावा.

आळस हा अभ्यासाचा शत्रु आहे. आळसाचा वैरी अभ्यास हा होय! आळस हा थोडी जागा मिळाली कीं आपले हातपाय पसरतो. आळसानें पसारा वाढविला कीं मग त्याचा प्रतिकार करणें कठिण होतें. म्हणून आळसाच्या मर्यादेंत न सांपडण्याचा निश्चय विद्यार्थ्यांनी केला पाहिजे. आज कर, उद्या कर, असें म्हणणारे विद्यार्थी घसरलेच म्हणून समजावें. श्रीसमर्थ म्हणतात :—

म्हणोनि आळस सोडावा । यत्न साक्षेपें जोडावा ॥
दुश्चितपणाचा मोडावा । थारा बळें ॥

# प्रकरण ७ वें

## स्वच्छता

प्राचीन काली विद्यार्थी गुरुगृही जात. तेथे गेल्यावर गुरु त्यांचें उपनयन करी, आणि प्रथम शौचाचार म्हणजे स्वच्छतेचे पाठ देत असे.

उपनीय गुरुः शिष्यं शिक्षयेच्छौचमादितः ॥ मनु ॥

त्या धोरणाप्रमाणे आम्ही नित्यक्रमाला स्वच्छतेपासूनच प्रारंभ करतो.

विद्यार्थ्यांनी शरीर, मन, वाणी, अन्न व वस्त्र यांच्या स्वच्छतेकडे चांगले लक्ष द्यावे. स्वच्छतेचे संस्कार लहानपणीच दृढ झाले आणि ते अंगवळणी पडले म्हणजे त्यापासून पुढे फार सुख होते. पहाटे उठल्यावरोबर लघुशंकेस जावे, हात धुवावे, दोनचार वेळा खुळखुळून चुळा भराव्या, डोळे, नाक, तोंड ही धुवून प्रथम देहशुद्धि करावी. उठल्यावरोबर लगेच काही तरी उद्योगाला लागू नये. काही क्षण थोडें स्वस्थ बसावे. काल काय केलें, आज काय करायचें आहे, याचा विचार करावा आणि मनाच्या स्वच्छतेकरितां या ब्राह्म मुहूर्तावर म्हणजे प्रसन्न वेळीं अल्पकाल ईशचिंतन करावे. याप्रमाणे प्रायमिक शरीरशुद्धि व ईशचिंतनाने चित्तशुद्धि करून मग अभ्यास वा इतर उद्योगास लागावे.

यानंतरचें मुख्य काम शौचमुखमार्जन व दंतधावन हे होय. अलीकडे शहरी राहणी वाढत आहे. त्यामुळे गावाबाहेर म्हणजे बहिर्दिशेस शौचास जाण्याचे प्रसंग क्वचितच येतात. तथापि हिंदुस्थानात खेडीपाडी काही थोडी नाहीत. खेड्यात विद्यार्थ्यांची संख्याही पुष्कळ असते. त्यांनी बहिर्दिशेस गावापासून थोडें लांब जावे, वाटेवर व घराजवळ शौचास बसू नये. गावालगतची झाडें, देवळें यांच्या आसपास शौचास बसू नये. शौचास शक्य तो लांब जाणें हें आरोग्य, स्वच्छता व लज्जा अशा सर्व दृष्टींनी योग्य आहे. शौचकुपाची व्यवस्था असेल तेथें विद्यार्थ्यांनी दार लावून शौचास जपून बसावें. शौचकुपात जितकी खाली घाण असते तितकी घाण वर करण्याचा गलिच्छ प्रकार पुष्कळ ठिकाणी दिसतो! पुष्कळ माणसांना नीट शौचास बसता येत नाही, आणि डावा हात माती, राख, किंवा साबण लावून स्वच्छ कसा करावा हेंही कळत नाही. तांब्या, तपेली अगर शौचपात्र ही शौचानंतर

डाव्या हातानें आणूं नयेत. डाव्या हाताची चांगली शुद्धि होईपर्यंत त्या हातानें कोणतेंही काम करूं नये. पुष्कळ मुलें व मोठीं माणसें मुद्दां पाय धुण्याकरितां ठेवलेल्या पाण्यांतच एकदम डावा हात बुचकळतात! कुणी डाव्या हातानेंच त्यांतील चुळकाभर पाणी घेतो व तपेली घासू लागतो. असे अनेक गलिच्छपणाचे प्रकार दिसतात. ते सर्व वर्ज्य करून, मलद्वाराची शुद्धि चांगली करून डावा हात, साबण वा माती वा राख लावून चांगला धुवावा, व मग मुखमार्जन करावें. तळी, विहिरी, नद्या, नळ, हौद, ओढे अशा ठिकाणीं वरच्या बाजूस हातपाय व तोंड धुणे फार चायलें! मात्र त्यांतून पाणी वर घेऊन बाजूस थोडें लांब जाऊन तोंड धुवावें व खाकरे टाकावेत. प्रवाहांत फार तर स्नान करावें, हातपाय धुवावेत. पुष्कळ माणसें विहिरींत, नदीत, तळ्यात, तोंडें धून बसतात व खाकरे टाकून घाण करितात. वाहत्या पाण्यातमुद्धां तोंड धूत व खाकरे टाकीत बसू नये. मग विहीर, तळें व हौद यांची गोष्टच नको. एक स्वच्छता करतांना दुसरी किळसवाणी अस्वच्छता न वाढेल इकडे विद्यार्थ्यांनी लक्ष द्यावें.

तोंड धुण्यामध्ये मुख्य भाग दात घासण्याचा असतो. वैद्यशास्त्र निरनिराळ्या वनस्पतींच्या काष्ठांनीं दांत घासावे असे सांगते उत्तरेकडील लोक व गुजराथी लोक तेवढे बाभळी, लिंब व करंज यांच्या काड्यांचे दांतवण वापरतात. बाभळ, लिंब, बकुळी यांच्या काष्ठांनी दात घासणें फार उत्तम. अलीकडे पुष्कळ दंतमंजनें निघालेली आहेत. टूथपेस्ट, टूथपावडर आणि ब्रश याचाही प्रचार पुष्कळ आहे. पण गोरगरिबांना व सर्वांना सुलभ म्हणजे राखुंडी होय. रानशेणीची राखुंडी करावी. शेणीचे निखारे विझवितांना तुरटीच्या पाण्याचा हबका मारावा. वस्त्रगाळ पूड करून त्यात थोडा कात, थोडा कापूर, बाभळीच्या आंतरसालीची पूड घालावी. ती राखुंडी वापरल्यास दात चांगले बळकट होतात.

विद्यार्थ्यांनी रात्री निजताना व सकाळीं उठल्याबरोबर असे दोन वेळां दात घासावे. अलीकडे माणसें दिवसातून बरेच वेळां खातात पण प्रत्येक खाण्यानंतर स्वच्छ चुळा भरणें, दांतांवरून बोट फिरवणें हे करीत नाहीत. म्हणून अलीकडे पायोरियाचा रोग फार वाढत आहे. त्याकरितां विद्यार्थ्यांनी बाभळीच्या शेंगा नेहमीं चघळाव्या. मुगली एरंडाचा चीक हिरड्यांना वरचेवर चोळावा. बाभळ व बकुळी यांच्या आंतल्या सालीचा काढा करून ठेवावा

व त्याच्या गुळण्या मधून मधून कराव्यात. थोडक्यांत म्हणजे काहीही करून दांत स्वच्छ ठेवावेत व ते रोज, घासावेत, म्हणजे बळकट राहतात. तुरुंगामधील कैद्याच्या दांतांची काळजी नियमाप्रमाणे तेथील अधिकारी फार घेत असतात. विद्यार्थ्यांनी तेवढी काळजी स्वतः अवश्य घ्यावी.

दांत चागले असले की चर्वण चागले होते चर्वणाचा व पचनाचा सबध आहे. आणि परपरेने दांताचा व दीर्घायुष्याचा संबध आहे दांतांबरोबर रोज जीभही चागली घासावी जिभेवर पाढरी व पिवळी पुटें असू नयेत.

दतधावन व मुखमार्जनानतर विद्यार्थ्यांनी आपली खोली, आपली बसावयाची जागा स्वच्छ झाडावी. खोलीचा केर काढताना वळकटी, दिवा, पुस्तके, वस्त्रे ही उचलून बाजूस ठेवावीत. सर्व वस्त्रें चागली झडझडून झाडावीत. भिंती, कोनाडे, कोपरे यावरही सहज केरसुणी फिरवावी. केर काढताना तो कुणाच्याही अगावर न जाईल अशी दक्षता घ्यावी. निर्मल केर काढून, बैठक घालून सर्व वस्तु जेयल्या तेथें टापटिपीने ठेवून विद्यार्थ्यांनी मग स्नानास जावें. पादत्राणें स्वच्छ करणें, बुटाचे पॉलीश, स्वहस्ते दाढी करणें, इत्यादि सर्व स्नानापूर्वीच उरकावीत.

**प्रातःस्नान**—प्रत्येक विद्यार्थ्याने प्रातःस्नानाची सवय विशेषतः थड पाण्याने सकाळी अंघोळ करण्याची सवय लावून घ्यावी. बृहन्महाराष्ट्रांतील हवापाणी समशीतोष्ण आहे. हा प्रदेश काश्मीर अथवा इंग्लडसारखा अतिथड नसल्यामुळे येथे नित्य स्नानाची आवश्यकता आहे. नुसते हातपाय धुणें, तोंड व डोके धुणें, हे इतर देशात चालते त्याचे अनुकरण भारतीय विद्यार्थ्यांनी येथे करू नये. मुंबईसारख्या कांही ठिकाणी तर घामाच्या चिकचिकाटामुळे स्नानाची दोन वेळा आवश्यकता वाटते. वाहत्या पाण्यात नदीमध्ये अगर विहिरी–तलावामध्यें थड पाण्याचें स्नान करणें फारच हितावह आरोग्यप्रद आहे. स्नान हे मनुष्यमात्राकरिता आहे. ते शरीरशुद्धीकरिता आहे. तें नित्य केले पाहिजे अलीकडे डॉक्टरलोक मोकळ्या जागेत स्नान करू नये म्हणतात, पण तें आजाऱ्याकरितां आहे असे समजावे. सर्वांना बंदिस्त स्नानगृहे अशक्य, ती श्रीमतांनाच सुलभ. ओढे, नद्या, विहिरी याचें वैपुल्य महाराष्ट्रात आहे. अशा ठिकाणी नित्य स्नान केल्याने आरोग्यवृद्धि होते. स्वच्छ व झुळूझुळू वाहणाऱ्या नद्यामध्ये पोहणें व स्नान करणे हें एक वैभव

आहे. त्याची मजा कांहीं विशेष आहे. प्रकृति जी बिघडते, ती स्नानानें नव्हे तर अंग न पुसता गारठ्यांत बसणें, पाण्यात अधिक वेळ डुंबत बसणें, गार वाऱ्यांत बराच वेळ वस्त्रे धुत बसणें इत्यादि कारणानी.

अलीकडे मध्यम वर्गांतील विद्यार्थ्यांमध्येंसुद्धां रोज ऊन पाण्यानें स्नान करणें, शिकेकाई व साबण वापरणें अशी परावलंबी, खर्चाची व नाजुक होण्याची साथ पसरत आहे; ती वाईट आहे. थंड पाण्याची आंघोळ सोसतच नसेल तर गोष्ट निराळी. सकाळीं सोसत नसल्यास उन्हीरानें स्नान करावें म्हणजे सोसते. पडसें येणें, अंग मोडून येणें असें जरी प्रथम वाटलें तथापि थोडा मनाचा निग्रह असल्यास हें स्नान सोसूं लागतें.

अभ्यंगस्नान—केव्हां तरी शिणोटा घालविण्यावरितां तेल अंगास चोळून ऊन पाण्यानें स्नान अवश्य करावें. अभ्यंगस्नान (तेल चोळून स्नान करणें) हें पंधरावीस दिवसांनी अवश्य आहे. त्या वेळी सर्वांगास तेल चोळावें व ऊन पाणी सोसेल तसें बरेच घ्यावें. पण नित्य ऊन पाण्याची आंघोळ ही विद्यार्थ्यांना अकालीं वार्धक्य आणते, केस पांढरे करते आणि फाजील सुकुमारता आणते. वैद्यशास्त्रदृष्ट्या हिंदुस्थानच्या हवेला विशेषतः महाराष्ट्रातल्या हवेला रोजची ऊन पाण्याची आंघोळ विद्यार्थ्यांना मुळीच चांगली नाहीं. त्यांनी रोज विहिरीवर, नदीवर जाऊन थोडें पोहावें, व स्वच्छ स्नान करावें. घरीं विहीर असल्यास विहिरीचें पाणी काढून, नळ असेल तर नळावर अगर हौदावर जाऊन थंड पाण्यानें स्नान करावें. थंड पाण्याच्या स्नानापासून किती लाभ होतात हें पुढील श्लोकावरून दिसेल.

स्नानापासून लाभ

गुणा दश स्नानपरस्य साधो रूपं च तेजश्च बलं च शौचम् ।
आयुष्यमारोग्यमलोलुपत्वं दुःस्वप्नघातश्च तपश्च मेधाः ॥ दक्षस्मृति ॥
गुणा दश स्नानशील भजते बलं रूपं स्वरवर्णप्रशुद्धिः ।
स्पर्शश्च गंधश्च विशुद्धता च श्रीःसौकुमार्यं प्रवराश्चनार्यः ॥
—उद्योगपर्व महाभारत ।

अलीकडे पाण्यांत बसण्याचें एक शास्त्र निघालें आहे. त्या शास्त्राच्या दृष्टीनें शीतोदक स्नान हें फार उपयुक्त आहे. झोप चांगली येणें, प्रसन्नता

वाटणें, भूक चांगली लागणें, वर्णशुद्धि होणें, कुरूपता जाणें, सतेजता येणें, इत्यादि अनेक गुण या स्नानामध्यें आहेत. प्रातःस्नान हें स्वावलंबन वाढविणारे, बुद्धिवर्धक, आयुष्यवर्धक असें आहे; म्हणूनच वरील श्लोकात स्नानाचे दहा गुण सांगितले आहेत. ते म्हटले म्हणजे रूप, तेज, बल, पावित्र्य, आयुष्य, आरोग्य, इंद्रियनिग्रह, गाढ झोंप, तप व बुद्धिमत्ता इत्यादि होत.

शीतोदक स्नानाबरोबर विद्यार्थ्यांनी रोज नेत्रस्नान करावें. स्वच्छ पाण्यांत डोकें बुडवून डोळ्यांची उघडझाक करणे म्हणजे नेत्रस्नान होय. स्वच्छ जलाशयांत हें नेत्रस्नान अवश्य करावें. जलाशय नसल्यास मोठ्या रुंद भांड्यांत स्वच्छ पाणी भरून घ्यावें व त्यात तोंड बुडवून डोळ्यांची उघडझाक करावी. त्यामुळें नेत्ररोग व मस्तकशूळ असले विकार जातात व दृष्टीची मंदता जाते. अकाली चाळशी लावावी लागत नाहीं व मेंदूही शांत होतो. नेत्रस्नान व शरीरस्नान करून चुरचुरीत स्वच्छ खादीच्या कपड्यानें अंग चोळून पुसावें आणि धूत वस्त्र नेसावें. लगेच स्नानासरशी तेथल्या तेथें आपली वस्त्रें-धोतरें, सदरा, शर्ट, पंचा, अंगपुसणें, इजार इ० जी असतील ती चांगली हापटून, सुवकून व खळबळून घट्ट पिळावीत. वस्त्रें चांगली धुतलीं व वाळविलीं कीं त्या वस्त्राचें व ती नेसणाऱ्याचें आयुष्य वाढतें. अलीकडे दारिद्र्य वाढलें असा ओरड सर्वत्र आहे. परंतु दारिद्र्यनाशाच्या संवयी मात्र समाजातून जात चालल्या आहेत. शेकडा नव्वद माणसें दरिद्रीच आहेत. ज्यांच्या घरी नोकरचाकर असतील अशी माणसे थोडीच. म्हणून विद्यार्थ्यांनी आपली वस्त्रें स्वतः स्वच्छ धुण्याचा अभ्यास ठेवावा. सात आठ दिवसानी केव्हां तरी साबण लावून सर्व कपडे धुवावेत. व दोन तीन महिन्यांनी केव्हां तरी परटीला द्यावेत. रोज स्वतः वस्त्रें स्वच्छ धुतल्याने साबणाचा खर्चही कमी येतो व परटीचा खर्च वाचतो. कपडे हातासरशी लगेच धुतले म्हणजे ते कुजत नाहीत व बरेच दिवस टिकतात. सकाळी स्नान करून फेकलेले ओले धोतर संध्याकाळी पिळून वाळत टाकले तर लवकर कां फाटणार नाही?

विद्यार्थ्यांनी नेहमी स्वतःची वस्त्रें वापरावीत. दुसऱ्याने धारण केलेलीं वस्त्रें कधीही वापरूं नयेत. दुसऱ्याच्या वस्त्राबरोबर घामाचे द्वारें विषारी जंतु येत असतात. म्हणून सदैव स्वतःचेच कपडे वापरावेत. आठवड्याच्या सुटीत आपली वस्त्रें, आपली जागा यांकडे स्वच्छतेच्या दृष्टीने अधिक लक्ष

धावें. कोट, चादर, पलंगपोस आणि अशीच थोडीं अधिक अवजड वस्त्रें सुटीच्या दिवशी धुवावीत. आपली खोलीही .आठपंधरा दिवसांनी सारवावी. गृहपरिस्थितीप्रमाणें घरांतील कोळिष्टकें झाडणें, मोरी उपसणें, फिनेल टाकणे, घराशेजारचा उकिरडा फेकून देणे, डांस व पिसवाविनाशक यत्न करणें, ढेकणांचीं अंडी खरडणें, त्यात राकेल ओतणें, पुस्तकें झाडून लावणें, शेल्फ व कपाट यांतील धूळ झाडणें, आपल्या घरांतील सर्व वस्तु नीटनेटक्या ठेवणें, आवश्यकतेप्रमाणें मजुरावर अवलंबून न राहतां झाडझारव वगैरे करणें, स्वतःचें अंथरूण उन्हात टाकणें इत्यादि अनेक स्वच्छतेचीं कामें विद्यार्थ्यांनी आठवड्याच्या सुटीत करावींत. या कामामुळें शरीराला चांगली संवय लागते. आणि स्वच्छतेमुळें मनाला एकप्रकारचा आल्हाद वाटतो

विद्यार्थ्यांनी आपले पाणी पिण्याचें भांडे, ताब्यातपेलो ही स्वतः घासावीं. पिण्याचें पाणी तपेलीत गाळून भरावे. आपापली ताटवाटीसुद्धा शरीव विद्यार्थ्यांनीं दोन्ही वेळां स्वतः घासावी. हातासरशी काम होतें, स्वच्छता वाढते व घरच्या माणसांना दुसरे काम करण्यास वेळ मिळतो. खाणावळीत व इतरत्र जेवणाऱ्या विद्यार्थ्यांनीसुद्धां ताट, वाटी, पाणी पिण्याचें भांडें, यांच्या स्वच्छतेची अधिक काळजी घ्यावी. विद्यार्थ्यांमध्यें हे स्वच्छतेचे संस्कार असले तर खाणावळवाला अधिक स्वच्छता ठेवतो. उष्टे खाऊ नये, उष्ट्या भांड्यानें पाणी पिऊं नये, भांड्यास तोंड लावून पाणी पिऊ नये. हातपाय स्वच्छ धुवून लघुशंका करुन व संशय असल्यास शौचास जाऊन मग भोजनास बसावें. दुपारच्या भोजनापूर्वी शौचास जाण्याची पद्धत चांगली असे वैद्यशास्त्र म्हणतें.

भोजनाचे वेळीं जेवढी स्वच्छता असेल तेवढी पाहिजे. भोजनाच्या वेळीं सोवळें नेसण्याची पद्धत आहे, त्या सोवळ्याचा अर्थ स्वच्छता हाच आहे. अमंगळ, धुरकट, घाणेरडे मुकटे व घावळ्या नेसणें म्हणजे सोवळें नव्हे! आपल्या देशातील हवामानाप्रमाणें धूतवस्त्र नेसून अंगावर धुतलेलें उपरणें घेऊन भोजनास बसणें हें उत्तम! अगांत धुतलेला शर्ट अगर सदरा अगर परॉंक आवश्यकतेप्रमाणें घालावा. विद्यार्थ्यांनी उघड्या अगानें बेंबट भोजनास बसावें. त्यांत कांहींच वाईट नाहीं. वस्त्रांची, अन्नाची व मनाची प्रसन्नता व स्वच्छता भोजनाचे वेळीं अधिकांत अधिक पाहिजे. भोजनोत्तर हात, तोंड व दात स्वच्छ धुयावेत. कांहींही खाल्ल्यानतर हात चांगले स्वच्छ करण्याची

काळजी घ्यावी. कांहीही खाण्यापूर्वी हात, पाय व तोंड ही स्वच्छ धुण्यालाही आळस मुळीच करूं नये ! आपल्या प्रांतांत एकंदरीत, धूळ फार, पाणीही विपुल, आणि हवा समशीतोष्ण असल्यामुळें दिवसांतून चारपांच वेळा म्हणजे बाहेरून आल्याबरोबर हातपाय धुण्याची प्रथा पाडली तर ती आरोग्याला इष्टच आहे. याप्रमाणें स्नान, वस्त्रे, पात्रे, खोली, पुस्तकें, भोजन, शयन, अशा ठिकाणी येथवर विवेचन केल्याप्रमाणें विद्यार्थ्यांनी स्वच्छता ठेवण्याचा यत्न करावा.

शरीराप्रमाणे मन, व वाणी यांची स्वच्छता व पावित्र्य ठेवण्यास विद्यार्थ्यांनी शिकलें पाहिजे. मनामध्यें कुत्सित, मत्सरी, घाणेरडे विचार आल्याने मन अस्वच्छ होते. मन उदात्त, उमदें व मोकळें पाहिजे. अर्थात् आपला स्वभाव तसा बनत आहे की नाही याचें निरीक्षण सतत करीत असावे. आपल्यापेक्षा जे विद्यार्थी मनाने व स्वभावाने निर्मल असतील त्याचे अनुकरण विद्यार्थ्यांनी करावयास पाहिजे. चांगले विचार, चांगल्या सवयी, धर्मग्रंथ-वाचन, ईशचिंतन, तत्त्वविचार हे सर्व मनाच्या शुद्धतेचेच उपाय आहेत.

*मनाच्या स्वच्छतेप्रमाणे वाणीच्या पावित्र्याकडेही विद्यार्थ्यांनी लक्ष* दिलें पाहिजे. अपशब्द, बीभत्स भाषण, शिव्या व अश्लील कोटया यामुळें वाणी अपवित्र होते. अमंगल शब्द उच्चारावयाचे नाहीत व ऐकावयाचे नाहीत असा निश्चय विद्यार्थ्यांनी केला पाहिजे. वडील माणसांदेखत, शिक्षकां-देखत, आपली आई व बहीण यांच्यादेखत जे शब्द उच्चारण्यास आपणास लाज वाटेल असले शब्द विद्यार्थ्यांनी कधीही उच्चारूं नयेत. ग्राम्य शब्द उच्चारणें व क्षुद्र मनोवृत्ति प्रगट करणें यालाच हलकटपणा म्हणतात. कुजक्या पदार्थाची जशी दुर्गंधि येते, तद्वतच अभद्र भाषण, अमंगल थट्टा आणि घाणेरडे शब्द याचीही दुर्गंधि येते वाणीचे पावित्र्य वाढविण्यास व तिच्यातील बोजडपणा घालवून वर्णांची सुस्पष्टता, आवाजाची मधुरता, व भाषेची मोहकता आणण्याचा अभ्यास करावा. भाषा व विचार या दृष्टीनें उत्कृष्ट असे गद्य व पद्य उतारे पाठ केल्याने वाणीची शुद्धता वाढते.

विद्यार्थ्यांनी रोजच्या आपल्या वागणुकीत स्वच्छता कशी राखावी हें येथवर सांगितलें. परंतु याशिवाय सार्वजनिक स्थलें व सामुदायिक प्रसंग *असे असतात की तेथेंही फार स्वच्छतेने वागावे लागतें. आगगाडीच्या डब्यांत,* प्लॅटफॉर्मवर, मोटारीमध्यें, देवळांच्या आवारांत, सडासारवण केलेल्या

आंगणांत थुंकूं नये व खाकरे टाकूं नयेत ; शाळेच्या वऱ्हांडयांत, सभागृहाच्या भोंवती आणि सार्वजनिक बागा अशा ठिकाणीं घाण करूं नये ; नाक शिंकरूं नये, व लघवीस बसू नये ; बाजूला व आडोशालाच थुंकावें, शिंकरावें व लघुशंका करावी. सामुदायिक भोजनप्रसंगीं व सभाप्रसंगीं कितीतरी माणसें गलिच्छपणे वागतात, तें सर्व नवयुगातील विद्यार्थ्यांनी टाळलें पाहिजे. साधारणतः घरीं आपण जशी स्वच्छता ठेवतों, तशीच सर्वत्र ठेवण्याचा प्रयत्न करावा. त्यापेक्षां अधिक विवेचन येथे अप्रस्तुत आहे.

---

## प्रकरण ८ वें

# अभ्यास कसा करावा ?

आपल्या देशाच्या हवापाण्याचा विचार करतां अभ्यासाला सुप्रभात-काल हीच उत्तम वेळ होय ! सूर्योदयापूर्वी एक तास, अगर दोन तास उठून अभ्यास करणें हे अत्यंत हिताचें असते. पहाटेचे दोन तास व सकाळचे तीन तास अशा पाच तासांत कॉलेजच्या विद्यार्थ्यांचासुद्धां रगडून अभ्यास होतो. पण अलीकडे अनेक घातुक संवयीमुळें रात्रीं दहा ते दोनतीन वाजेपर्यंत अभ्यासाची निशाचरी अनिष्ट पद्धत पडू लागलेली आहे. चौदापंधरा वर्षांच्या वयापासून पहाटे उठण्याची सवय लावून घ्यावी. पहाटेची वेळ ही सात्त्विक, शांत, प्रसन्न, आणि थंड अशी असते. रात्रीची वेळ त्या मानाने तामसी असते, स्मरणशक्तीची वाढ पहाटेच्या अभ्यासानें चांगली होते. कारण त्या वेळीं मन निर्मल असतें अनेक संस्कारांनी व व्यापारांनीं व्यापृत झालेलें मन रात्रीं अभ्यासांत प्रवेश करूं शकत नाहीं. स्मरणशक्तीची वाढ पहाटेच्या अभ्यासानेच होते. म्हणून पाठ करण्याचा विषय पहाटे अभ्यासावा. विशेषतः पहाटे पाठांतर करण्याचा परिपाठ ठेवावा. प्रशस्त पाठांतरामुळें वाणीला चांगला संस्कार होतो; सुविचारांची समृद्धि होते आणि त्याचा मनावर इष्ट परिणाम होतो.

## अपार पाठांतर असावें

बुद्धीचे मालिन्य, तामस वृत्ति व जाड्य नाहीसें करुन स्मरणशक्ति वाढविण्यास पाठांतरासारखा अन्य मार्ग नाही. अलीकडे पाठ थोडे व विचार फार असें झाले आहे. विचारशक्तीबरोबर स्मरणशक्तीसुद्धा वाढवायास पाहिजे. मोठमोठे वक्ते, लेखक व कवी हे असें सांगतात कीं त्यानीं जें पाठांतर लहानपणीं केलें तें त्यांना जन्मभर पुरलें! खाल्लेल्या वैरणीचें जनावर जसें रवंथ करतें तद्वतच पाठ केलेले वेंचे पुन्हा पुन्हा चित्तात घोळविल्याने पुष्कळ आनंद होतो; व त्याबरोबर नवे विचार सुचतात. आगगाडचा व आगबोटी, यामध्यें, पायी प्रवासांत, विशेषत. एकांतामध्यें या पाठांतराचा उपयोग फार होतो. वैदिक ब्राह्मण संबंध दशग्रंथ पाठ म्हणतात ही त्यांची स्मरणशक्ति पाहून जगातील विद्वान् लोक आश्चर्यानें थक्क होतात. जगातील अत्यंत प्राचीन असें जें वैदिक वाङ्मय तें या पठणपाठण परंपरेमुळेंच आज जसेंच्या तसें राहिलेलें आहे. पूर्वी पाठांतर अधिक व विचार कमी, तर त्याउलट हल्ली विचार अधिक व पाठांतर फार कमी असें आढळतें. या दोन्ही टोकांचा विद्यार्थ्यांनी समन्वय केला पाहिजे! अर्थात् पहाटे उठून विविध वेंचे, उतारे, आणि इतर जे कांही पाठ करण्याजोगे विषय असतील ते अर्थ समजून घेऊन पाठ करावेत. पाठांतरामुळे डोळ्यांना पुष्कळ वेळां विश्रांति देता येते. सारखा डोळ्यांचा उपयोग करुन वाचण्यापेक्षां वाचलेल्याचें मनन करण्यास पाठांतराचा फार उपयोग होतो. अलीकडे एकंदरीत वाचन वाढलेलें दिसतें. म्हणून अनेक पुस्तकांतील महत्त्वाच्या वाक्याखालीं पेन्सिलीच्या खुणा करुन ठेवण्याची पद्धत आहे. स्वत.च्या पुस्तकावर अशा खुणा करुन ठेविल्यास ते हुकमी काम देते यांत शंका नाही. परंतु असें जपून ठेवलेलें पुस्तक क्वचित् हरवलें अगर गहाळ झाले तर ती पुस्तकी विद्या उपयोगी पडत नाहीं. याकरितां शक्य तो अर्थ समजून घेऊन अपार पाठांतर करणें हें उत्तम. साधारणपणें एकान्तांत स्वस्थ बसल्यास तीन तास-पर्यंत तरी पुरेल असें प्रशस्त व उत्कृष्ट पाठांतर प्रत्येक विद्यार्थ्याजवळ असावें हें. पाठांतर म्हणजे पोपटपंची नव्हे. तर अर्थ समजून घेऊन केलेलें पाठांतर होय.

पहाटे वय, ईयत्ता आणि विषय या मानानें दीडदोन तास अभ्यास केल्यावर मध्यंतरी स्नान, वस्त्रें धुणें, व्यायाम, न्याहारी असा कृत्यात कांहीं वेळ घालवून पुन्हां आठ वाजतां अभ्यासास बसावें. ८ ते ११ अगर १०॥ पर्यंतची वेळ अभ्यासाला ठीक असते. अभ्यासाला सहाध्यायी असेल तर चांगलें ! मात्र तो उनाड व गप्पा मारणारा नसावा. खेळाडू दोन मुलें जमली म्हणजे अभ्यासाच्या वेळीं पहाटे व सकाळीं पुस्तकें पुढें ठेवून गप्पागोष्टी करतात ; म्हणून सहाध्यायी शक्य तों अभ्यासी, चांगल्या वृत्तीचा व मेहनती असावा.

साधारणतः इंग्रजी पाचव्या ईयत्तेपासून पहाटे व सकाळीं मिळून चार पाच तास अभ्यास दाटून करावा लागतो असा अभ्यास नित्य केल्यानें विषय चांगला ठसतो व नापास होण्याची भीति नसते. अभ्यासाचा क्रम म्हणजे वर्गात झालेल्या विषयाचें चिंतन, पुढे होणाऱ्या विषयाचे पूर्वावलोकन, आणि मागील उजळणी असा असावा. वर्गात चाललेल्या विषयांकडे नीट लक्ष देऊन शिक्षक सांगतील ती टिपणें करावीत आणि घरी आल्यावर त्या टिपणांच्या आधारें पुस्तक पुढे ठेवून अभ्यास पक्का करावा. पुष्कळ विद्यार्थी वर्गामध्यें मुळीं लक्षच देत नाहीत. त्यामुळे रोजचा अभ्यास आहे तरी काय ? याची वार्ताही त्यांना नसते. मग हे असले धांदरट विद्यार्थी याच्याकडे जा, त्याच्याकडे जा, असे करून कांही वेळ घालवतात व अभ्यास समजावून घेऊन येतात. खरोखर सकाळच्या वेळेची किंमत सर्वांत अधिक असते. त्या वेळी जर असा वेळ फुकट गेला तर अभ्यासाची फार हानि होते.

पहाटे ज्याप्रमाणें सर्व पाठांतर करावें, त्याप्रमाणे सकाळच्या पहिल्या तासांत गणितासारखा कठिण विषय अभ्यासावा. डोकें ताजेतवानें असलें म्हणजे विचार सुचतो व अवघड उदाहरणेंही भराभर सुटतात. गणिताचा विषय रूक्ष अशी ओरड सर्वत्र आहे. पण ज्याला भाषा चांगली कळते त्याला गणित हा विषयही चांगला समजतो. उदाहरणें सोडविणे म्हणजे कोणीकडून उत्तरें जुळविणें असे विद्यार्थी समजतात, पण ती चुकी आहे. गणितामध्यें मुख्य काय सांगितलें आहे व काय विचारलें आहे हें पाहावें. जें प्रमाण सांगितलें असतें त्यावरून जें विचारलें असतें तें काढावयाचें असतें. म्हणून उदाहरणें सोडविण्याची रीतच चांगली ध्यानांत ठेवावी. कांही तरी आकडे मोडून पाठ केलेली उत्तरे जुळविण्याच्या भानगडीत न पडतां, उत्तरें चुकली

तरी चालतील; पण गणिताची पद्धत बिनचुक पाहिजे. अर्थात् त्या दृष्टीनें गणिताचा अभ्यास करावा. कटाळा आला की उदाहरण सुटत नसतें. म्हणून गणित विषयाचा अभ्यास मेंदू ताजातवाना जेव्हा असतो, तेव्हां करावा.

भाषा विषयाचा अभ्यास मोठ्याने पण दुसऱ्यास त्रास न होईल असा करावा. वाणीवर चांगला संस्कार होण्यास मोठ्याने वाचणे चांगले! कविता, व गद्यातील काही भाग मोठ्याने इकडे तिकडे फिरत जर वाचला तर कंटाळाही येत नाही व ध्यानातही लौकर राहातो. नव्या धड्यातील शब्द, वाक्प्रचार, प्रयोग व मांडणी ध्यानात येण्याकरिता त्याचा सारांश काढून ठेवावा. इंग्रजी, मराठी, संस्कृत, हिंदी अशा विविध भाषा आज अभ्यासाव्या लागतात. प्रत्येक भाषेंत त्यांचा काही एक विशेष असतो तेवढा ध्यानांत ठेवण्याची व तो वारंवार वापरण्याची सवय लावून घेतली पाहिजे. धडा वाचला की त्यातील ग्रहण काय करावयाचे हे नेमके समजले पाहिजे! कवितांच्या अन्वयार्थांचेंही असेंच आहे. पुष्कळ विद्यार्थी न समजता अन्वयार्थ पाठ करतात. कोणी व्याकरणातील सर्व व्याख्या मुखोद्गत करतात तर कांहींना भूगोलांतील व्याख्याची घोकपट्टी करण्याची वेडगळ सवय लागलेली असते. अन्वय व अर्थ करतांना क्रियापद, त्याचा कर्ता, कर्त्याची विशेषणें, कर्म व कर्माची विशेषणवाक्यें अशी सर्व निवडून काढून त्याची जुळणी करावयाची असते. ही पद्धत एकदां समजली की संस्कृत श्लोकाचे अन्वयार्थसुद्धा न चुकता लावता येतात. एकादा शब्द अडला तरी बिघडत नाही. पण श्लोक व कविता याचा अन्वय लावण्याची पद्धत चांगली समजावून घेतली पाहिजे! भाषाचा अभ्यास कसा करावा, बीजगणित, अंकगणित, भूमिती याचा अभ्यास कसा करावा, इतिहास, भूगोल कोणत्या पद्धतीने वाचावेत यासंबंधी विद्यार्थ्यांनी शिक्षकाशी चर्चा करावी व अभ्यासाची पद्धत समजून घ्यावी.

व्याकरण हा विषय घोकण्यापेक्षा समजून घेण्याचाच असतो. शब्दांच्या जाती, प्रयोगाचे प्रकार, विभक्ति, लिंग वचन, प्रयोग, काळ हे सर्व रोजच्या भाषेंत असतातच. बोलण्याच्या भाषेंतूनच यांची निवड करावयाची असते. म्हणून घोकंपट्टीपेक्षा हा विषय नीट समजून घेण्याकडे अधिक लक्ष पाहिजे!

व्याकरण हें भाषेचें शास्त्र आहे. भाषा समजूं लागली कीं व्याकरण समजण्यास अडचण पडत नाहीं. अलीकडे भूगोल हें एक शास्त्र झालें असून त्यात विविध आकृती, चित्रें व नकाशे असतात. त्या नकाशांवरून कोणतें पीक कोठें होतें. कोणते पशु कोठें निपजतात, हवा, पाऊस पाणी, कालवे, उद्योगधंदे, कारखाने, व्यापार, रस्ते अशा सर्व विषयांची माहिती करून घ्यावी. नकाशावरून या विषयाचा अभ्यास केल्यास तो विषय पुष्कळच सुलभ व मनोरंजक होतो असा अनुभव आहे. इतिहासाच्या अभ्यासालाही नकाशाचें साहाय्य अवश्य घ्यावें. ऐतिहासिक व्यक्ति, त्यांच्या स्वाऱ्या, त्याचे मार्ग, त्यांच्या लढाया, वगैरे सर्व ध्यानीं येण्यास नकाशे पाहिजेत, ते नसल्यास नकाशा काढून अभ्यास करावा. व्यक्ती, लढाया, कांहीं महत्त्वाचे सन, यासबंधाचें टाचण खोलीत लावलेलें असावें.

वर सामान्यतः अंकगणिताबद्दल जें सांगितलें तेच बीजगणित, भूमिती वगैरेनाही लागू आहे. अलीकडे अभ्यासाचे विषय पुष्कळ झाले आहेत, अशी ओरड आहे. त्यासंबंधी येथें लिहिणें अप्रस्तुत आहे. शाळांमध्यें जे अनेक विषय असतात, त्यांचा अभ्यास विद्यार्थ्यांना करणें भाग आहे म्हणून प्रत्येक विषयाची किल्ली समजून घेतली पाहिजे ! अभ्यासाची पद्धत समजून घेतल्याशिवाय अभ्यास करणें सर्वस्वी चुकीचें आहे. चित्रकला, सुतारकाम, विणकाम, कातरकाम, इत्यादि कांहीं कलाकौशल्याचे विषयही शाळांमध्यें ठेवलेले असतात. या सर्व विषयांची आवश्यकता आहे हें सांगावयास नकोच. बौद्धिक विषयाचा कंटाळा आला की हस्तकौशल्याचा अभ्यास करावा. मेंदूप्रमाणें हातालाही कामाची सवय पाहिजे. विशेषतः आजच्या या यांत्रिक युगात प्रत्येकाला यंत्रविद्येचें प्राथमिक ज्ञान अवश्य हवें. भावी काल हा यंत्राचाच आहे. म्हणून विद्यार्थ्यांनी यांत्रिक ज्ञानाकरिता अंग मोडून झटावें.

## घरगुती धंद्याकडे लक्ष द्या

अलीकडे धदेशिक्षणाची ओरड सर्वत्र आहे. धदेशिक्षण पाहिजे, धदेशिक्षण पाहिजे असें सर्व म्हणतात; पण परंपरागत आणि वडिलार्जित जे धंदे घरोघरीं चालू असतात, तिकडे मुले लक्ष देत नाहीत; हा हल्लीच्या शिक्षणात एक मोठा दोष आहे. या पुस्तकी शिक्षणामुळें काम करणें कमीपणाचें वाटतें, हा मोठा घात आहे. म्हणून शिकलेला न्हाव्याचा व परटाचा मुलगा घरचा

धंदा पाहात नाही, चांभाराचा मुलगा दुकानावर बसत नाही, आणि सुताराचा मुलगा बापाच्या धंद्यात पडत नाही. यामुळें असलेले धंदे जाऊं लागले आहेत, व नवीन तर येत नाहीत. कोणतेही काम वा धंदा करण्यांत कमीपणा नाहीं. कामांत उच्चनीचता नाही; म्हणून विद्यार्थ्यांनीं आपल्या घरच्या धंद्यांची कधीही उपेक्षा करूं नये. सुतारी, सोनारी, लोहारी, शिवणकाम, कल्हई करणें, खोदकाम, घडकाम, भाज्या विकणें, दुकानें चालविणें, असले अनेक प्रकारचे जे जे उद्योग आपल्या घरी असतील त्या सर्वांचे शिक्षण विद्यार्थ्यांनीं अवश्य घ्यावें. पुढें धंदा कोणताही करावयाचा ठरला तरी अनेक प्रकारचें शिक्षण हें माणसाचा बौद्धिक विकास करण्यास साहाय्य करतें. शिक्षण म्हणजे पुस्तकी शिक्षणच नव्हे. शिक्षण म्हणजे कर्मेंद्रियें, ज्ञानेंद्रियें या सर्वांचा प्रत्यक्ष प्रयोग, अनुभव आणि तर्क यांमुळें झालेला विकास होय.

आतांशा टंकलेखक (टाइपरायटर) आले असले तथापि हस्ताक्षराचें महत्त्व कांही कमी नाहीं. पूर्वीपेक्षा या हस्ताक्षराकडे हल्ली फारच दुर्लक्ष होतें. हस्ताक्षर घटविण्याला मुळी वेळच नसतो, म्हणून विद्यार्थ्यांनीं रोजचें जें लिहिणें असेल तेंच स्वच्छ, मोकळें, वळणदार, असें लिहिण्याचा परिपाठ ठेवावा. हल्लीच्या अभ्यासांत जसें पुष्कळ वाचावयाचें असतें, तसेंच पुष्कळ लिहावयाचेंही असतें. तें काळजीपूर्वक सुवाच्य, मोकळें, स्पष्ट लिहिण्याची सवय लागली म्हणजे अक्षराला वळण हळूहळू येतें. बालबोध, मोडी, इंग्रजी हस्ताक्षरें चांगली पाहिजेत. चित्रकलेचें ज्याला थोडें ज्ञान आहे, त्याला अक्षर घटविणें त्रासदायक होत नाही!

अभ्यास सकाळीं तीन साडेतीन तास अगदी ठाण मारून मध्यें न उठतां करावा. टेबलखुर्ची असल्यास उत्तम. नसल्यास पुढें बळसटी अगर लेखनफलक ठेवून ताठ बसून अभ्यास करावा. पाठीला पोक आणून कधींच बसू नये. सूर्याचा व दिव्याचा प्रकाश साक्षात् डोळ्यांवर न पडेल अशा पद्धतीनें अभ्यासास बसावें. पडून, लोळून अभ्यास कधींही करू नये. बसण्याचा कंटाळा आला तर उभ्यानें अगर हिंडत हिंडत अभ्यास करावा. प्रत्येक तासाचा अभ्यास होताच त्या अभ्यासाचें थोडें मनन करावें. मनन म्हणजे विषय पचविण्याची क्रिया होय! श्रवणाप्रमाणें मननाचीही आवश्यकता आहे.

म्हणून वाचनाप्रमाणें मननाचाही क्रम ठेवावा म्हणजे स्मरणशक्ति वाढते व विषय नेमका सुचतो.

## खाजगी शिकवण्या घन्या का वाईट ?

अलीकडे खाजगी शिकवण्यांचा फारच सुळसुळाट झाला आहे. श्रीमंत पालक फॅशन म्हणून शिक्षक नेमतात, तर मध्यम स्थितींतील पालक मुलांनी झपाझप वरच्या ईयत्तांमध्यें जावें म्हणून शिक्षक नेमतात. एकंदरीत विचार केला तर खाजगी शिक्षक नेमणें हें वाईटच म्हणावें लागतें ! पण दुसरी बाजू अशी की वर्गांत मुलांची संख्या जर ५०।६० असली तर विचारा शिक्षक तरी शिकविणार काय? पूर्वी वर्गांत मुलें थोडीं व सुसंस्कृत वर्गांची असत, त्यामुळें शिक्षकाला सर्वांकडे लक्ष देता येत असे. आतां रोजची शाळा म्हणजे दिलेल्या अभ्यासाच्या रोजच्या परीक्षेचें स्थान ! अभ्यास कुठेंही करावा, शाळेंत फक्त परीक्षेकरतां व हजेरीकरितां यावें; अशी स्थिति प्राथमिक शाळांपासून झाली आहे. त्यामुळें शिक्षक नेमणें भाग पडतें. पण एकंदरीत शाळेंत मास्तर, घरी मास्तर असा सारखा मास्तरांचा काच विद्यार्थ्यांच्या मागें असला तर मुलांची जिज्ञासा मरते, व तीं परावलंबी बनतात. मुलांना आत्मविश्वास असा कधींच वाटत नाहीं. शिक्षण म्हणजे जिज्ञासा वाढवणें होय. गुरुनें (देशिक) दिशा दाखवावी व अन्तेवासीनें म्हणजे शिष्याने त्याप्रमाणें आपली शोधक बुद्धि चालवून वागावें, असें झालें पाहिजे.

आज जगांत जे मोठमोठे शोध लागत आहेत, व जगांतील राष्ट्रें जीं शास्त्रसंपन्न झाली आहेत ती जिज्ञासेमुळेंच होत. दुर्दम्य जिज्ञासा हीच शोध लावते. विविधज्ञानशाखेवर यामुळेंच ग्रंथ होतात. म्हणून जिज्ञासा वाढविणें, ज्ञानेंद्रियें व कर्मेंद्रियें यांचा उपयोग करण्यास शिकवणें हेंच शिक्षण आहे त्या दृष्टीनें खाजगी शिकवण्या या अनिष्ट होत. मुलगा आजारी पडला किंवा कांहीं कारणानें अभ्यास मागें राहिला तर तेवढ्यापुरती शिकवणी क्षम्य आहे. पुस्तकाबाहेरच जग आहे. जगाचें निरीक्षण करणें, व तें डोळे व कान नीट उघडे ठेवून करणें, हे विद्यार्थ्यांना शिकविलें पाहिजे ! शहरें कशीं पाहावीं, प्रवास कसा करावा, डोंगर, अरण्यें, गांवें, ग्रंथालयें, बाजार, यात्रा, जत्रा, प्रदर्शनें, पदार्थसंग्रहालयें, मनुष्यस्वभाव या सर्वांचें अवलोकन करण्याची जी एक दृष्टि

असावयास पाहिजे, ती हल्लीच्या शिक्षणांत नसते. याचे कारण मुलगा पुस्तकी अभ्यासाच्या बाहेर मुळी निघतच नाही ! ज्ञानेंद्रियानी ज्ञान मिळवावे, व कर्मेंद्रियानी ते पचनी पाडावे असे झाले पाहिजे. हे सर्व लक्षात ठेवून विद्यार्थ्यांनीं अभ्यास करावा.

विद्यार्थ्यांनीं घरी अभ्यास करावा व शाळेत मुख्यतः विषय समजून घ्यावा. विद्यालयांत वेळेवर जाणें, वर्गात चाललेला विषय सावधानचित्तानें ऐकणें, ऐकत असताना टिपणे घेणे या पद्धतीने शाळेंत अभ्यास केला पाहिजे. अध्यापक विषय सांगत असताना मध्यें मध्यें सारखें त्याना विचारुन बेजार करूं नये त्यामुळें विषय सागण्याचा जो ओघ असतो, त्याला व्यत्यय येतो. एखादी शंका असल्यास मध्ये विचारावी. पुष्कळ प्रश्न असल्यास वर्ग सपल्यावर ते विचारावेत. विद्यालयांत वक्तशीर जाणें, नीट ऐकणें, समजून घेणें, असा क्रम ठेवला म्हणजे घरी फार अभ्यास करावा लागत नाही, आणि परिक्षेच्या वेळी तारांबळही होत नाही ! परंतु विद्यार्थ्यांमध्ये आळस, उद्धटपणा, चांचल्य, गप्पा, दुश्चितपणा, घुम्मेपणा, स्वत ला सर्व येते असा अभिमान, व दुराग्रह हे दोष असतात हे दोषच विद्येच्या आड येतात सर्व विद्यार्थ्यांमध्यें विषय आकलन करण्याचे साधारणपणे सामर्थ्य सारखेंच असतें. पण कोणी विषय न समजता मान डोलावतो तर कोणी शिक्षकाला आपले हृद्गत कळू देत नाही. कोणी वर्गातील विषय आळसाने ऐकत बसतो तर कोणी त्याच वेळी टिवल्याबावल्या करतो अगर जवळच्याशी गप्पा मारित बसतो कॉलेजांतील स्टॉपिंग हे तर प्रसिद्धच आहे. प्रत्येक विद्यार्थी काही तरी प्रश्न विचारून विषयांतर करतात ! काही घंटा होईपर्यंत वेळ कसा घालवावा, याच्या हिकमती लढवतात. हे सर्व दोष त्याज्य आहेत. या दोषांमुळेंच विद्या येत नाही, असे महाभारतकर्ते व्यास म्हणतात

आलस्यं मदमोहौ च चापलं गोष्ठिरेव च ।
स्तब्धता चाभिमानित्वं तथाऽत्यागित्वमेव च । महाभारत ।
एते वै सप्त दोषाः स्युः सदा विद्यार्थिनां मताः ॥ उद्योगपर्व अ.४०।५ ।

*गप्पांचें व्यसन*

प्रातःस्नानाचा नियम केला की आळस जातो. स्वत ला निघायचे आहे

ही जाणीव विद्यार्थ्यांनि ठेवली की चांचल्य, मद, मोह इत्यादि दोष जातात. पण हें गप्पांचें व्यसन मात्र जें विद्यार्थ्यांत वाढत आहे, तें कसें जाईल हा मोठा प्रश्न आहे. चर्चा म्हणून, मन मोकळें व्हावें म्हणून, काही मर्यादेपर्यंत गप्पा पाहिजेत. पण शाळेंत गप्पा, घरीं गप्पा, काम करतांना गप्पा, जेवतांना गप्पा, झोपतांना गप्पा, ही संवय फार वाईट आहे. गप्पा, संभाषण, चर्चा हें अभ्यासाचें साधन आहे, साध्य नव्हे. पुष्कळ विद्यार्थ्यांमध्यें उगाच जो वावदूकपणा, वितंडवृत्ति व कांहीं तरी बोलून सुटणें हें जें आढळतें तें या गप्पांमुळेच होय ! अधिक गप्पा मारणें व त्या मोठमोठ्यानें मारणें, यामुळें मनाला व वाणीला शीण होतो. मेंदूची शक्ति गप्पांमुळें वाया जाते. वर्तमानपत्र वाचलें मार गप्पा, व्याख्यान ऐकलें मार गप्पा, कोठें व्याख्यान चाललेलें असले की न ऐकतां कर कुजबुज ! ! यामुळें उथळ वृत्ति वाढते व गांभीर्य नष्ट होतें. चहा, दारू, जुगार याहीपेक्षा हें गप्पांचें व्यसन फार घातक आहे. इतर व्यसनांमध्ये फक्त पैसाच जातो; पण या व्यसनात आयुष्य व मेंदू ही खर्ची पडतात. विद्यादेवीच्या उपासकानें या व्यसनापासून अलिप्त राहिलें पाहिजे. तरच त्याचेकडून अभ्यास होईल.

चौदा पंधरा वर्षे वयाच्या विद्यार्थ्यांनी रात्री अभ्यास न करिता लौकर निजावें पण पुढें विद्यार्थ्यांनी रात्रींही तासदीड तास अभ्यास करावा. रात्रीं अभ्यासाकरितां दिवा शांतसा असावा. राकेलची भस्मासुरी चिमणी अगर विजेचा प्रखर दिवा ही दोन्ही वर्ज्य करावीत. डोळ्याला व मेंदूला त्रास देणारा दिवा नसावा. उताणें पडून, लोळून अभ्यास करू नये. दिव्याचा प्रकाश साक्षात् डोळ्यावर न पडेल अशा तऱ्हेनें अभ्यासास बसावें. बारीक, किचकट, अक्षराची बुकें रात्रीं वाचूं नयेत आणि डोक्याला शीण देणारा विषयही रात्रीं अभ्यासू नये. वर्गामध्यें झालेल्या भाषाविषय, इतिहास, भूगोल वगैरे विषयांचा अभ्यास रात्रीं करावा. वर्गांत झालेल्या अभ्यासाची रात्रीं चिंतनिका करावी. दीड तासापेक्षा अधिक वेळपर्यंत रात्रीं अभ्यास करूं नये. नाटकें, शृंगारिक कादंबऱ्या, आपुकमापुक लघुकथा या रात्रीं वाचीत बसू नये. निजण्याचे पूर्वी धार्मिक, प्रामादिक, ईशस्तुतिपर काही ग्रंथ अवश्य वाचावेत.

विद्यार्थ्यांनी शाळेच्या अभ्यासांतच गढून जावें, त्याच्या बाहेर काही वाचू नये; असें कोणीही म्हणणार नाहीं शाळेचा अभ्यास हा प्राथमिक

पाया आहे. त्याच्या साहयाने खरे ज्ञान व इतर पुष्कळ माहिती स्वत:च्या श्रमानेच मिळवावयाची असते. म्हणून भारतीय विद्यार्थ्यांनी अभ्यासाव्यतिरिक्त वेळात वेळ काढून चांगल्या चांगल्या ग्रंथाचे वाचन केले पाहिजे. वैदिक वाङमयाची माहिती अधिकृत ग्रंथावरून घ्यावी. महाभारतकालीन व रामायणकालीन परिस्थिति, मध्यकालांतील सर्व इतिहास समजावा म्हणून तज्ञाचे ग्रंथ अवश्य वाचावेत. -भाषेच्या दृष्टीने, तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें व धार्मिक उदारतेच्या दृष्टीने, धर्मसुधारणेच्या दृष्टीने निवडक ग्रंथ काळजीपूर्वक वाचावेत. वाङमय, साहित्य, कला, उद्योग, समाजशास्त्र, धर्मशास्त्र, इतिहास, अशा विविध विषयांवर जे भारदस्त ग्रंथ निर्माण झालेले आहेत, ते ग्रंथ विद्यार्थ्यांनी मधून मधून वाचावेत.

आजच्या जगात काय चालले आहे, कोणती राष्ट्रे कोणत्या उलाढाली करीत आहेत, याची खडानुखडा माहिती असावी म्हणून भारदस्त अशा वृत्तपत्रांचे वाचन विद्यार्थ्यांनी ठेवावे. दैनिक पत्रें, लघुकथानी भरलेली मासिकें आणि आपुकमापुक वाङमय की जें वाचले असता क्षणभर फक्त करमणूक होते, असले वाङमय विद्यार्थ्यांनी फारसें वाचू नये. विद्यार्थ्यांनी अभ्यासी दृष्टीने भारदस्त नियतकालिके वाचून टांचणे करावीत. हें हलके वाचन सायंकाळी अगर रात्री करावें. नियतकालिकांमध्यें कांही चांगले लेख असतात, तेवढे नेमकेच गुरुजनांच्या शिफारशीप्रमाणे विद्यार्थ्यांनी वाचावेत. विद्यार्थ्यांनी आपल्या गुरुजनाच्या साहयाने निवडक उत्तम पुस्तकांची यादी करून घ्यावी, व त्या यादीतील पुस्तके सवडीने वाचावीत *

विद्यार्थ्यांनी अभ्यास म्हणूनच प्रचलित राजकारण अभ्यासावे. राजकारण हें इतकें व्यापक आहे की कोणताही व्यवहार राजकारणांतून सुटत नाही. म्हणून अद्यावत् वृत्तपत्रांचे वाचन ठेवावे पुढाऱ्यांची भाषणें व त्यांच्या हालचाली यांचे अवलोकन करावें, राजकारणातील पक्षोपपक्ष आणि अटीतटीचे सामने हेही ध्यानी घ्यावेत. याही अभ्यासाचा पुढें अवश्य उपयोग होतो. साक्षात् राजकारणांत पडणाऱ्याला या अभ्यासाचा उपयोग होतोच;

* निवडक मराठी पुस्तकांची यादी शेवटी परिशिष्टामध्यें दिली आहे

ती पहा

पण त्याशिवाय इतर धंदे करणाऱ्यांनासुद्धां परंपरेनें या शिक्षणाचा फायदा मिळतो. शिवाय सर्व राष्ट्र हें एक कुटुंब आहे, या कुटुंबांतील कर्ते पुरुष म्हणजेच राजकीय पुढारी होत. घरांतील कर्त्या माणसाचें अनुकरण जसें मुलें करतात तसेंच राष्ट्रांतील या वडील माणसांचें अनुकरण विद्यार्थ्यांनीं करावें. मात्र तें अभ्यासपूर्वक करावें. अर्थात् अभ्यास म्हणूनच राष्ट्रीय पुढाऱ्यांची जी साक्षरताप्रसार, ग्रामोद्धार, निवडणुकी, एखाद्या कार्याकरितां फंड मागणें, इत्यादि जी कामें चालूं असतील त्यांत केव्हां केव्हां भाग घ्यावा.

हल्लीं इंग्रजी भाषा शिकणें हें अवश्य झालेंच आहे. पण महाराष्ट्रीय पुढारी उत्तम बोलणारे व वक्ते म्हणून गाजत नाहीत असा अनुभव आहे. अखिल भारतीय पुढारी होण्याला इंग्रजींतून लेखन व इंग्रजीतून भाषण या कला आल्याच पाहिजेत. या कलांच्या अभावीं मनुष्य केवढा मोठा असला तरी तो भारतीय क्षितिजावर चमकत नाहीं, अशी वस्तुस्थिति आहे. निदान प्रत्येक कर्त्या नागरिकाला यापुढें उत्तम हिंदी भाषा तरी आली पाहिजे. कारण हिंदी ही राष्ट्रभाषा आहे. ती सर्वत्र हिंदुस्थानात चालते उत्तम हिंदी जाणणाऱ्याला हिंदुस्थानांतील कोणतेंही व्यवहार उत्तम रीतीने करतां येतील.

ज्यांची महत्त्वाकांक्षा थोडी उच्च व प्रबल आहे अशांनीं जमल्यास फ्रेंच, जर्मन, जपानी या भाषा अवश्य शिकाव्या. जगात जी जिवंत राष्ट्रें आहेत, त्यांचे जिवंत विचार समजण्यास त्यांच्या भाषा आल्या पाहिजेत. ज्यांना या भाषा उत्तम येतील ते जपान, जर्मनी, फ्रान्स देशांत जाऊन तेथें आपला प्रभाव दाखवतील आणि तेथील ज्ञान कचाप्रमाणें हिंदुस्थानांत आणतील. म्हणून विद्यार्थ्यांनीं इतस्ततः काहीं तरी वाचून वेळ घालविण्यापेक्षां सुधारलेल्या राष्ट्रांतील भाषांचा अभ्यास करावा.

---

# प्रकरण ९ वें

## अन्न व वस्त्र

शौचाचार व अभ्यास यासंबधाने विवेचन केल्यानंतर विद्यार्थ्यांच्या अन्नाचा व वस्त्राचा विचार क्रमप्राप्त येतो. विद्यार्थी हे बोलूनचालून परावलंबी असतात. अर्थात् घरी, बोर्डिंगमध्यें आणि खाणावळीमध्यें जशा तऱ्हेने अन्न असेल तेच त्याना खाणें भाग पडतें. ल्हान विद्यार्थ्यांपुरती ही स्थिति खरी असली तथापि कॉलेजमध्यें विद्यार्थ्यांचे वलव असतात बोर्डिंग व खाणावळीमध्ये प्राय. प्रौढ विद्यार्थीच जेवत असतात. प्रत्येक घरामध्यें जे समजस विद्यार्थी असतात त्याना ही अन्नासबधी थोडीबहुत काळजी घेणें अशक्य नसते. यास्तव विद्यार्थ्यांनी कोणते अन्न खावे, तें किती खावे, केव्हां खावे, कसे खावे, याचे विवेचन त्याना मार्गदर्शक होईल यात शका नाही.

विद्यार्थ्यांचे अन्न कसें असावे, यासंबंधी पुष्कळ सांगण्याजोगें आहे. परंतु घरोघरीं मुलांकरिता निराळा स्वयंपाक व इतराकरिता निराळा स्वयंपाक हें जोंवर अशक्य व अव्यवहार्य आहे तोवर हे विवेचन फोल आहे दारिद्र्यामुळें मध्यम स्थितीतील कुटुंबांनासुद्धा आमटी-दामटी, व फार तर भात, येवढे करून गुजराण करता करता, पुरे पुरे होते! असे जरी असलें तरी आहाराचे महत्त्व काही कमी नाही.

"अन्नमशितं त्रेधा विधीयते" खाल्लेल्या अन्नाचे तीन विपाक होतात. एकामुळे शरीराचें, दुसऱ्याने मनाचे व तिसऱ्याने बुद्धीचे पोषण होते. 'आहार शुद्धौ सत्त्वशुद्धिः । सत्त्वशुद्धौ ध्रुवा स्मृतिः ।' आहारामुळे अंतःकरण शुद्ध होतें, अंत:करणाच्या शुद्धतेमुळें स्मरणशक्ति तीव्र होते. सर्व शौचामध्यें अन्नाचें शुचित्व हे विशेष आहे. अन्नाच्या शुद्धतेमुळें जसें आयुष्य वाढते तसेंच तें अन्नदोषामुळें घटते. शमर वर्षे जगून ज्या शरीराकडून कांही महत्कार्य करून घ्यावयाचे आहे, त्या शरीराला पौष्टिक वीर्यदायी व बुद्धिवर्धक असेंच अन्न दिले पाहिजे

हिंदु विद्यार्थ्यांमध्ये प्रवृत्तमास व निवृत्तमांस असे दोन वर्ग आहेत मासप्रवृत्तीपेक्षा मासनिवृत्ति बरी असेच सामान्यत. जगांतील विचारी लोक म्हणतात. मांसाहार करण्यांत मोठेंसें पाप नाही व ते न करण्यांत मोठेंसे

पुण्य आहे असेंही नाहीं. पुष्कळ जातींमध्यें पूर्वापार मांसाहार आहे व कित्येक जातींत तो नाही. त्यावरून परस्परांना उच्चनीच समजण्याचें मुळींच कारण नाही. मांसनिवृत्तांनी मांस खावें व मांस खाणाऱ्यांनीं ते सोडावें असेंही म्हणण्याचें कारण नाही. पूर्वी एका काळी समाजात सर्वत्र मांसाहारच होता. पुढें आपल्याप्रमाणेंच सर्वांना आत्मा असतो असें जेव्हां पटूं लागलें, त्याच वेळी मांसाहार सुटला. तथापि मांसाहारसुद्धा शुद्ध, पवित्र, पौष्टिक, बलद असा पाहिजे. कुजलेलें, मरणेरडें, शिळें मांस खाऊं नये. ताजें मांस हेंच हितकर होय. पूर्वी मृगया करून मांस खात असत. अंडी हें पौष्टिक व बलद अन्न आहे व तें स्वस्तही पडतें.

## पंच मकार वर्ज्य करा.

हिंदु समाजांतील ज्या जाती प्रवृत्तमांस आहेत, त्यांनी निवृत्तमांस व्हावें असें नाही. पण आजकालच्या विद्यार्थ्यांमध्यें मांसाहार वाढत आहे, असें पुण्यामुंबईस गेलें असता समजतें. या मांसाहाराबरोबर मदिरासेवनाची चटकही लागू लागली आहे असें कोणी म्हणतात. हें जर खरें असेल तर हें सर्वस्वी निंद्य व निषेधार्ह आहे. तारुण्यात मद्य, मांस, मदन, मोह आणि मस्ती हे पाच मकार जडले म्हणजे आयुष्याचें वाटोळें होण्यास मुळींच वेळ लागत नाही. म्हणून विद्यार्थ्यांनी विशेषतः निवृत्तमांस विद्यार्थ्यांनी याबद्दल फारच काळजी घेतली पाहिजे. विद्यार्थीदशा ही वाटेल ते आहारविहार व स्वैराचार करण्याकरितां नाही. विद्यार्थीदशेंत आहारविहाराचीं पथ्यें पाळलींच पाहिजेत. असो!

भारतीय विद्यार्थ्यांनीं शाकाहारांतील भक्ष्याभक्ष्याचा विचार आपली प्रकृति व वैद्यशास्त्र यांना अनुसरून करावा. कारण पूर्वीचा भक्ष्याभक्ष्य विचार हल्ली मुळींच उपयोगाचा नाही. त्याचप्रमाणे कुणाच्या हातचें अन्न खावें, कुणाच्या घरी भोजनास जावें याचाही विचार रूढीच्या दृष्टीनें मुळींच करूं नये. शुद्ध, स्वच्छ, पौष्टिक, रुचकर अन्न प्रेमानें व मनापासून बोलावणाऱ्याच्या घरचें खुशाल खावें! विद्यार्थ्यांनी आपल्या खऱ्या मित्रमंडळीमध्यें कोणाच्याही घरी खुशाल भोजनास जावें. मात्र ते अन्न शुद्ध, स्वच्छ, रुचकर, पौष्टिक व बलशाली असें असावें.

अलीकडे फराळाची दुकाने वाढल्यापासून तेलकट, जळजळीत, तिखट, आंबट, मसालेदार खमंग पदार्थ, उसळी, मिसळी, फोडण्या दिलेल्या कोशिंबिरी असले पदार्थ खाण्याची फार प्रवृत्ति वाढत आहे. वास्तविक तोंडीलावणीं ही भाकरी, पाव, चपाती, भात हें जें मुख्य अन्न त्याला साह्य म्हणून असतात. पण धन्यापेक्षां चाकराला जसें अधिक महत्त्व क्वचित् दिसते तसेच मुख्य अन्नापेक्षां या भंजनांना सांप्रत अधिक महत्त्व आलेले आहे. जात्या ज्यांना भूक कमी, ज्यांचा अग्नि मद अशांना ही भजनें अधिक खावी असें वाटतें. श्रीमंताना पक्वान्नांचा वीट येतो, म्हणून त्याना ही असली भजनें लागतात. गोरगरिबानी विशेषतः विद्यार्थ्यांनी असल्या उपागापेक्षा मुख्य पौष्टिक अन्नाकडेच दृष्टि ठेवली पाहिजे! मूग, गहूं, जोधळा, तांदूळ, तूप, दूध, ताक, दही, बटाटा, केळी, काकडी, टमाटो, मुळे, लिंबू, वागी, दूधभोपळा, कोबी, नवलकोल, भुईमूग, मोड आलेली धान्यें, द्विदल धान्यें हे पदार्थ भोजनामध्यें जितके अधिक असतील तितके उत्तम होत. दूध, तूप, लोणी, दही, ताजें ताक हे पदार्थ जितके पचतील तितके खावेत. केळी, टमाटो, पपई, भुईमूग, संत्री, मुसंबी, हे पदार्थही आहारात अधिक असावे. कांदा व लसूण यांचे अतिरिक्त सेवन वाईट. चवीकरतां रात्री एकादें कांदालसणीचे तोंडी लावणें इष्ट आहे.

## व्हिटॅमिन असतील ते पदार्थ खा.

हिंदुस्थानांत केळी व इतर फळें पुष्कळ पिकतात. पण त्या मानानें तीं आहारांत खाल्लीं जात नाहीत. दूध, केळें, खजूर व भुईमूग हा गरगरीत, पौष्टिक, बुद्धिवर्धक व वीर्यपोषक असा आहार आहे. बदाम, मनुका, खारीक, खोवरें, बेदाणा यांचाही उपयोग अन्नामध्यें ऐपतीप्रमाणें मुबलक करावा. ऋतुकालोद्भव फुले, फळें व भाज्या या भोजनांत असाव्या. डॉक्टर लोक हल्ली पालेभाज्या खाण्यास सांगतात. करडा, मुळा, मेथी, माठ, हरभरा, आळू, चाकवत, चुका आणि असल्यास इतर पालेभाज्या विद्यार्थ्यांनी खाव्यात. या पालेभाज्या व टमाटो, कोबी, मुळे हे पदार्थ शक्य तों कच्चे खावेत. तसेंच असडीक तांदूळ व जात्यावर दळलेलें पीठ यांचा उपयोग आहारांत सदैव करावा. कॉलेजमधील वसतीच्या व्यवस्थापकांनी जेवण्याकरतां जन्म नाही, जगण्याकरतां जेवण आहे येवढें ध्यानात टेवून तशी व्यवस्था केल्यास

तें हितावह होईल. अतिगोड खाणें, गुळाचे व साखरेचे पदार्थ पुष्कळ खाणें, पुरणपोळी, कडवू हे पदार्थ वरचेवर खाणें, यामुळें कोठयात कडकी होते व त्याचा वीर्यावर परिणाम होतो. कांदेलसणीच्या चमचमीत फोडण्या घालून शिळा भात व भाकरी, दह्यांत कालवून खाण्याची कित्येकांना संवय असते. शिळे पदार्थ व ते अशा फोडण्या देऊन खाल्ले की सारा दिवसभर तहान तहान होते. पोटांत पाणी जास्त गेल्यानें आळस येतो व दुसरे दिवशी पोट झाडूं लागतें किंवा अवरोध तरी होतो. रात्रीं हें वरील प्रकारचें जेवण यथेच्छ झालें तर झोप नीट येत नाहीं. वरचेवर लघुशंकेस उठावें लागतें आणि स्वप्नें पडून ब्रह्मचर्यऱ्हास होतो. उसळ, मिसळ, चिवडा, भजी, चकली, शेव, वडा हे असले पदार्थ प्रसंगी केव्हां तरी खावेत. पण तेही अतिरिक्त खाऊ नयेत. मसालेदार, खमंग, तळलेले पदार्थ नित्य खाणें म्हणजे मृत्यूला लौकर हृदकर्णेच होय! चांगली भूक लागली की ताजी दशमी, पोळी, भाकरी, खरोखरच नुसत्या मिठावरोबरसुद्धां अमृतासारखी लागते. शेतकरी लोक ताजी भाकर आणि तोंडी लावण्यास एकादी मिरची, मुळा अगर वांगें घेऊन सबंध जेवण जेवतात, याचें कारण त्याना भूक प्रखर लागलेली असते हेंच होय.

प्रायेण श्रीमतां लोके भोक्तुं शक्तिर्न विद्यते ।
काष्ठान्यपिहिजीर्यंते दरिद्राणां परंतप ॥ महाभारत १२।२८।२९

बहुतकरुन श्रीमंत लोकांना खाण्याची इच्छा असते, पण पचविण्याची शक्ति नसते. पण दरिद्री माणसें मात्र लाकडेंसुद्धां पचवितात.

भुकेला कोंडा व निजेला धोंडा या म्हणीतही हाच अर्थ आहे. पण ती भूक कडकडून लागते केव्हां? तर आरोग्य चांगलें असेल तेव्हां. विद्यार्थ्यांना हल्लीं इकडच्या तिकडच्या कांहीं तरी खाण्याच्या सवयीमुळें आणि अनारोग्यामुळें अग्निमांद्य आलेलें आहे. दुपारी ११ ते १२ आणि सायंकाळी ७ ते ८ असें दोन वेळचे भोजन हेंच खरें पुष्टिदायक व आरोग्यकारक असतें. सकाळी आवश्यकता व अनुकूलता यांना अनुसरून थोडें दूध घ्यावें अथवा दशमी खावी. दुपारी अकरा वाजतां चरचरीत भूक लागते. ज्यांना अनुकूल आहे असे पालकसुद्धां आपल्या मुलांना सकाळीं पौष्टिक अन्न न देतां चहा, चिवडा, शेव, असले पदार्थ देतात. एकदरीत अलीकडे दारिद्र्य वाढलें म्हणतात पण माणसांचें खाणेंही वाढलें आहे. अगदीं गोरगरीबसुद्धां मुलें रडूं लागलीं कीं 'कुठें

दे, कुटें शोध दे, नाही तर भर्जे दे' असे करतात. एकदां अशा मंवयी लावल्या की भाकरी, पोळी, दशमी अशा पदार्थांची त्याना गोडी कळत नाही.

श्रीमंत मधल्या सुटीमध्यें मुलाना खाण्याकरता दशमी, शिरा हे पदार्थ देत नाहीत. घरीं केलेले असे पौष्टिक पदार्थ डब्यात घालून दिले तर मुलें मधल्या सुटीत आनंदाने खातील. परन्तु पालकामध्येंच हा विवेक दिसत नाही. कांहीं पालक मुलांच्या खिशात मधल्या सुटीकरता पैसा दोन पैसे देतात व तीं मुलें शाळेच्या बाहेर धुळीत असलेले अस्वच्छ, व माशा ज्यावर घोंगावत आहेत असले अहितकारक व रक्ष पदार्थ विकत घेऊन खातात व गटागटा पाणी पितात. इग्रजांचें राज्य इतकी वर्षे आहे, व साडे अकराच्या शाळा होऊनही बरीच वर्षे झालीं, तथापि दररोज घरांमध्यें मुलांना घाईघाईनेंच जेवावे लागते. कढत कढत अन्न, न चावता, विद्यार्थी कसे तरी पोटात ढकलतात, व हातावर पाणी ओतून शाळेकडे पळत सुटतात. अशा पोरांच्या कपाळी मधल्या सुटीत तरी काही पौष्टिक अन्न पालक डब्यातून घालून देतात, म्हणावें तर तसेंही नाही. या एकंदर प्रकारामुळें आयुष्यक्षय होतो व मुलांचें आरोग्य बिघडतें.

## जेवण्याकरितां जन्म नाहीं; जगण्याकरितां जेवण आहे

विद्यार्थ्यांनी नेहमी मिताहारी असावे. जो मितभुक असतो तोच हितभुक होतो. जेवण्याकरिता जन्म नाही, कार्याकरतां जीवन व जीवनाकरता अन्न हे तत्त्व ध्यानात ठेवावे व अतिभोजन वर्ज्य करावे. अधाशासारखे खादाडपणाने पोटात खूप भरून घेतले तर पोटाला तडस लागतें, पाणी जास्त जातें, आळस येतो, अजीर्ण होते व ब्रह्मचर्यऱ्हास होतो. जो रोज थोडें जेवतो, तोच एकंदरीत पुष्कळ अन्न खातो व जो एकदम पुष्कळ भरून घेतो तो अनेक कारणांमुळें अन्न कमी खातो! विद्यार्थ्यांनी सण, उत्सव, सुटी, कार्यप्रस्थ अशा प्रसंगी यथेच्छ आहार करावा. पण रोज तसें जेवल्यास वर्गांत जाऊन डुलक्या घेण्याचा प्रसग येतो! रात्री अतिभोजन केल्यास निद्रा व ब्रह्मचर्य याचा नाश होतो. आग्रहाने पोटाला तडस लागेपर्यंत आकंठ जेवण्याची पद्धत घातक आहे. सावकाश प्रसन्न मनाने व चावून चावून जेवावें. जनावरें रवथ करतात; माणसाना तसें साधन नाही. म्हणून त्यांनी सावकाश

चावून जेवावें. चांगलें चावलेलें लाळमिश्रित अन्न लौकर पचतें व अशा जेवण्यानें तरतरी येते.

जेवतांना पाणी बेतावेतानें प्यावें. पाणी जास्ती प्याल्यानेंही अजीर्ण होतें. पोटाच्या एका भागांत पाणी, एका भागांत अन्न भरावें व एक भाग वायू खेळण्याकरितां मोकळा असावा. अन्नाप्रमाणें स्वच्छ व ताजें पाणी शक्य तर ते उकळून गाळून फिल्टर करून प्यावें, दुसऱ्याच्या भांड्यानें पाणी पिऊं नये. उष्ट्या भांड्यानें तर मुळीच पिऊं नये. जेवताना वाद व हमरीतुमरीच्या गप्पा करूं नयेत. प्रसन्न मनानें व शांत चित्तानें नेमस्तपणें जेवावें. विद्यार्थ्यांनीं दुपारीं सणावारी कार्यप्रसंगीं विडा खावा. रोज सुपारी खाणें, विडा खाणें, विड्या व सिगारेट ओढणें हें सर्वस्वी त्याज्य होय! भारतीय *विद्यार्थ्यांना विद्यार्थीदशेत असलेही व्यसन नसावें. एक विद्येचें व्यसन, आणि* दुसरें शरीरबलाचें व्यसन, हींच व्यसनें असावीत; पण हल्लीं विद्यार्थ्यांत अनेक व्यसनें घुसलेलीं दिसतात. त्यांतील चहाकॉफीच्या व्यसनाचा विचार करून हें प्रकरण संपवितों.

चहा, कॉफी वगैरे पेयें हीं व्यसनें आहेत कीं हें अन्न आहे, याबद्दल डॉक्टर लोकांत मतभेद आहे. पुष्कळ डॉक्टर चहा व कॉफी हीं पेयें अनिष्ट होत असें म्हणतात, तर त्याउलट हें अन्न आहे व तें अवश्य आहे असेंही कांहीं डॉक्टर म्हणतात. *आज जगांत सर्वत्र चहाचा प्रसार दिसतो.* तसाच तंबाखूचाही प्रसार जगभर आहे. तंबाखू खाणारे, ओढणारे, तपकिरीचा उपयोग करणारे जगांत पुष्कळ लोक आहेत. त्यावरून तंबाखू हें एक अन्न आहे असें म्हणता येईल काय? तंबाखूशिवाय पुष्कळ लोकांना जगतां येतें. तसेंच चहाकॉफीवाचून पुष्कळांचे नडेल असेंही नाहीं. परदेशांत जाऊन आलेले पण मुळींच चहा न पिणारे असेही लोक आढळतात. ज्या देशांत हवा थंड आहे, तेथें चहासारखें उष्ण पेय अवश्य आहे. पण हिंदुस्थानासारख्या उष्ण देशांत त्याचें कारण नाहीं; असेंही कांहीं म्हणतात. चहा असला तर लागतो व नसला तर अडत नाहीं, असाही कांहींचा अनुभव आहे. त्यावरून चहाची संवय विद्यार्थ्यांना नसेल तर बरें, असें आम्हांस वाटतें.

पूर्वीं सकाळीं घरोघरीं चहा तर नसेच क्वचित् दूध पिण्याची पद्धति होती. सर्वांना त्या वेळीही दूध मिळे असें नसे. पण लहान मुलांना दूध,

दशमी, भात, लाहिपीठ, पोहे असे कांही तरी खावयास देत असत. शेतकरी व कामकरी लोकांत न्याहारीची चाल पूर्वी होती व हल्लींही थोडी आहे. हे लोक सकाळी काही खाल्ल्याशिवाय बाहेर पडतच नाहीत. पण याही लोकांत हल्ली चहाने प्रवेश केला आहे. म्हातारे कोतारे, अगदी मोवळ्या बायका, स्त्रिया, मुलें या सगळ्यांमध्यें हा चहा आता बळ बाधून राहिला असल्यामुळें त्याच्या विरुद्ध बोलण्यांत काही अर्थ नाही. तथापि विद्यार्थ्यांना उद्देशून आम्हाला स्पष्ट म्हणावेसे वाटते की दारिद्रय, पराधीनता आणि व्यसन अशा दृष्टीने विद्यार्थीदशेत चहा नसलेला बरा. विद्यार्थ्यांनी सकाळी अनुकूल असल्यास दूध प्यावे; तें धारोष्ण प्यावे. दूध हे मृत्यु लोकातील अमृतच होय. गायीचें दूध मिळाले तर सोन्यापेक्षां पिवळें होय.गायीचे दूध हे हलके, बुद्धिवर्धक व आरोग्यप्रद असते. गाय ही देवता या भावनेने तिचे दूध मुळीच पिऊ नयें. तर गाय हा एक उपयुक्त पशु आहे, त्या पशूचें दूध मनुष्याच्या जीवनाला अधिक उपयुक्त आहे, म्हणूनच ते प्यावे. म्हशीचें दूधही वाईट नाही. शेळीचे दूधसुद्धां चांगले! पण गायीचे उत्तम, म्हशीचे मध्यम, व शेळीचे कनिष्ठ समजावे. पूर्वी गोधनाला व गोरसाला फार महत्त्व व उत्तेजन होते. हल्ली सपन्न माणसेसुद्धा मोटारी,बंगले, परीट, न्हावी, सिनेमा व इतर चैनी यांमध्यें जेवढा पैसा घालवितात, त्या मानाने गायीच्या दुधाकडे तो खर्च करीत नाहीत. प्रत्येक संपन्न माणसाने गाय बाळगून आपल्या मुलाना सकाळी जर गोरस पाजला तर त्याने एक मोठें देशकार्यच केले असेच म्हटले पाहिजे. समंजस विद्यार्थ्यांनी आपल्या घरी अनुकूलता असल्यास आईबापाचे मन चांगली दुभाळ गाय पाळण्याकडे वळविण्याचा यत्न करावा, आणि घरी गाय असल्यास तिची उस्तवारी स्वतः करावी. विद्यार्थी आईबापाशी लडिवाळपणानें इतर किती तरी हट्ट करतात. त्यात गायीच्या दुधाचा एक हट्ट त्यानी करावाच. मध्यम स्थितीतील लोकाना सकाळी मुलांना पावशेर दूध देणें कांही अशक्य नाही; कारण दुधाचा खर्च चहाच्या खर्चांतच भागतो.

मनांत आणलें की होतें, तसें दुधाच्या बाबतीत होणे अशक्य नाहीं. पण तें नच जमलें तर सकाळी चपाती, भाकरी, पाव असा ताजा पदार्थ विद्यार्थ्यांनी खावा व त्यावर चहा प्यावा. कांही तरी खाऊन चहा पिणें हे त्यापेक्षा बरें. सकाळच्या न्याहारीला थोडक्या खर्चांत होणारे अनेक पदार्थ आहेत. मुगाचा

लाडू, डिंकाचा लाडू, रव्याचा लाडू, शिरा-सांजा, हे पदार्थ श्रीमंतांचेकरितां सुलभ आहेत. हे मुलांना देऊन त्यावर दूध अगर चहा द्यावा. गरिबांना भाकरी-पोळी निदान रात्रीची शिळी कांहीं अशक्य नाही. ती त्यांनी मुलांना द्यावी. हरभऱ्याची डाळ भिजवून ती खाण्यास द्यावी. बदाम, बेदाणा, खडीसाखर हा खुराकही न्याहारीला उत्तम. परंतु असलें कांहीं खाद्य न देता मुलांना सकाळी कडकडीत चहा देणें फार वाईट होय. कडकडीत चहा नेहमी पोटांत गेला, तर दीपनशक्ति कमी होते, वीर्य दुर्बल होतें आणि घशामध्ये 'टॉन्सिल' सारखे विकारही वाढतात. रात्रीं अपरात्री चहाचे कपावर कप उडविणें हें तर फारच अनिष्ट ! जगांत दारूसारखें व्यसन नाही म्हणतात, पण तेंही व्यसन सोडणारी राष्ट्रें आज जगांत आहेत. मग चहाचें अनिष्ट व्यसन नवयुगांतील विद्यार्थी सोडणार नाहीत असें वाटत नाही.

व्यसन या दृष्टीनें चहाचा तीव्र निषेध केलाच पाहिजे ! विद्यार्थ्यांचें चहावाचून अडूं नये. अनायासाने सहज मिळालाच तर सकाळी फक्त एकदा काही खाऊन चहा घ्यावा. इंग्रज लोक चहा पितात, पण त्यांच्या चहा पिण्याच्या वेळा अगदी मर्यादित व ठरलेल्या असतात. आपल्या इकडे चहा पिण्याला ना काळवेळ, ना ताळतंत्र ! विद्यार्थी कुठेंही मित्राकडे गेले की चहापानाचा पहिला अध्याय असतो व तो वरचेवर वाचला जातो. चहाचें व्यसन विद्यार्थ्यांना जडले म्हणजे ते उसनवारी करतात, पैशाकरितां चोऱ्या करतात, दुकानदाराला बुडवितात; वडिलांच्या नावावर देणें करून त्यांची अपकीर्ति करतात. स्वच्छता, पावित्र्य, शुद्धता हे सर्व गुंडाळून कोठेंही चहा पितात व आरोग्य बिघडवितात.

विद्यार्थ्यांनीं चहा, कॉफी, साखर हे पदार्थ स्वदेशीच वापरावे. परदेशी मुळीच वापरू नयेत. चहापेक्षा कॉफी थोडी बरी असें डॉक्टर लोक म्हणतात. सोडा, लिंबू, जिंजिरेड इत्यादि जी अनेक पेयें व सरबतें हल्ली निघाली आहेत, त्यांचाही उपयोग आरोग्याला अवश्य या दृष्टीनेच करावा. लिंबाचें सरबत फार चांगले ! ते सकाळी कोमट व दुपारी गार असें घ्यावें. आमसुलें, कवठ यांची सरबतेंही पित्तनाशक आहेत. उसाचा रस, आंब्याचें पन्हें, हेंही त्या त्या ऋतूंत चांगलें. नेमस्त व नियमितपणें सेवन केल्यास हीं पेयें उपयुक्त ठरतात. विद्यार्थ्यांनी विविध पेयांविषयीं व पौष्टिक खुराकाविषयीं स्वतः

थोडा अभ्यास करावा, आपली गृहपरिस्थिति व एकाद्या आप्त डॉक्टरचें मत विचारांत घेऊन पेयें पसत करावीत. कोको, ओव्हलटाईनसारखीं अनेक पेयें हल्ली जाहिरातीतून फडकत असतात, त्या सर्वांवर येथें लिहिणें अशक्य आहे. म्हणून विद्यार्थ्यांना वरीलप्रमाणें मुख्य सूचना केली आहे

विद्यार्थ्यांच्या अन्नामधधाने इतकें सांगितल्यावर त्यांच्या वस्त्राचा विचार सहजच मनात येतो. विद्यार्थ्यांचा पोषाख सुटसुटीत, साधा, स्वदेशी व शरिराचे रक्षण करण्यास समर्थ असा पाहिजे. पोषाखाने शरीराला शोभा येते व शरीराचें रक्षण होते. अलीकडे यांत्रिक युग वाढत आहे तेव्हां या युगाला अनुरूप असा पोषाख पाहिजे. इकडे तिकडे लोंबणारी, पायघोळ, अवजड अशी वस्त्रें विद्यार्थ्यांनी वापरू नयेत. विद्यार्थ्यांनी खादी वापरली तर ती चांगलीच; निदान स्वदेशी वस्त्रें तरी वापरलीच पाहिजेत. हिंदुस्थानच्या हवापाण्याला अधिक वस्त्राची गरज नाही म्हणून त्या बाबतीत साहेबाचें अनुकरण करण्याचे कारण नाही. साहेबापासून पोषाखाचा फक्त सुबकपणा व सुटसुटीतपणा शिकावा

थंडीच्या दिवसांत उबदार कपडे व उन्हाळ्यात हलके कपडे स्वाभाविकच लागतात पण हे सामान्य विद्यार्थ्यांना अशक्य असते. म्हणून त्यांनीं कोणत्याही ऋतूशी जमतील असे मध्यस्थ कपडे करावेत. विद्यार्थ्यांचा मुख्य पोषाख म्हणजे एक सदरा वा पैरण, वर कोट, डोक्यास टोपी वा फेटा, पायात चप्पल, कमरेस विजार अथवा लडकी किंवा धोतर असा असावा. खेळण्याच्या वेळी धोतर मुळीच नसावें. थंडीच्या दिवसात गजिपरॉक वापरावा. स्वेटर, बूट, पायमोजे इत्यादि गरम कपडे हे अनुकूलता व आवश्यकता पाहून वापरावेत. मात्र त्याच्या आहारी जातां कामा नये आथरूण पांघरूणसुद्धा हलकें व सुटसुटीत असावें. कुठेंही बिछाना पसरून लवडता येईल असा सुटसुटीतपणा असावा.

विद्यार्थ्यांनी आपले कपडे स्वत धुवावेत हे पूर्वी सांगितलेच आहे. आपले कपडे स्वतः शिवण्याचा मधूनमधून यत्न केला तर ती एक कलाही साधेल आणि कापड कसें वांचवावें हेंही समजेल. एकंदरीत पूर्वीपेक्षां हल्लीं वस्त्रें जास्त लागतात. तेव्हा कपडे शिवणें व ते स्वच्छ ठेवणें याकरिता शिलाईकाम व परटविण्याची कला हीही प्रत्येक विद्यार्थ्याला स्वतःपुरेशी

आली पाहिजे. कपडे बेतणें व शिवणें तसेंच ते धुणें व त्यांना इस्त्री करणें यांचें ज्ञान विद्यार्थ्यांना जरूरीपुरतें झालें तर त्यांचा पैसा वांचेल. अभ्यासाव्यतिरिक्त मधला वेळ कारणी लागेल, आणि एक कलाही हस्तगत होईल.

विद्यार्थ्यांना स्वयंपाकाची माहिती असावी. स्वतः स्वयंपाक करावयास येणें हे पुष्कळ प्रसंगीं उपयुक्त असतें. त्यामुळें उपाशी राहण्याचा व गलिच्छ अन्न खाण्याचा प्रसंग येत नाहीं.

---

## प्रकरण १० वें

# व्यायाम, खेळ आणि निद्रा

मनुष्याच्या बुद्धीला जसा ज्ञानाचा विषय पाहिजे तसा शरीराला कांहीं तरी कामाचा विषय पाहिजे. कर्मेंद्रियांना काम, मनबुद्धीला ज्ञान आणि अंतःकरणाला प्रेम अवश्य असतें. विद्यार्थ्यांनी विद्यार्थीदशेंत बुद्धिबल व शरीरबल हीं दोन्ही कमावलीं पाहिजेत. हीं दोन्ही बलें आवश्यक असून आपापल्या परी श्रेष्ठ आहेत. बुद्धिबलाकरता विविध विषयांचा अभ्यास आणि शरीरबलाकरतां विविध प्रकारचा व्यायाम विद्यार्थ्यांनी करावा.

इंग्रजीतील पहिला काल असा होता की सुशिक्षित म्हणजे अजागळ, अशक्त, दुर्बल, असाच असावयाचा. त्या वेळीं आरोग्याकडे, शरीरबलाकडे लक्ष देणें हें कमी प्रतीचें समजलें जाई. पण वातावरण हल्लीं बदललें असून तें पूर्व स्थितीवर आलेलें आहे. या भारताची पूर्वपरंपरा दीर्घायुष्याची, शरीरबलाची, व कर्तृत्वाची आहे. भारतीय युद्धांतील सर्व योद्धे गाठीच्या पुढचे होते. कित्येकांनी तर शत्रूंच्या घरांत प्रवेश केला होता; तरी ते मोठ्या उत्साहानें लढत होते! श्रीकृष्ण, बलराम, जरासंध, दुर्योधन, दुःशासन, भीम, कंस हे सर्व चांगले नाणावलेले मल्ल होते. भारतीय बालापासून तों गेसवार्धपर्यंत या मल्लविद्येंत आणि शरीरबलामध्यें नांव घेण्याजोगे पुष्कळ

पुरुष होऊन गेलेले आहेत. ही पूर्वपरंपरा ध्यानात ठेवून भारतीय विद्यार्थ्यांनीं 'मी देवाला, देशाला आणि व्यायामाला कधीही विसरणार नाही.' अशी शपथच घेतली पाहिजे. विशेषतः आजच्या या कालात प्रत्येक भारतीय विद्यार्थी हा कणखर, धिप्पाड, बुद्धिमान् व लढवय्या असा होण्यास त्यानें व्यायामाची उपासना अवश्य केली पाहिजे

शरीर हे पुरुषार्थाचे मूळ, शरीर हे धर्माचे साधन, शरीर हा सुखाचा मूलमंत्र, शरीर हीच सर्वश्रेष्ठ संपत्ति, अशी स्थिति असल्यामुळे विद्यार्थ्यांनी व्यायामाकडे विशेषत. सशास्त्र, पद्धतशीर आणि नियमबद्ध अशा व्यायामाकडे विशेष लक्ष दिले पाहिजे. व्यायामापासून चापल्य येतें शरीर हलकें होतें, काम करण्यास उत्साह वाटतो, जठराग्नि चांगला प्रखर होतो, वात झडतो, शरीराच्या अवयवांत घटीवपणा येतो असे हे इतके व्यायामाचे वैद्यशास्त्र-दृष्ट्या लाभ आहेत.

लाघवं कर्मसामर्थ्यं दीप्तोऽग्निर्मेदसः क्षयः ।
विभक्त घनगात्रत्वं व्यायामादुपजायते ॥ वाग्भट ॥

व्यायाम करण्यास उत्तम वेळ म्हणजे सकाळ व सध्याकाळ ही होय. पहाटे स्नान करून किंवा स्नानापूर्वी व्यायाम करावा वयाचे मानानें आणि ऋतुपरत्वें, व्यायामांत बदल करावा. पहाटे उठून शौचमुखमार्जन, ईश-स्मरण, अभ्यास झाल्यावर स्नान करून घरांतील स्वच्छ जागेंत, तालमींत अथवा इतरत्र नमस्कार घालावेत जोर, बैठका काढाव्यात. डंबेल्स व आसनें करावीत; करेला व जोडी फिरवावी, किंवा स्नानापूर्वी चारपांच मैल झराझर फिरावयास जावें; पळावें; अथवा घोडदौड करावी. अनुकूलता, आवड आणि प्रकृति या मानाने कोणता व्यायाम घ्यावा, हे विद्यार्थ्यांनी तज्ञ शिक्षक व पालकांच्या मदतीने ठरवावें. नमस्कार घालणें, जोर काढणें, बैठका मारणें, आसने करणें हे व्यायाम सकाळीच करावेत अंगातून चांगला घाम गळेल असा दणकी व्यायाम सोळा वर्षांवरील विद्यार्थ्यांनी करण्यास मुळींच हरकत नाही. साधे दंड व चक्रदंड चढते वाढते काढण्याची प्रथा पूर्वी फार होती.

स्वार्थ व परमार्थ दृष्टीने गोरगरिबानासुद्धां कोठेंही करतां येण्याजोगा, सुटसुटीत व सोपा व्यायाम म्हणजे सूर्यनमस्कार होय. शंभर सव्वाशें नमस्कार हे १८ वर्षे वयाच्या विद्यार्थ्यांनीं घालण्यास मुळींच हरकत नाही.

नमस्कारांमध्ये व्यायाम व उपासना असा दोहोंचा मिलाफ आहे. मिरजेचे श्रीमंत राजेसाहेब आणि औंधचे राजेसाहेब यांनी आपल्या वर्तनाने महाराष्ट्रापुढे नमस्काराचे फारच उत्तम आदर्श ठेवलेले आहेत.

हल्ली नमस्कारांच्या आणि जोर, बैठका यांच्याही विविध पद्धती निघालेल्या आहेत. कोणत्याही पद्धतीने पण नित्य व्यायाम करावा. विद्यार्थ्यांनी थोडा आसनांचाही अभ्यास ठेवावा. आसने ही घरातल्या घरांत स्वच्छ जागी कोठेंही करता येतात. आसनांमुळें शरीर हलकें होतें, अवयवांना बांधेसूदपणा येतो शीर्षासन, मयूरासन, प्रद्मासन, प्रेतासन, पश्चिमोत्तान, इत्यादि दहापाच आसनें प्रत्येक विद्यार्थ्यास करितां आली पाहिजेत. त्यामुळें अपचन, पोटफुगी, अग्निमांद्य, पांथरी, यकृत, असे सर्व विकार हटण्याला मदत होते. थंडीच्या दिवसांत आसनें, नमस्कार, जोर, जोडी, बैठका हा व्यायाम सूर्योदयाच्या आत निर्वात जागी उरकावा. घोड्यावर बसणें, पळणें व फिरणें हे मोकळ्या हवेतील व्यायाम मनाला, शरीराला फारच उत्साह देतात. म्हणून हेही व्यायाम मधून मधून घ्यावे

हे वर सांगितलेले व्यायाम वैयक्तिक आहेत. ते घरी व बाहेर मोकळ्या हवेत एकट्याला घेता येतात. पण कुस्ती, मल्लखांब, दांडपट्टा, लाठी, बोथाटी, लेजीम, फरेल्या, भाल्याच्या फेकी, जवियाच्या फेकी, इत्यादि जे सघ व्यायाम आहेत, ते सघ व्यायाम आखाड्यात अथवा तालमीत जाऊनच केले पाहिजेत. कुस्ती व इतर संघ व्यायाम विद्यार्थ्यांनी सायंकाळी करावेत. सायंकाळी साडेपांच ते साडेसातपर्यंत ऋतुमानाप्रमाणें जो वेळ मिळतो, त्याचा उपयोग विद्यार्थ्यांनीं वरील व्यायामाकडे आणि खेळाकडे करावा.

कुस्ती, दांडपट्टा, लाठी, काठी, बोथाटी यांचें शिक्षण हें प्रत्येक नवयुगीन विद्यार्थ्याला अवश्य पाहिजे. ड्रील, कवाईत यांचीही सवय पाहिजे. घोड्यावरून पाचसात मैल फिरणें, सायकलीवरून १५।२० मैल जाणें, चारदोन मैल पळणें एवढा व्यायाम सहज होईल असा दम पाहिजे.

विद्यार्थ्यांनी सायंकाळीं अभ्यास मुळीच करू नये. सकाळपासून बुद्धीला ताण पडलेला असतो. शाळेंतील अभ्यासामुळें बुद्धीला कटाळा आलेला असतो. अशा वेळीं खेळणें, बागडणें व तालमीत जाऊन व्यायाम करणें हेंच श्रेयस्कर असते. अलीकडे विद्यार्थ्यांमध्यें संघ व्यायामाची आवड उत्पन्न

होऊं लागली आहे. ठिकठिकाणी आखाडे, व्यायामसंस्था, राष्ट्रीय स्वयंसेवक संघाच्या शाखा, बॉय स्काऊटसारख्या चळवळी निघत आहेत हे सुचिन्ह होय. विद्यार्थ्यांनी या सर्व संस्थांचा अधिकाधिक लाभ अवश्य घ्यावा. वैयक्तिक व्यायामापेक्षा हल्ली संघ व्यायामाचें महत्व फार आहे. कारण संघानें, शिस्तीनें आणि एकजुटीनें कार्य करण्याचें हे जग आहे. मात्र हे संघ व्यायाम घेतांना दिखाऊपणा व छानछोकी यापेक्षा टिकाऊपणा व दमदारपणा याकडे अधिक लक्ष असावें.

खेळ हा एक उत्तम प्रकारचा व्यायाम आहे. जी मुलें एकलकोंडी, घुमी, तुसडया स्वभावाची व पुस्तक-कीटक झालेली असतात, त्यांना व्यायामाची गोडी लावण्यास खेळ हें एक मोठें साधन आहे. खेळामुळें मन मोकळें होतें, मनोदौर्बल्य जातें, स्वभाव दिलदार होतो व धक्काबुक्कीच्या सामन्यामुळें दोन टोले देण्याचा व घेण्याचा स्वभाव बनून जातो. आज जगातील सुधारलेल्या राष्ट्रांत खेळ हें एक राष्ट्रीय वेड होऊन बसलेलें आहे. खेळाडूपणा ( Sportsman-ship ) हा एक मोठा सद्‌गुण मानला जातो. तसें पाहिलें तर जग हें क्रीडांगण असून प्रत्येक मनुष्य हा खेळाडू या नात्यानेंच खेळ दाखविण्यास आलेला आहे. खेळांत जसें जयापजयाचें कांही वाटत नाहीं, तसेंच आयुष्यांतील यशापयशाचेंही कांही वाटतां कामा नये !

हल्ली खेळाडूला जगांत मान मिळू लागला आहे. जगातील सर्व राष्ट्रांचे खेळ हल्ली एकत्र होत असतात. अशा प्रसंगीं जो खेळाडू उत्तम खेळतो, तो आपल्या राष्ट्राचा लौकिक वाढवितो. अर्थात् अशा खेळाडूला राष्ट्रांतील सधन लोक आश्रय देतात. अखिल जगांत हिंदी हॉकी टीमनें जो ओळीनें तीनदां विजय मिळविला आणि उमरावतीच्या हनुमान व्यायाम प्रसारक मंडळानें युरोपमध्यें जो विजय संपादन केला, त्यामुळें या भारताचा लौकिक वाढला आहे यांत शंका नाहीं. खेळ ही साधीच बाब, पण त्या खेळाच्या द्वारें आपल्या राष्ट्राचा इतर राष्ट्रांशीं परिचय होतो; आणि स्वराष्ट्राबद्दल अभिमान वाढतो.

## कोणत्या गुणांमुळें खेळांत जय येतो ?

खेळांत यशस्वी होण्यास जे गुण लागतात तेच गुण आयुष्याच्या

यशस्वीपणासही कारणीभूत होतात. आयुष्य हाही एक खेळच आहे. प्रपंचाचा खेळही खेळाडू वृत्तीनेंच खेळला पाहिजे. खेळ खेळावयाचें मनांत आणलें की दुसऱ्याशी सलोखा करावा लागतो, एकोप्याशिवाय खेळ होत नाहीं, मिळतें घ्यावें लागतें, प्रपंचांतही तसेंच आहे. खेळामुळें शिस्त व आज्ञाधारकपणा हे गुण अंगी येतात म्होरक्याचे ऐकल्याशिवाय आणि आपण ठरविलेले नियम पाळल्याशिवाय खेळ कधीच यशस्वी होत नाहीत. एकचित्तता, सावधानता, दुसऱ्यावर मात करण्याची ईर्षा, स्वतःच्या पक्षाचा अभिमान, दक्षता, निरलसता, सहकार्याची वृत्ति, खरेपणा हे सर्व गुण असल्याशिवाय खेळात जय येत नाही. एकदां अपयश आलें की पुन: पुन: यत्न करावासा वाटतो. खेळामध्यें नेट लागतो, उमेद व धीर पाहिजे असतो, सहनशीलताही अवश्य लागते. संसाराचा खेळ यशस्वी होण्यास यांतील कोणते गुण लागत नाहीत? अर्थात् सर्व लागतात. खेळापासून जसा व्यायाम होतो, वृत्ति खुलते, तसेंच अनेक सद्गुणही अंगी बाणण्यास मदत होते. यास्तव विद्यार्थ्यांनी अनेक प्रकारचे खेळ अवश्य खेळावेत.

सोंगट्या, गंजिफा, बुद्धिबळें, कॅरमबोर्ड अशा बैठ्या खेळांपेक्षां विद्यार्थ्यांना व्यायामाचे खेळच चांगले! हुतुतूमुळें धडाडी येते आट्यापाट्याच्या खेळामुळें दुसऱ्याला चकवावें कसें हे कळते. खोखोच्या खेळामुळें चपलपणा येतो. सूरपारव्या, लगोरी, धवाधवी, हे खेळ हल्ली लुप्त झाले असले तरी त्यांचें पुनरुज्जीवन लौकर होईल असें वाटतें. देशी खेळांपेक्षां, हॉकी, क्रिकेट, फूटबॉल, टेनिस, बॅडमिंटन अशा खेळांत शिस्त व संघटना ही अधिक असतात. म्हणून हे विदेशी खेळसुद्धां विद्यार्थ्यांनी खेळावेत. मात्र हे खेळ खर्चाचे असतात. आपल्या देशी खेळांतसुद्धां सरसता आणतां येईल व तशी हल्ली येऊ लागलेली आहे. द्रव्य, स्थान व इतर आनुकूल्य याचे मानानें देशी वा विदेशी कोणतेही खेळ विद्यार्थ्यांनी सकाळी व सायंकाळी अवश्य खेळावेत.

खेळाप्रमाणें पोहण्याचा एक सुरेख व्यायाम आहे. हा व्यायाम उन्हाळ्यांत सकाळी व इतर ऋतूंत सकाळी नऊ दहाचे सुमारास घ्यावा. नदी, विहिरी, तलाव असें कोठेंही जाऊन सडकून पोहावें. वाहतें पाणी असल्यास फार उत्तम. व्यायाम या दृष्टीनें पोहल्याम पोहणे बाधत नाहीं. पोहणेंसुद्धा तोंड मिटून नाकानें श्वास सोडीतच केलें पाहिजे. उगाच पाण्यात फार

घे उडदाची डाळ, दूध, शिरा, डिंकाचे लाडू, मुगाचे लाडू असला हा खुराक व्यायामशास्त्रज्ञ घ्यावयास सांगतात. अंडी हा एक खुराकच होय. ती मांसाहारी विद्यार्थ्यांनीं घेण्यास हरकत नाही ; पण खुराकाशिवाय व्यायाम होतच नाही असें मात्र नव्हे.

विद्यार्थ्यांनी वरील विवेचन लक्षांत घेऊन सोयीप्रमाणें सकाळी अथवा सायंकाळीं अंगातून चांगला घाम गळेपर्यंत व्यायाम घ्यावा. व्यायामानंतर दहा मिनिटें विश्रांति घेऊन सर्वांगाचा घाम स्वच्छ गुादीच्या रुमालानें पुसावा. नंतर हातपाय, तोंड स्वच्छ धुवून घामानें भिजलेली वस्त्रें धुवून वाळत टाकावीत. सकाळच्या व्यायामानंतर थोडी न्याहारी करून अभ्यासाला लागावें आणि सायंकाळच्या व्यायामानंतर थोड्या वेळानें प्रसन्न मनानें भोजन करावें. भोजनानंतर उजळणी स्वरूपाचा हलका व सहज वाचून होण्याजोगा असा अभ्यास करून विद्यार्थ्यांनी रात्री ९।१० चे सुमारास झोपीं जावें.

## गाढ झोंप हें एक समाधि-सुख आहे.

शरीरांतील सर्व शीण भरून टाकून मनाला सभोवारच्याचा विसर पाडून पुन्हां ताजेतवानें करणारी अशी ही गाढ निद्रा आहे. विद्यार्थ्यांनी वयपरत्वें सहा ते नऊ तासपर्यंत यथास्थित झोपावें. रात्री शक्य तो लौकर निजावें. साडेनऊ दहाच्या पुढें विद्यार्थ्यांनी जागू नये. अभ्यास अधिक असल्यास पहाटे उठावें. "लौकर निजे व लौकर उठे, त्यास ज्ञान, संपत्ति, आरोग्य भेटे" ही म्हण पुष्कळ खरी आहे. दिवस हा कामाकरिता व रात्र ही विश्रांतीकरितां असते. विश्रांति चांगली मिळाली की दिवसभर वाटेल तें काम जोराने करितां येतें. दिवसभर काम करून थकलेल्या शरीराला रात्री कृत्रिम पद्धतीनें पुस्तकी अभ्यासात राबविणें हें बरें नव्हे.

दिवसभर प्रसन्न मनाने विद्यार्थ्यांनी आपली कर्तव्यें पार पाडलेलीं असलीं की रात्री अंथरुणाला पाठ लागतांच विद्यार्थी घोरूं लागतो. म्हणून साडेनऊ दहाचे सुमारास विद्यार्थ्यांनी आपला स्वच्छ असा बिछाना पसरावा. खालीं सतरंजी अगर घोंगडी, वर एक पलंगपोस, लहानशी उशी, पांघरण्यास चादर अथवा घोंगडी अशा सुटसुटीत बिछान्यावर विद्यार्थ्यांनी झोंपावें. झोंपण्यापूर्वी सबंध दिवसाच्या कार्यांचा एकदां आढावा घ्यावा. रोजनिशी

लिहावी. आपण ठरविले काय, केले काय, चुकलें कोठें, अशा सर्व गोष्टींचे चिंतन करून दुसरे दिवशीं जीं कामे करावयाचीं असतील त्याचेंही टाचण दैनंदिनीत लिहावें. निजण्यापूर्वी लघुशंकेस जाऊन खुळखुळून चुळा भरून व पहाटे जें जें कांही लागेल त्याची सर्व व्यवस्था करून ईशचिंतन करीत, परमेशाजवळ सद्बुद्धीची याचना करीत गाढ झोपी जावें. मानसशास्त्रदृष्ट्या असा अनुभव येतो की मनोदेवता ही पहाटे संकेताप्रमाणें ठरल्यावेळी आपोआप जागृत होते! रोज रात्री झोपी जाण्यापूर्वी मनाला हा आढावा घेण्याची व पुढील कार्य ठरविण्याची सवय मात्र लावली पाहिजे.

विद्यार्थ्यांनी हे निद्रासुख जागरणें करून, नाटकें पाहून आणि चहाचे पेले ढोसून कधीही घालवू नये अलीकडे निद्रानाशाचा विकार जो वाढावत आहे, त्याचे कारण आसुरी वागणूक हे होय! आरोग्य नांदावे, शरीर सुदृढ व भक्कम असावे, बुद्धि तरतरीत व प्रसन्न असावी अशी इच्छा ज्या ज्या विद्यार्थ्यांना असेल, त्यांनी व्यायाम आणि निद्रा यासंबधी सांगितलेले नियम पाळण्यास कसूर करूं नये

---

## प्रकरण ११ वें

# ब्रह्मचर्यव्रताचें प्रतिपालन

विद्यार्थीदशेमध्यें विद्यार्थ्यांनी ब्रह्मचर्यव्रताकडे फार लक्ष दिले पाहिजे. पूर्वी गुरुगृहे असत. विद्यार्थी गुरुगृहात गुरूच्या सन्निध वेदाध्ययनासाठी गेला की गुरु त्याचे उपनयन करी. "उप त्वा नेष्ये" तुझें उपनयन करतों असें गुरु म्हणे उपनयन झाल्यावर "ब्रह्मचर्यमागाम्" हा मी ब्रह्मचर्याप्रत प्राप्त झालो, असें बटू म्हणे. त्यानंतर तो गुरूच्या शिस्तीत त्या आश्रमांतील नियम पाळून बारा, सोळा, क्वचित् चोवीस वर्षपर्यंतही विद्याभ्यास करी. पूर्वीचे ते ब्रह्मचर्याश्रमातील नियम आज तंतोतंत पाळणें अशक्य आहे. वेष, जटा,

दंड, भिक्षा वगैरे सर्व विधी आज निघून गेले; तथापि ब्रह्म म्हणजे वेद किंवा विद्या. अर्थात् त्याच्या प्राप्तीकरितां जें व्रत, नियम पाळणें ते सर्व ब्रह्मचर्याच्या जपणुकीला उपयुक्तच आहेत. त्या दृष्टीनें आपस्तंब धर्मसूत्रातील पुढील सूत्रें आजही उपयुक्त वाटतात.

अनृत्तदर्शी—नृत्य न पाहणारा, अश्लील, अचकटविचकट न पाहणारा.
सभासमाजांचागंता—वाईट लोकांच्या अड्डयांत व समाजात न जाणारा.
अजनवादशील:—टवाळी न करणारा.
रह:शील:—एकांतांत जाऊन अभ्यास करणारा.
स्त्रीष्यावदर्थसंभाषी—स्त्रियांशी कामापुरतें बोलणारा.
मृदु:—क्षमाशील. शांत:—शांत.
दान्त:—आत्मसंयमी. ऱ्हीमान्—विनयी.
दृढधृति:—दृढ धैर्याचा. अग्लास्नु:—उत्साही.
अक्रोधन:—निग्रही. अनसूय:—निर्मत्सरी वगैरे.

मनुष्याचा जन्म केवळ विषयोपभोगाकरिता नाही. आहार, निद्रा, भय, मैथुन हे पशुधर्म आहेत. मनुष्याला यापेक्षां काही उच्च ध्येय असते. अर्थात् त्या ध्येयसिद्धीकरता अखंड यत्न करावा लागतो. अखंड यत्न करण्याचे साधन जे शरीर ते भरभक्कम पाहिजे. जगात जे मोठे लोक होऊन गेले ते निधड्या छातीचे तर होतेच; पण शरीरानेंही चांगले कणखर होते. लोखंडासारखें शरीर कमविण्याला शरीरोपजीवी द्रव्याला म्हणजे वीर्याला फार जपावें लागते सामान्यत: पंधरासोळा वर्षांपासून वीर्योत्पत्ति होते. वीर्य उत्पन्न होणें, तें पुष्ट होणें, आणि त्याचा पुढें गृहस्थाश्रमात योग्य विनियोग होणे अशा या त्याच्या तीन अवस्था आहेत. शरीरात वीर्य उत्पन्न होऊं लागते न लागतें तोच त्याचा व्यय वाममार्गांनी जर सारखा होऊ लागला तर मनुष्य हतवीर्य, निरुत्साही व कर्तृत्वशून्य होतो.

आज पूर्वीचीं विद्यार्थीगृहें नाहीत. शाळांमध्यें, घरांमध्ये व इतर समाजांमध्यें ब्रह्मचर्याच्या दृष्टीनें जे शुद्ध वातावरण असावयास पाहिजे तेही नाही. म्हणून विद्यार्थ्यांनी स्वत:चें उच्च ध्येय गांठण्याकरता ब्रह्मचर्यव्रत कडकपणें पाळलें पाहिजे. बलभीम मारुतिराय याचें रामायणातील कार्य, राजर्षी भीष्म यांचे महाभारतातील स्थान, श्रीसमर्थ रामदास स्वामींचें तीनशें वर्षां-

पूर्वीचें अपूर्व कर्तृत्व हे ब्रह्मचर्याचे आदर्श विद्यार्थी-दशेमध्यें पुढें असावयास पाहिजेत.

ब्रह्मचर्याच्या प्रतिपालनाला आत्मसंयमाची जरूर आहे. मनोनिग्रहा-वाचून अभ्यास, कर्तृत्व, आरोग्य यांतील काहीही शक्य नाही. मनांत अनेक विचार येतात व कल्पनातरंग उद्भवतात त्यांच्या मागें लागणें हा पशुधर्म होय. परंतु भलतीकडे जाणाऱ्या मनास निग्रहानें आवरून धरणें हाच संयम होय. खाण्याचा, पाहण्याचा, गप्पांचा, चेष्टांचा आणि अनेक प्रकारचा मोह वेळोवेळी उत्पन्न होत असतो. त्या मोहाला बळी न पडतां आपला मार्ग न सोडणे हेंच आत्मसंयमन होय.

ब्रह्मचर्यविघातक असें वातावरण सांप्रत फारच आहे. तरुणांनी त्या मोहजालांत न सापडतां आपली विद्यार्जनाची नौका परतीरास नेली पाहिजे. ती नौका न बुडवितां परतीरास नेण्यास कौशल्य व धैर्य लागते. 'कः शूरो विजितेंद्रियः' शूर कोण तर जो इंद्रियें स्वाधीन ठेवतो तो ! शूराला धैर्य लागतें. तसेंच अनेक मोह आवरण्यास मोठें धैर्य लागतें. खोटें बोलणें, थापा देणें, चोरून खाणें इत्यादि कृत्यें करण्याचा मोह विद्यार्थ्यांना होतो याचें कारण आत्मसंयमाचा अभाव हेंच होय निर्भयतेने विद्यार्थी जर प्रत्येक प्रसंगीं धैर्य व संयम दाखवतील तर त्यांचे हातून पुढें फार मोठीं कार्यें होतील.

विद्यार्थ्यांनी प्रथमतः आपल्या अभ्यासाच्या खोलीत ब्रह्मचर्यविघातक अशीं चित्रें, वाङमय, अगर अन्य काही ठेवूं नये. विद्यार्थ्यांच्या खोलीमध्यें अनेक कॅलेंडरें हल्ली झळकत असतात. कॉस्मेटिक्स ऑईलची बाटली घेऊन एखादी फटाकडी उभी राहिलेली दिसते, तर दुसऱ्यावर राजा रविवर्म्यांच्या एखाद्या विवस्त्र अशा स्त्रीचें छायाचित्र लटकावलेलें असतें. एका भिंतीवर सिनेमातील सुंदर नटीचें छाती उघडी असलेलें असें चित्र लोंबत असतें तर दुसरीकडे स्त्रीभूमिका घेणाऱ्या नटाचीं चित्रें चिकटविलेलीं असतात. म्हणजे ब्रह्मचारी विद्यार्थ्यांभोंवती सचित्र स्त्रियांनी गराडा दिलेला आढळतो ! हल्लीकडे अनेक मासिकांवर स्त्रियांचीं मादक चित्रें असतात. खप व्हावा व आकर्षकता यावी म्हणून मासिककर्ते जरी असलीं चित्रें देत असले, तथापि विद्यार्थ्यांच्या दृष्टीनें तीं हानिकारक आहेत. स्त्री ही समाजाचा घटक आहे. स्त्री व पुरुष हीं एकमेकांना पूरक आहेत यांत शंका नाहीं. पण ब्रह्मचर्याश्रमांत

इनका हा स्त्रीविषय डोळ्यांपुढें असणें अनिष्ट होय! हिंदुस्थानसारख्या परतंत्र देशांत नुसते रंगेल व फाकड विद्यार्थी नको आहेत. ज्या वयांत जे चोचले नको त्या वयांत ते करणें हा मूर्खपणा आहे. विद्यार्थ्यांच्या खोलीत विद्वान्, कर्तृत्ववान्, वीर्यशाली, पराक्रमी, अशा स्त्रीपुरुषांचे फोटो असावेत. आजच्या आपल्या समाजांत ज्या विदुषी आणि थोर स्त्रिया आहेत त्यांचीं चित्रें अवश्य ठेवावीत. जें स्त्रीचित्र पाहिल्यावरोबर चित्त चंचल होईल, व वृत्ति उच्छृंखल होईल, असें उत्तान विवस्त्र व शृंगारपर चित्र मुळीच नसावें. मग तें राधाकृष्णाचें, शंकरभिल्लिणीचें किंवा गोपींच्या रासक्रीडेचेंही असो, तें नसावेंच. निरनिराळ्या मासिकांवर अशीं जी भडक चित्रें असतात तीं बंद करणें अशक्य आहे. तथापि विद्यार्थ्यांनीं हें लक्षांत ठेवावें की सामान्य जनतेकरतां तीं चित्रें असतात. विद्यार्थी-वर्गाकरतां तीं नसतात.

विद्यार्थ्यांच्या वाचनामध्यें अभ्यासाव्यतिरिक्त अनेक पुस्तकें येतात. अलीकडे विशेषतः आपुकमापुक लघुकथा आणि चटकदार कादंबऱ्या यांचा फार सुकाळ झालेला आहे. लघुकथा म्हणजे छोटया कादंबऱ्याच होत. यामध्यें एक 'तो' आणि एक 'ती' असते. तिचें त्याच्यावर प्रेम जडतें. आणि अनेक आपत्ती त्यावर येऊन तें प्रेम दृढ राहतें. अशा सगळ्या या कल्पित कथा असतात. एकदां या असल्या ललित वाङ्मयाचा विद्यार्थ्यांना नाद लागला म्हणजे गंभीर व भारदस्त वाचनाकडे दुर्लक्ष होतें. कादंबऱ्या व लघुकथांतील स्त्रियांच्या अवयवांचीं वर्णनें ही सारखी डोळ्यांत घोळत असल्यामुळें स्त्रियांकडे टक लावून पाहण्याची विद्यार्थ्यांना खोड लागते भाषणांत, लेखनांत सारखा हाच विषय येतो, आणि या चिंतनामुळें ब्रह्मचर्याचा ऱ्हास होतो.

हिंदुस्थानांत तरुण व तरुणी या उभयतांची संख्या विपुल आहे. तेव्हां मुलांना मुली व मुलींना नवरे मिळण्याम कादंबरीतील कल्पित अडचणी कधीच येत नाहींत. विवाहबद्ध होऊन पुढें संसार करावयाचा आहे हें विद्यार्थ्यांनी ध्यानांत ठेवलें, म्हणजे त्यांच्याकडून अकालीं जें स्त्रीविषयाचें चिंतन उगाचच होतें, त्याचें कारण राहणार नाहीं.

अलीकडे तर कित्येक कादंबऱ्यांमध्यें वेछूट लिखाण असते. संयमावर टीका असते. ब्रह्मचर्याची थट्टा केलेली असते. देव नको, धर्म नको, नीति नको, कुटुंबसंस्था नको, असें वेछूटपणें प्रतिपादन केलेलें असतें, म्हणून

असल्या कादंबऱ्या न वाचणेंच चांगलें. वाचल्या तर असा विचार करावा की मानवी जीवित हे केवळ इंद्रियसुखाकरताच आहे काय? पैसा व विषयसुख यापेक्षां जगांत खरोखरीच जर कांही नसते, तर शोध आणि शास्त्र यांमध्यें राष्ट्रानी जी आश्चर्यकारक प्रगति केली आहे ती केलीच नसती! विषयसुखावर व पैशावर लाथ मारून, आणि प्राणही अर्पण करून जगात जे लक्षावधी लोक समाज व राष्ट्र याकरिता अहर्निश यत्न करीत आहेत, त्यांवरून जगत् हे उच्च ध्येय व उच्च आकांक्षा याकरतां असून ते केवळ पैसा व इंद्रियसुख याकरता नाही असे समजावें या दृष्टीने शृंगारिक लघुकथांचे व कादंबऱ्यांचे लेखक हे तरुणांचे मार्गदर्शक ठरत नाहीत.

नाटकें, कादंबऱ्या व बोलपट ही लोकशिक्षणाची साधनें परदेशांत समजण्यांत येतात, परंतु हिंदुस्थानात ती स्थिति नाही. नाटक हें कांही झालें तरी नाटकच असते व कादंबरीमध्यें तर कल्पित कथानकच असते. नाटक पाहण्याचे संपलें व कादंबरीचें पुस्तक खाली ठेवलें की असें वाटते की हे सर्व कल्पित आहे, सत्यसृष्टीतील नाही. म्हणून शिक्षणाचे दृष्टीने त्याचा परिणाम कांही होत नाही. सिनेमा, नाटकें व कादंबऱ्या यांचा प्रधान हेतु मनोरंजन हाच असतो. मनोरंजनाबरोबर शिक्षणाचे अंजन घालण्याचा लेखकाचा हेतु क्वचित् असतो. म्हणून विद्यार्थीवर्गाला उद्देशून लिहिलेली नाटकें आणि त्यांच्या गुणावगुणाचें चित्रण केलेल्या कादंबऱ्या असतील तर त्यांचा लाभ अवश्यमेव घ्यावा. इतरामुळें मनावर अनिष्ट परिणाम होतो.

गृहस्थाश्रमातील गोष्ट वेगळी असते. त्या आश्रमात जग काय आहे हें समजावें म्हणून सर्व पाहावें, वाचावें; पण विद्यार्थीदशेमध्यें चुरचुरीत वाङ्मयाचें व्यसन लागलें की शास्त्र, शोध इत्यादि गहन विषयाच्या अभ्यासाकडे दुर्लक्ष होतें. त्यापेक्षां श्रेष्ठ लोकांची चरित्रे वाचावीत. तीसुद्धा कादंबऱ्यांप्रमाणें मनोरंजन करितात आणि आयुष्याला उत्तम वळण लाविनात. चरित्रांतील भाग सत्य असतो म्हणून फावल्या वेळी ऐतिहासिक चरित्रें वाचून काढावीत.

नाटकें व सिनेमा हीं वरचेवर पाहण्याची सवय लागली म्हणजे तदनुषंगानें इतर वाईट सवयी जडतात. अलीकडे दोन तीन तास एका ठिकाणी बसण्याचा प्रसंग आला की तेवढ्यांत दोन वेळ चहा लागतो, सोडा वॉटर

लागतें; चिवडा व भजीं यांचीही आवश्यकता वाटते. हा एक शिष्टाचार होऊन बसला आहे. त्यामुळें स्वतःचे पैसे व कधी मित्रांचे पैसे जातात आणि या चागणुकीमुळें प्रकृतीला अपाय घडतो. थिएटरच्या भोंवती जी परिस्थिति असते, ती विद्यार्थ्यांना अनिष्ट असते. काही सभावित, पोक्त व सभ्य गृहस्थ सोडून दिल्यास इतरांचें बोलणें, हंसणें, खिदळणें, ओरडणें, जें चालतें तें सदभिरुचीला सोडून असतें. स्त्रिया, मुली, विद्यार्थी अशांना या वातावरणापासून जेवढें दूर ठेवितां येईल, तेवढें बरें असें वाटतें.

शाळाकॉलेजाच्या वार्षिकोत्सवांत विद्यार्थ्यांनी स्त्रीवेष घेऊन प्रोफसरांच्या सूचनाप्रमाणें काम करणें हेंही मोठेंसें चांगलें नाहीं. त्या वेळीं केवळ पुरुष पात्रांचें नाटक करावें, परंतु अध्यापकांनी तरुणांना स्त्रियांचे हावभाव शिकविणें हें कसेंसेंच दिसतें. सत्यांकरितां नाटकें दाखवून पैसा मिळविण्याची एक अनिष्ट पद्धत पडत आहे. त्यामुळें कार्य पाहून सात्त्विक दान करण्याची प्रवृत्ति नष्ट होते व नाटकांची करमणूक पदरांत घेऊन संस्थेस मदत केल्याचा मिथ्या अहंकार मात्र उत्पन्न होतो!

अलीकडे नाटकें कमी झालीं असली तरी सिनेमा बोलपट फारच बोकाळले आहेत. तेथें तर पडद्यावर सर्व सचित्र आणि उत्तान असा विषय दाखवला जातो. नैतिकदृष्ट्या या सिनेमापासून फारच हानि होत आहे, आणि त्यामुळें या बोलपटांवर कडक नियंत्रण असावें अशीही भाषा सांप्रत ऐकावयास येते. हे बोलपट पाहण्यांत आजचे विद्यार्थी दंग झालेले दिसतात. आठवड्यांतून एकदोन वेळां तरी सिनेमा पाहिलाच पाहिजे अशी विद्यार्थ्यांमध्यें प्रथा पडू लागलेली आहे. कित्येक विद्यार्थी तर दररोज सिनेमा पाहावयाला जातात. सिनेमा हे लोकशिक्षणार्थ आहेत असें म्हणतात. पण आपल्या इकडे अद्याप ती स्थिति आलेली नाहीं. केवळ करमणूक व मनोरंजन यांकरताच हे बोलपट आहेत. या बोलपटापायीं परदेशीं इतका पैसा जातो की सांगून सोय नाहीं. कला, काव्य, कथा आणि साहित्य अशा दृष्टीनें अभ्यास करण्याची पात्रता ज्यांना आली असेल त्यांनी त्या दृष्टीनें *बोलपट पहावेत. जे बोलपट शिक्षणाकरितां असतील व जे पाहण्यासारखे* आहेत असे आप्त व शिक्षक आपल्याला सांगतील असे निवडक बोलपट विद्यार्थ्यांनी पाहावेत. सिनेमा, नाटकें आणि कादंबऱ्या ही सर्व मुख्यतः शिक्षणापेक्षां

करमणूक व मनोरंजन याकरितांच आहेत. निवडक बोलपट प्रसंगीं पाहावेत, आणि कादंबऱ्याही वाचाव्यात.

विद्यार्थ्यांची मनोवृत्ति नाजुक व कोमल असते. एखाद्या भव्य पर्वतावर विद्यार्थी जाऊन उभा राहिला की त्याच्या अंतःकरणात भव्य व उच्च विचार येतात. एखादें सुरस व सुश्राव्य व्याख्यान ऐकलें कीं त्याचाही परिणाम विद्यार्थ्यांच्या मनावर लौकर होतो नाटक व सिनेमा यांतील शृंगारिक प्रकारांचा अनिष्ट संस्कार बालमनावर लौकर होतो जोंवर विद्यार्थ्यांची मनें कणखर व इष्टानिष्ट संस्कारांची निवड करण्याजोगी समर्थ नसतात तोंवर त्यांनी हें वरील सर्व पथ्य पाळलें पाहिजे. नाटकापासून नाटकी पेहराव, हावभाव, नखरे, ऐट, असलेच ढंग विद्यार्थी शिकतात. संस्कृत नाटकेंसुद्धा काही कमी अश्लील नाहीत त्यांतील मुख्य रस समजण्याला प्रौढपणा यावा लागतो. तो प्रौढपणा जोंवर नसतो तोंवर विद्यार्थी नाटकातील चावटपणाच तेवढा शिकतात. तसे न व्हावें म्हणून त्यानी जपले पाहिजे.

आहारात धरबंध नाही, वाचनात निवड नाही, पाहण्यांत तारतम्य नाही, आणि वागण्यांत ताळतंत्र नाही अशा स्थितींत विद्यार्थ्यांचें ब्रह्मचर्य कसे टिकेल ? आरोग्य चांगलें कसें राहील ? व त्यांच्याकडून महत्कार्ये कशीं घडतील ? शरीरांत नुकताच कुठे वीर्याचा उदय होतो न होतो तोंच नाटक-कादंबऱ्यांचे वाचन, सिनेमा-नटीचें दर्शन व अवलोकन आणि लघुकथांचें मनन असे जर होऊं लागलें तर नवी पिढी जोमदार कशी होईल ? तारुण्यांत स्त्रीचें चिंतन हें वीर्यक्षय करतें

स्त्रीमुखावलोकनतया व्यग्रप्राणामल्पचेतसाम् ।
ईहितानि हि गच्छन्ति यौवनेनसह क्षयम् ॥ कामंदक ॥

स्त्रियांच्या तोंडाकडे पाहात, त्यातच व्यग्र होणाऱ्या तरुणांच्या साऱ्या आकांक्षा यौवनाबरोबरच क्षीण होतात. यौवनाचा क्षय, शक्तीचा क्षय होऊं नये असें जर विद्यार्थ्यांना वाटत असेल तर त्यांनी आठ प्रकारच्या मैथुनाचा त्याग केला पाहिजे. तरुण मुलींशीं बोलत बसणें, त्यांची थट्टामस्करी करणें, त्यांच्याशीं खेळणें खिदळणें, टक लावून पाहणें, गुप्त अवयवाकडे चोरट्या नजरेनें पाहणें, सारखें मनांत त्यांचें चिंतन करणें, अमकी बाई अशी आहे, अमकी तशी आहे अशा गप्पा मारणें, स्त्रीपुरुषांच्या गर्दीत, सभा, स्टेशन वगैरे ठिकाणी स्त्रियांशीं

अगलट करणें वगैरे हे सर्व प्रकार आठ प्रकारच्या मैथुनांत येतात. विषयाच्या भोगापेक्षां विषयाचें चिंतनच अनिष्ट असतें. म्हणून विद्यार्थ्यांनीं हें वर्ज्य करावें आणि कडकडीत ब्रह्मचर्य पाळावें.

कडकडून भूक लागली की अन्नाची गोडी कळते. चांगले श्रम झाले म्हणजेच गाढ झोपेचें सुख अनुभविता येतें. तसेंच कडकडीत ब्रह्मचर्य पाळल्यावर गृहस्थाश्रमांत खऱ्या विषयसुखाचा आनंद मिळतो. गृहस्थाश्रम ही संस्था संयमयुक्त विषयसेवनार्थच आहे. योग्य वेळीं जें कृत्य होतें तें आनंद देतें. येवढ्या जगाचें आक्रमण करणारा सूर्य हासुद्धां आपलें कार्य संपल्यावरच संध्येच्या भजनीं लागतो. म्हणून स्वातंत्र्य ज्यांना संपादावयाचें आहे, अशा विजिगिषूंनी अकालीं स्त्रीचिंतन करणें सर्वथैव हानिकारक होय !

असमाप्तजिगीषस्य स्त्रीचिंता का मनस्विनः ।

अनाक्रम्य जगत्कृत्स्नं नो संध्यां भजते रविः ॥ राजतरंगिणी ॥

गुरुपत्नीशीं किती मर्यादेनें वागावें हें धर्मसूत्रांत चांगलें सांगितलें आहे. तशी वागणूक विद्यार्थ्यांनीं सर्व स्त्रियांच्या बाबतींत ठेवली पाहिजे. एकांतांत आई, बहीण अशा कोणाशीही गप्पागोष्टी करूं नयेत. कारण इंद्रियग्राम बलवान् आहे. तो विद्वानावर सुद्धां प्रताप गाजवतो. म्हणून चित्तस्थैर्य, इंद्रियनिग्रह व विद्यार्जन यांकडेच सारखें लक्ष ठेवलें पाहिजे. उच्च ध्येय, उच्च आकांक्षा यांचें चिंतन सदैव ठेवलें व विद्यार्थी सारखा कार्यव्यापृत असला म्हणजे त्याला असले ढंग सुचत नाहींत. रिकामें मन हा सैतानाचा बाजार, हें सांगावयास नकोच ! मन हें ओढाळ व चचल आहे हें खरें, पण त्याला विवेकाच्या अंकुशानें विद्येची गोडी लावितां येते व तशी गोडी लागली की तें स्थिर राहतें.

अन्नाचा व ब्रह्मचर्याचा पुष्कळ संबंध आहे. यास्तव प्रकरण नऊमध्यें जो विषय सांगितला आहे तो विद्यार्थ्यांनीं कृतींत आणावा. उत्तेजक चित्रें व उत्तेजक वाङ्मय याप्रमाणेंच उत्तेजक आहारामुळें ब्रह्मचर्याचा ऱ्हास होतो. हित, मित व पथ्यकर असाच आहार विद्यार्थ्यांनीं करावा. वरचेवर उपास करणें, उपासानंतर खूप भोजन करणें, सारखें गोडधोड खाणें, रात्रीं खूप जेवणें यांमुळें धीर्यनाश होतो. जागरणावर जागरणें करणें, चहाचे कपावर कप उडविणें, उन्हातान्हांत अति श्रम करणें, सायकलीवरून भर उन्हांत लाव-

लोकांच्या मजला मारणें, अपशब्दाचा उच्चार करणें, चावटपणा, थट्टामस्करी, या सर्व अतिभोगानें वीर्यनाश होतो. हातरूण, पांघरूण, झोपेच्या पूर्वीची परिस्थिति यांचाही ब्रह्मचर्याशी संबंध आहे. विद्यार्थ्याचें हांतरूण साधें, स्वच्छ व सुटसुटीत असावें. गाद्या, गिरद्या, उशा वगैरे नमतील तर बऱ्या; निदान त्या हलक्या असाव्या. मच्छरदाणी ही वस्तु सांप्रत चैनीची नसून जरूरीची झालेली आहे. मच्छरदाणीचें आत अंगात न घालता झोपावें. मच्छरदाणी नसल्यास अंगात सद्रा अथवा बंडी असावी. निजताना पंचा, मलमली विजार अथवा लंगोट नेमावा त्यामुळें वसल्याही प्रसंगी चटकन् उठतां येतें आणि प्रासंगिक आपत्तीचें निवारण करितां येतें. पांघरूण हें जड व उबदार नसावें, तें तोंडावरून कधीही घेऊं नये गुरगुटून पांघरूण घेतल्यानें श्वासोच्छ्वासास स्वच्छ हवा मिळत नाहीं आणि उष्णता वाढून वीर्यनाश होतो. पांघरूण हें आवश्यकतेपेक्षा एकदोन अंश्यानीं कमी असावें. दिवा ठेवून निजूं नये निदान जळता दिवा जवळ ठेवू नये.

चांगला व्यायाम झालेला असला, दिवसभर सर्व कामें उत्तम तऱ्हेनें पार पाडलेली असली, मन प्रसन्न असलें आणि मनात अन्य विषय काही नसला की विद्यार्थ्यांना भुईस पाठ लागतांच झोप येते. विद्यार्थी दिवे मालवून गप्पागोष्टी करीत निजतात तें टाळलें पाहिजे. गप्पा मारीत निजण्याची सवय चांगली नव्हे कारण कित्येक वेळां विविध गप्पा इतक्या लावतात की वेळेचें भानही राहात नाहीं व रात्रीचे दोनदोनही वाजतात. झोप येत नसल्यास उठून काही वाचावें, ईश्वरस्मरण करावें धार्मिक ग्रंथाचें वाचन हें झोपेपूर्वी थोडें केल्यास डोकें शांत होतें व तेव्हांच झोप लागते.

घरी आणि बाहेरही विद्यार्थ्यांनी अगदी लगटून अशी हातरणें कधीही घालू नयेत. मध्यें दोन हाताचें तरी अंतर असावेंच. दुसऱ्याचें हांतरूण पांघरूण वापरू नये. हातरूणावरील पलंगपोस हा दर आठवड्याला अवश्य धुवावा. पांघरूणही स्वच्छ व ऋतुमानास योग्य असें असावें. लघुशंकेस जाऊन, स्वच्छ चुळा भरून, शांतपणें ईश्वरस्मरणपूर्वक झोंपी गेल्यास स्वप्नें पडत नाहीत, निद्रानाश आणि वीर्यनाश होत नाही. याप्रमाणें ब्रह्मचर्यव्रत पाळण्यासंबंधीचे अनेक नियम आहेत.

## प्रकरण १२ वें

# घरची व बाहेरची वागणूक

आपल्या भारतीय समाजांत एकंदरींत सांस्कृतिक दृष्ट्या बरेंच अंतर आहे. कांही गट फार मागासलेले आहेत तर काही त्या मानानें बरेच पुढारलेले आहेत. मागासलेल्या गटांत सभ्यता, शिष्टाचार, नम्रता, शालीनता, उदात्तता इत्यादि सद्गुण नाहीतच. परंतु पुढारलेल्या समाजामध्येंसुद्धां शिष्टाचार, सभ्याचार, पोक्त वागणूक यांचा अभाव दिसू लागला आहे. हल्लींच्या विद्यार्थ्यांमध्यें शिस्त नाही, विनय नाही, विवेक नाही, वडिलांबद्दल आदर नाहीं, सद्गुणग्रहणाकडे दृष्टि नाहीं, अभ्यासाची प्रवृत्ति नाही, अशी ओरड सर्वत्र ऐकू येते. त्यामुळें विद्यार्थ्यांना घरीं व बाहेर जेवढें सुख लागावे व त्यांना जेवढा आनंद वाटावा, तेवढा वाटत नाही. म्हणून विद्यार्थ्यांनी घरी व बाहेर आपली वागणूक स्वतःला व दुसऱ्याला सुखकर कशी ठेवावी, यासंबंधींचें विवेचन येथें करण्याचें योजिलें आहे.

### शील म्हणून जें म्हणतात तें हें

पदन्येषां हितं न स्यादात्मनः कर्म पौरुषम् ।
अपत्रपेत वा येन न तत्कुर्यात्कथंचन ॥ महाभारत ॥

ज्या आपल्या वागणुकीमुळें इतरांना सुख होणार नाही व जीमुळें आपणास खरेचेवर मान खाली घालावी लागेल अशी वागणूक करू नये. पूर्वी गुरुगृहात ही सर्व वागणूक विद्यार्थ्यांना अवगत होत असे. मध्यकालात कुटुंबामध्येंच परंपरेनें हें शिक्षण मिळे. पण सांप्रत विद्यार्थी पुस्तकी अभ्यासांत गढलेले, आणि त्यांच्या बुद्धीला अनेक ताण, यांमुळें त्याचें लक्षच सभ्यता, शिष्टाचार, व्यवहार, आपले घर, शेजार, वृद्ध, आप्त, अशा सर्वांकडे असतच नाही! घरी व बाहेर कसें वागावें हें संक्षेपतः पुढील उपदेशांत आहे.

सत्यं वद । धर्मं चर । स्वाध्यायान्मा प्रमदः । सत्यान्न प्रमदितव्यम् । धर्मान्न प्रमदितव्यम् । कुशलान्न प्रमदितव्यम् । भूत्यै न प्रमदितव्यम् । स्वाध्यायप्रवचनाभ्यां न प्रमदितव्यम् । देवपितृकार्याभ्यां न प्रमदितव्यम् ।

मातृदेवो भव । पितृदेवो भव । आचार्यदेवो भव । अतिथिदेवो भव । यान्यनवद्यानि कर्माणि तानि सेवितव्यानि । नो इतराणि । यान्यस्माकं सुचरितानि तानि त्वयोपास्यानि । नो इतराणि । श्रद्धया देयम् । अश्रद्धयाऽदेयम् । श्रिया देयम् । ह्रिया देयम् । भिया देयम् । संविदा देयम् । अथ यदि ते कर्मविचिकित्सा वा वृत्तविचिकित्सा वा स्यात् । ये तत्र ब्राह्मणाः संमर्शिनः । युक्ता आयुक्ताः । अलूक्षा धर्मकामाः स्युः । यथा ते तत्र वर्तेरन् । तथा ते तत्र वर्तेथाः ।

भावार्थः—खरें बोलावें. शिष्टाचार पाळावेत. नित्य अभ्यास करावा. सत्य, धर्म, कल्याण, उत्कर्ष आणि विद्या यापासून पराङमुख होऊं नये. देव व पितर यांविषयीं आदर बाळगावा. आई, बाप, शिक्षक व पाहुणे यांशीं आदरानें व प्रेमानें वागावें. वडिलांच्या चांगल्या गोष्टींचें अनुकरण करावें. विद्वानाला मान द्यावा. जें कांहीं द्यावयाचें व करावयाचें तें श्रद्धेनें, प्रेमानें व ज्ञानपूर्वक करावें. आपणास कांहीं अडल्यास, शंका आल्यास अगर अवगत नसल्यास आपणापेक्षा जे विद्वान् असतील त्यांना विचारावें.

वरील उपदेश तैत्तिरीय उपनिषदामध्यें स्नातकाला आचार्यांनीं केला आहे. त्यांतील सद्य-परिस्थितीला उपयुक्त असें सार वर दिलें आहे.

शिकलेला मनुष्य म्हणजे व्यवहारशून्य ही कल्पना पुष्कळ अंशीं खरी आहे. कारण शिकावें, परीक्षा द्याव्या व नोकरी करावी हेंच तो जाणतो. नोकरी करून पैसे मिळवतां आले म्हणजे संपलें. मग व्यवहाराकडे पाहतो कोण? व पाहण्याचें कारण काय? पण आतां हा दृष्टिकोन बदलला आहे. नोकऱ्या दुर्मिळ झाल्यामुळें अनेक उद्योग, अनेक व्यवहार समजून घेण्याचा प्रसंग हल्लीं आला आहे. तरुणांची दृष्टि व्यवहाराकडे वळली आहे हें सुचिन्ह होय!

## सभ्यता हें नागरिकाचें पहिलें लक्षण आहे

शरीराची, मनाची निर्मलता आणि ऋजुता म्हणजेच सभ्यपणा होय. स्वच्छ शरीर, नीटनेटका पोषाख, धुतलेल्या तांदळासारखें स्वच्छ व निर्मल मन असणें हेंच सभ्यतेचें लक्षण होय! खोटें बोलणें, लबाडी करणें, उद्धटपणानें वागणें, इतरांस त्रास देणें, अपशब्द उच्चारणें, हें असभ्यतेचें लक्षण

होय! प्रत्येक माणसाला विद्वान् आणि श्रीमान् होणें शक्य नाही; पण प्रत्येकाला सभ्य होणें मात्र अशक्य नाही. आज जगांत जे उत्तम नागरिक आहेत, त्याचे देश या गुणांमुळेंच पुढें आलेले आहेत. म्हणून विद्यार्थ्यांनी सभ्यता अंगीं आणली पाहिजे. सभ्यता म्हणजे अकालीं पोक्तपणा नव्हे, अगर दुढ्ढाचार्यपणाही नव्हे. लहान तोंडी मोठा घास घेणें, वर्तमानपत्रांतील मोठमोठ्या विषयांवर गप्पा मारीत बसणें, आपल्या वयाला व व्यवसायाला न शोभणाऱ्या अशा गोष्टी करणें हें सभ्यतेचें लक्षण नसून छिछोरपणाचेंच लक्षण होय. स्वच्छ दिवा घरी लाविला की जसा स्वच्छ प्रकाश पडतो, त्याप्रमाणे सभ्यता ही स्वभाव, भाषा, आचार, विचार, उच्चार अशा सर्व क्षेत्रात दिसते.

प्रत्येक विद्यार्थ्यांच्या घरी आईबाप, भावंडे आणि इतर आप्त मंडळी असतात. आपल्या मुलानें अभ्यास करावा, शहाणें व्हावें व पैसे मिळवावेत असें सर्वांना वाटतें. म्हणूनच आपल्या मुलांना काम फार पडू नये, त्याचा अभ्यास बुडू नये, त्याचे हाल होऊं नयेत म्हणून सर्व आईबाप जपत असतात. ही त्यांची भावना लक्षांत घेऊन विद्यार्थ्यांनी अभ्यास सांभाळून आपल्या पालकांना अनेक कार्यांमध्यें मदत केली पाहिजे

परगांवी अभ्यासार्थ जे विद्यार्थी असतील त्याची गोष्ट सोडली तरी घरोघरी जे विद्यार्थी असतात त्यांनी आपल्या घरातील कामेंधामें केली पाहिजेत. सर्व राष्ट्रच दरिद्री, तेव्हा प्रत्येक विद्यार्थ्याच्या घरी गडीमाणसें, नोकरचाकर, असणें शक्य नाही. म्हणून पाणी ओढणें, केर काढणें, धाकट्या भावंडांना खेळवणें, त्याचे व स्वतःचे कपडेलत्ते नीटनेटके ठेवणें, घरी आई एकटी व शाळेची गडबड हें जाणून आईच्या हरएक कार्यात मदत करणें, प्रसंगी स्वयंपाक करणें, बाजारहाट करणें, घरात जनावर असल्यास धार काढणें, वैरण घालणें, सणवार, कार्यप्रसंग असल्यास आपल्या अभ्यासाकडे थोडें दुर्लक्ष करून पडतील तीं कामे अंग मोडून व लक्ष लावून करणें वगैरे सर्व कामें शिक्षण व कर्तव्य या दृष्टीनेंच विद्यार्थ्यांनी केली पाहिजेत.

व्यवहार हा करूं लागले की येतो. पडेल ते काम करण्याची वृत्ति ठेवून वागल्यास तीं आपोआप येऊं लागतात. त्याकरता शाळेंत नांव घालावें लागत नाहीं. केर काढणें, धोतरें धुणें, दोश लावणें, स्वयपाक करणें;

बाजारहाट करणें, मनिऑर्डर, तार, रजिस्टर करणें, पत्रें लिहिणें, रेल्वे, बँका यांचे व्यवहार करणें, अशा सर्व शिक्षणास जर शाळा लागू लागल्या तर त्या पुन्याही पडणार नाहींत. हे सर्व प्रत्यक्ष व्यवहार करणें म्हणजेच शिक्षण आहे. विद्यार्थ्यांनीं हीं कामें लक्षपूर्वक करून आईबापांना सुख दिलें पाहिजे.

आईबापांच्या कष्टांची व खस्ताची कदर जे विद्यार्थी जाणत नाहींत त्यांच्या आईबापांना आपली मुलें म्हणजे दावेदार वाटतात "पूर्वजन्माचें वैर म्हणून हा छळवाद चालला आहे" असे उद्‌गार पुष्कळ आमा काढतात! आईबापानी मरमर मरावे, विद्याभ्यासाला पैसे पुरवावे, मुलानीं त्या पैशावर चैन करावी, घरी आल्यावर त्याने इकडची काडी तिकडे न करता आळसात, ऐदीपणात आणि गप्पागोष्टीत वेळ घालवावा, हें दृश्य कोणाला बरें दिसेल? सारखा अभ्यास कधीच होत नसतो. पुष्कळ वेळ व्यर्थच जात असतो. त्या सर्व वेळाचा उपयोग आईबापाना साहय करण्याच्या कामी केला तर त्याना फार समाधान वाटते. परमेश्वराच्या खालोखाल आईचे निरतिशय प्रेम असते. तिच्या प्रेमाची पाखर महत्कार्माला उत्तेजन देते. म्हणूनच नेपोलियन बोनापार्ट, छत्रपति शिवाजी महाराज, अशा मोठमोठ्यांनी मातेची सेवा मोठ्या निष्ठेनें केली.

'न मातुः पर दैवतम्' आईसारखें श्रेष्ठ दैवत नाहीं, हें अक्षरशः खरें आहे. मुलाकरिता आई किती खस्ता खाते, त्याच्या जोपासनेकरिता अहोरात्र किती काळजी घेते, मुले आजारी असलीं की रात्रीच्या रात्री जागून आई किती यातायात करते, हे सर्व पाहिलें म्हणजे आईच्या कष्टाची कल्पना येते. मुलांना श्रम झाला की आईला त्रास होतो, त्याला काटा टोचला कीं टचकन् तिच्या डोळ्यांत पाणी येते, मुलाला काही झाले की आईचा जीव तिळतिळ तुटतो. मुलाला वांचविण्याकरिता आई जळत्या निखाऱ्यांवरून चालण्याचेंही दिव्य करण्यास तयार होते. म्हणूनच विद्यार्थ्यांनीं आईविषयीं कृतज्ञ असले पाहिजे. आईने काम सांगितले की कपाळाला आठ्या घालीत, आदळ आपट करीत जर मुले ते करूं लागली तर आईला काय बरें वाटेल? आईने हांक मारली की हसतमुखानें आणि उत्साहानें जाऊन "काय काम आहे हे सांग, आतां करतों" असें जर मुलगा म्हणेल तर त्या आईला किती बरें आनंद वाटेल. सांगितलेले काम कोणीकडून, कसें तरी करून टाकणें हेंही अगदींच

अप्रशस्त होय ! कोणतेंही काम करतांना आपलें सगळें चित्त, सगळा उत्साह व सर्व शक्ति एकवटूनच तें केलें पाहिजे.

पित्याविषयी आदर बाळगणे हेंही विद्यार्थ्यांचें कर्तव्य आहे. मुलाकरितां बाप कांही थोडेथोडके श्रम करीत नाहीं नोकरीकरितां, उद्योगाकरितां तो देशोदेश हिंडतो; दिवस, रात्र, ऊन यांचा विचार न करतां तो कष्ट करून पैसे मिळवितो; आपल्या तोंडचा घास मुलांच्या मुखांत घालतो. मुलांना सुख व्हावें म्हणून त्याची मारखी धडपड चालू असते. वडील व आप्त माणसांचेही श्रम पुढील पिढीकरितां असतात. यास्तव विद्यार्थ्यांनीं त्यांच्याशी आदरानें वागून आज्ञाधारकपणा दाखविला पाहिजे.

बापाची इच्छा तर मुलगा प्रपंचभार घेणारा, आपलें ऐकणारा व आपल्या कार्यास मदत करणारा असा असावा अशी असते. तेव्हां प्रौढ विद्यार्थ्यांनीं आपल्या समजस व सुसंस्कृत वडिलांचे सर्व व्यवहार हळूहळू समजून घ्यावेत. घरचा व्यवहार करणें, घरखर्चाचा अंदाज करणें, हिशेबठिशेब ठेवणें, सावकारीचा धंदा असल्यास तो सर्व व्यवहार समजून घेणें, शेतीचें उत्पन्न व पेढी असल्यास त्यांची माहिती घेऊन सर्व प्रकारची कामें करण्यास शिकणें, हा शिक्षणाचा व वडिलांना मदत करण्याचा असा दुहेरी भाग आहे जे विद्यार्थी घरीच असतील त्यांनी मधून मधून इकडे लक्ष द्यावें. जे विद्यार्थी परगावी असतात, त्यांनी सुटींत घरी आल्यावर जबाबदारीनें हे व्यवहार पाहावेत. हे व्यवहार पाहिल्यानें पुस्तकी काल्पनिक वातावरण आणि प्रत्यक्ष व्यवहार यामध्ये किती अंतर असतें, याची विद्यार्थ्यांना कल्पना येते.

पाश्चात्य देशांत मोठमोठ्या कार्यकर्त्या पुढाऱ्याजवळ कांही दिवस 'अंतेवासी' म्हणून राहण्याचा चांगला प्रघात आहे. अभ्यास करीत असतांना अथवा अभ्यासानंतर कांही विद्यार्थी अशा मोठमोठ्या लोकांचा सहवास अनुभवितात. त्यामुळें मनुष्यस्वभावाचें ज्ञान, कामाचा उरक, ग्रहणधारणशक्ति, कोणत्याही विषयाचा चटकन् निर्णय लावण्याची पात्रता इत्यादि गुण अंगी येतात. आपल्या देशांत हें सर्व शक्य नसलें तरी विद्यार्थ्यांनीं सुलभ जें गृहशिक्षण त्याचा लाभ अवश्य घ्यावा.

जन्म देणाऱ्या पित्यापेक्षां विद्यादात्या गुरुची योग्यता सर्वांत अधिक आहे. गुरु हा दुसरा जन्म देतो म्हणजे बौद्धिक जीवन देतो व त्यामुळें मनुष्य

द्विज होतो अशी जी जुनी कल्पना आहे, तीत पुष्कळ अर्थ आहे. विद्या देणे, दुर्गुण न लागावेत म्हणून धाक दाखविणे, विषय समजावा म्हणून परोपरीनें शिकविणें, विद्यार्थ्यांच्या पुढे उच्च उच्च ध्येयें ठेवणे या दृष्टीने शिक्षकाची योग्यता मोठीच आहे. एकंदरीत आईबाप व गुरु ही सर्व विद्यार्थ्याच्या आयुष्यरूपी रोपटचाला सारखें जलाचें सिंचन करीत असतात. माळी जसा रोपांची काळजी घेतो, त्याप्रमाणे शिक्षक व पालक विद्यार्थ्यांच्या आयुष्याची काळजी वाहत असतात म्हणून विद्यार्थ्यांनी, जोवर त्याचें त्याना स्वतःचें बरेवाईट कळत नाही तोवर शिक्षक व पालक याचे ऐकले पाहिजे. जो दुसऱ्याचें ऐकतो, त्यालाच पुढे दुसऱ्यावर हुकमत करण्याची पात्रता येते खेळामध्ये जसे आपल्या म्होरक्याचें ऐकावे लागते त्याचप्रमाणे विद्येच्या खेळामध्येसुद्धा आपल्यापेक्षा जे शहाणे आहेत त्यांचें ऐकलें पाहिजे

आपल्या घरातील कुलधर्म व कुलाचार, उत्सव, सण, व्रतें याची माहिती विद्यार्थ्यांना अवश्य असावी त्या त्या दिवशी आणि सणावारी ज्या गोष्टी करावयाच्या असतात त्या विद्यार्थ्यांनी पुढे होऊन कराव्या. उदाहरणार्थ पाडव्यास गुढी उभारणे, पोळ्याचे दिवशी जनावराना धुणें व रगविणे, नवरात्रापूर्वी चुना लावणे, दिवाळीपूर्वी सर्वत्र स्वच्छता करणे, श्राद्धपक्ष असल्यास तदनुकूल कामें करणे, हे सर्व विद्यार्थ्यांच्या गृहकर्तव्यातच येते

विद्यार्थ्यांनी आपापल्या भावडाशी प्रेमळपणाने वागले पाहिजे. भावंडामध्ये परस्परप्रेम, सोशिकपणा व सहकार्य नसेल आणि ती सारखी भाडत तंडत व एकमेकास सिवीगाळ करीतच राहतील तर आईबापाना ही मुलें शत्रूसारखी वाटतात. वास्तव समजस विद्यार्थ्यांनी सर्व भावडाना इष्ट वळण घालून द्यावें भावडाशी तुसडेपणाने, हेकेखोरपणाने, आग्रहानें वागल्यास त्याना प्रेम वाटत नाही. म्हणून त्याच्याशी मिळूनमिसळून, गप्पागोष्टी बोलून, खेळीमेळीने व मोकळ्या मनाने वागावे.

> महतां बहुमानेन दीनानामनुकंपया ।
> मैत्र्या चैवात्मतुल्येषु यमेन नियमेन च ॥
>
> भा. स्क. ३ अ. ९ श्लो. ७.

वडिलांचा बहुमान करावा, लहानावर प्रेम करावे आणि बरोबरीच्या भावडाशी मैत्री करावी हाच भक्तिमार्ग होय ! आपले वडील, चुलते, मामा, काकी,

मावशी, आत्या या सर्वांशी अदबीनें, प्रेमानें व सौजन्यानें वागावें. कारण आपणास व्हहानाचे मोठे करण्याचे कामीं या सर्वांचे श्रम खर्ची पडलेले असतात.

वृद्धसेवा हा एक शिक्षणाचा व शिष्टाचाराचा मोठा भाग आहे. वृद्ध म्हणजे अगदी खप्पड, जरठ, गलितगात्र असाच अर्थ समजू नये. घरी सुदैवानें इतकी वृद्ध माणसें जर असतील तर त्यांची शारीरसेवा विद्यार्थ्यांनी करावीच. पण घरात जे आपणापेक्षा वयानें व ज्ञानानें वृद्ध असतात, त्यांची हेटाळणी विद्यार्थ्यांनीं कधींही करूं नये. म्हातारडी आजीसुद्धा आणि म्हातारे आजोबा-सुद्धा एकाद्या बिकट प्रसंगी अशी युक्ति सुचवीत असतात; की त्या युक्तीमुळें मोठा अनर्थ टळतो ! वृद्ध माणसें म्हणजे अनुभवाचा सांठा असतो. वृद्धांना मान देणें म्हणजे अनुभवाला मान देणें होय ! श्रीकृष्णांनी, हा मूर्खा तूं वृद्ध-सेवा केली नाहीस. तुला कांही कळत नाही " न वृद्धाः सेवितास्त्वया " अशी अर्जुनाची निर्भर्त्सना केल्याची गोष्ट भारतांतील कर्णपर्वांत आहे. गांडीव-धनुष्याची निंदा कोणी केली तर त्याचा वध करण्याची प्रतिज्ञा एकदां अर्जुनानें केली. धर्माला हें ज्ञान नव्हतें म्हणून त्यानें एकदा रागानें गांडीवाची निंदा केली ! 'धिग्गांडीवं ' असें म्हणतांच धर्मवधास अर्जुन सरसावला. श्रीकृष्णांनी अर्जुनाला कानपिचक्या देऊन वृद्धांची वचनें सांगून शेवटी परनिंदेने परवध व आत्मस्तुतीनें आत्मवध होतो असें सांगून कसें तरी प्रकरण मिटविलें ! तात्पर्य, वृद्धापासून शिकण्यासारखें पुष्कळ असतें, म्हणून वृद्धाविषयी अनादर बाळगू नये.

उद्धटपणा व हांजीखोरपणा हे दोन्ही वाईट ! 'विद्या ददाति विनयं' हें तत्त्व कृतीत आलें पाहिजे. विद्यार्थ्यांमध्ये विनय, शालीनता हे गुण पाहिजेत. वरोबरी जो विद्यार्थी विद्येचा खरा भोक्ता व विद्वान् असतो तो विनयीच होतो. सांप्रत 'अल्पविद्या बहुगर्वी' अशी वृत्ति विद्यार्थ्यांत आढळते ती अज्ञानाची द्योतक आहे. विद्यार्थ्यांनी विनयानें पण स्वाभिमानाने आणि शिस्तीनें वागावें. घरी नि बाहेर शिस्त म्हणून नको अशी स्थिति आहे. बेशिस्तपणा हा आमच्या पांचवीला पुजला आहे. हा बाजारबुणगेपणा जाण्याला कडक शिस्तीचें पथ्य अवश्य सांभाळलें पाहिजे. म्हणून नियम करून त्याप्रमाणें वागण्याची संवय लावून घेण्याचा हा काळ आहे

विद्यार्थ्यांना दुखणेकऱ्याशी कसें वागावें हें शिकलें पाहिजे. औषध आणणे, वैद्य डॉक्टरांना बोलावणें, रोग्याची सेवा करणें, त्याचे कपडे व आंथरूण स्वच्छ ठेवणें वगैरे सर्व केले पाहिजे. दुखणेकऱ्याशी कसें बोलावे व त्याची मनोवृत्ति कशी उल्हसित ठेवावी, हे पुष्कळ डॉक्टरांनासुद्धा समजत नाही. अरे बाप रे ! ! काय खराब झाला हो ! कसला हा रोग ? अशा तऱ्हेची वाक्यें रोग्यासमोर कधीही उच्चारू नयेत. रोग्याला नेहमी धीर द्यावा. लौकर बरा होणार असे म्हणावें आणि त्याला सर्व प्रकारची मदत करावी. आई, वडील, भावंडे, बहीण अशी कोणी तरी घरी आजारी असतातच. त्याचें मनोरंजन करणें, त्यांना श्रम न देणें, कुपथ्य होत असेल तर प्रतिबंध करणें, उत्साहाच्या गोष्टी सांगणें, हें सर्व विद्यार्थ्यांना अवगत असावे. मिशनरी लोक दवाखान्याच्या द्वारें उपकार करून लोकांना ऋणी करून ठेवतात. विद्यार्थ्यांनी निदान घरामध्यें तरी रुग्णसेवेची मिशनरी वृत्ति दाखवावी.

हल्ली अनेक कारणामुळें प्रवास वाढला आहे. ज्याच्या त्याच्या उद्योगाप्रमाणे अनेक पाहुणे घरोघरी येत असतात. पाहुण्यांमध्यें घरचे आप्त, स्नेही आणि मतांचे प्रचारक असे तीन प्रकार पडतात. विद्यार्थ्यांनी आपल्या घरी आलेल्या अशा या पाहुण्याचे आदरातिथ्य मोठ्या अगत्यानें करावें. आप्तेष्टाचें, नातलगाचें आदरातिथ्य नीट केले की त्याच्या घरी आपण जेव्हा जाऊ तेव्हा आपली व्यवस्था उत्तम होते. सार्वजनिक कार्यकर्त्यांचें आदरातिथ्य नीट केल्यास सहवासामुळें त्यांच्या विचाराचा लाभ मिळतो आणि त्यांच्या ओळखीचा फायदा पुढे करून घेता येतो. म्हणून या अशा पाहुण्याच्या सेवेला विद्यार्थ्यांनी तत्पर असावे.

आपल्या घरी जे कोणी पाहुणे येतात त्याना सुख होईल, त्याना आनंद वाटेल, परकीपणा वाटणार नाही, असेंच त्यांच्याशी वागावें. गोड बोलणें, नम्र भाषण करणें, सांगितलेले काम आतुरतेनें करणें, त्यांची संभाषणें नीट काळजीपूर्वक ऐकणें, त्याच्या वागणुकीकडे लक्ष ठेवून त्याच्या गुणाचे अनुकरण करण्याचा यत्न करणे, अशापासून विद्यार्थ्यांना लाभ होण्याजोगा असतो.

विद्यार्थ्यांची वागणूक शाळेमध्यें विनयशील, स्वाभिमानी व दक्षतेची असावी. विद्यालयामध्यें आपण विद्यार्जनार्थ जातों हे लक्षात ठेवले म्हणजे बेशिस्त वर्तन करण्याची बुद्धि होत नाही. हल्ली शाळामध्यें देशभक्ताची

निंदा फारशी होत नाही. तथापि शिक्षक व विद्यार्थी यांमध्यें अनेक वादग्रस्त प्रश्न उपस्थित होतातच! त्या सर्व प्रसंगी विद्यार्थ्यांनीं बाणेदारपणानें वागावें. पूज्य पुरुष, पूज्य ग्रंथ व पूज्य वस्तु यांची निंदा शिक्षक अगर अधिकारी करूं लागले तर विद्यार्थ्यांनीं तें सहन करूं नये. हांजीखोरपणा आणि उद्धटपणा यांतील मधली वृत्ति विद्यार्थ्यांनी ठेवावी. कारण नसताना उगाच आपणासंबंधीं अनिष्ट ग्रह होईल असें वर्तन करू नये. प्रत्येक तासाला नेमके हजर असावें. अनियमितपणें वागू नये. अध्यापकानें सांगितलेलें काम तत्काळ करावें. जिज्ञासूपणें अध्यापकांना पाहिजे तें विचारावें. खंडनमंडन व वाद यांच्या भरीस न पडतां नेहमी चर्चेच्या स्वरूपानें जिज्ञासेनें विषय विचारावा. आपल्यापेक्षां हुषार, बुद्धिमान आणि अभ्यासी विद्यार्थ्यांची मैत्री जोडावी. सर्व विद्यार्थ्यांशीं मनमिळाऊपणें वागावें. हट्टी व आग्रही स्वभाव नसावा. इतर विद्यार्थ्यांशी मत्सर, भांडण, चुरस करूं नये. विद्या हें ध्येय गाठावयाचें आहे असें समजून वागावें. शाळातर्फे चर्चा, सामने, उत्सव, समारंभ होतील त्या वेळी त्यांत जिवापाड श्रम करावे. बुचराई करूं नये. वर्गांत एकलकोंडें बसणें, खोलीबाहेर जग नाही असें समजणें, बरोबरीच्या विद्यार्थ्यांशी बेपर्वाईनें वागणें हे सर्व दोष विद्यार्थ्यांनीं नष्ट केले पाहिजेत.

## अनेक मित्र जोडा

आजचे विद्यार्थी हे उद्यांचे नागरिक व पुढारी असतात. कोणत्याही पुढाऱ्याला त्याच्या बरोबरीची मित्रमंडळी ही जशी मदत करतात, तशी इतर कोणीही करीत नाहींत. म्हणून विद्यार्थ्यांनी लहानपणापासून अनेक मित्र जोडण्याची सवय ठेविली पाहिजे. हायस्कुलांतील मित्र, कॉलेजातील मित्र, गावांतील, संस्थेतील, तालमींतील, खेळांतील अनेक मित्रांचा संग्रह हा पुढे मोठ्या कार्यकर्त्याला अत्यंत उपयोगी पडतो.

उदंड ओळखी होता। उदंड भाग्य होतसे ॥

हें श्रीसमर्थवाक्य अगदीं खरें आहे. अलीकडे विद्यार्थ्यांमध्यें तुटकपणा, आप्पलपोटेपणा, मिळूनमिसळून न वागणें वगैरे दुर्गुण शिरत आहेत. त्यामुळें एका विचाराचीं जिवास जीव देणारी अशीं चार माणसेंही दृष्टीस पडत नाहीत. संघटनेच्या दृष्टीनें ही स्थिति फार शोचनीय आहे. म्हणून विद्यार्थीवर्गांत

विद्या, शील व अभ्यास याप्रमाणेच अनेक मित्रांचा संग्रह करणें फार अगत्याचे आहे. सांप्रत सहशिक्षणामुळें स्त्री व पुरुष विद्यार्थी संस्थामध्यें असतात. या दोन्ही वर्गांतून आपला मित्रगण जोडला पाहिजे. मात्र पापान्निवारयति योजयते हिताय। हें मित्रलक्षण ध्यानात ठेवावे.

पूर्वी कीर्तनपुराणें हेच सामुदायिक प्रसंग असत पण हल्ली सभा, संस्था, संमेलने, परिषदा, व्याख्यानें, यात्रा व उत्सव या निमित्ताने अनेक प्रसंगी समुदाय एकत्र होतो. सामुदायिक व सार्वजनिक प्रसंगीं कसें वागावें, याचेही नियम आहेत कार्यसौकर्याकरिता हे नियम अवश्य लागतात. हे नियम म्हणजे एक प्रकारची शिस्त होय. ही शिस्त कीर्तन, पुराण, व्याख्यान, सभा, संमेलनें, भोजनप्रसंग अशा सर्व वेळी पाळली पाहिजे अनेक सामुदायिक प्रसंगी जे खटके उडतात व श्रम होतो त्याचे कारण त्या त्या व्यवहारातील शिस्त ध्यानी न घेतां, बेशिस्तीने वागणें हें होय! म्हणून विद्यार्थ्यांनी ही शिस्त पाळण्याचा अभ्यास करावा

विद्यार्थ्यांनी शेजारधर्मही पाळला पाहिजे शेजाऱ्याच्या उपयोगी पडणें, त्याच्या घरीं आजारी असल्यास औषधपाणी आणून देणें, कार्यप्रसंग असल्यास तेथें जाऊन कोणतेंही लहानमोठें काम अंग मोडून करणें, आपल्या आळीत कोणी मृत झाल्यास आणि परिचितांपैकी कोणी वारल्यास त्याच्या स्मशानयात्रेस जाणें, कोठें आग लागली, मारामारी झाली किंवा इतर आपत्ति आली तर न डगमगता व न गांगरतां त्या प्रसंगी जाऊन झटून साहाय्य करणें, हा विद्यार्थ्यांचा स्वभाव बनला पाहिजे. दुसऱ्याच्या उपयोगी पडण्याचे अनेक प्रसंग असतात ते सर्व प्रसंग घरी आणि बाहेर विद्यार्थ्यांनी साधावे. दुसऱ्याकरता झीज सोसण्याची प्रवृत्ति लहानपणापासून असावी

दुसऱ्याला जवळ करण्याचे निरनिराळे मार्ग असतात. गोड बोलून, प्रेमाने वागून, शिकवून, उपयोगी पडून, झीज सोसून माणसें जोडावयाची असतात म्हणून पुष्कळाचें पुष्कळ सोसण्याची वृत्ति असावी. या वृत्तीनें पुष्कळ मित्र लाभतात. कोणाशी न जमणें व कोणीही मित्र नसणें हें करंटेपणाचे लक्षण होय! घरी नि बाहेर कसें वागावें यासंबंधीचे हें विवेचन ध्यानी घेऊन वागावें.

## प्रकरण १३ वें

# सुटी, सार्वजनिक कार्यें व संचार

विद्यार्थ्यांना आठवड्याच्या, पंधरवड्याच्या, परीक्षेच्या, सणाच्या आणि उन्हाळ्याच्या निमित्तानें एकदीड दिवसापासून तों दीडदोन महिन्यांपर्यंत अथवा अधिकही सुट्या असतात त्याचा उपयोग त्यांनी अभ्यास, आरोग्य, स्वच्छता, व्यायाम, सार्वजनिक कार्यें आणि प्रवास अशा विविध कार्यांत करून घ्यावा. साधारणपणें समजूत अशी कीं सुटी म्हणजे काही न करता आळस, अव्यवस्थितपणा, अनियमितपणा व गबाळपणा यात घालविण्याचा दिवस ! समाजातील लहानथोर सर्वच माणसें आणि विद्यार्थी रविवारची सुटी कशी घालविनात तें पाहिलें म्हणजे वरील विधानाची सत्यता पटते.

रविवारच्या सुटीचें देवक शनिवारच्या रात्रीत बसलेलें असते. कोणी रात्री बारा वाजेपर्यंत गप्पा, गाणें व खेळ खेळत बसतात. कोणी कसल्याही भिकार नाटक कंपनीला निदान बोलपटाला तरी आश्रय देतो आणि कोणीकडून शनिवारी रात्रीं जागरण होतें. उद्या काय सुटीच आहे या भरवशावर आदल्या दिवसापासून दीर्घिल्य येतें. मग काय विचारतां, रविवारी सकाळीं पहिल्या प्रहरीं केव्हा तरी निजून उठावयाचें, नंतर शौच, मुखमार्जन, चहा व जरा इकडे तिकडे होतेतों अकरा वाजतात ! मग जरा चक्कर मारून येऊन दोन प्रहरचें भोजन होतें. भोजनोत्तर थोडी झोप अवश्यच असते. त्यानंतर विद्यार्थीच असले तर ते थोडाबहुत अभ्यास करतात! सायंकाळीं चारपाच वाजले की कोणी तरी सवंगडी येतात, ते आले म्हणजे खेळ, गप्पा व क्वचित् फिरावयास जाणें यांत सगळा रविवार निघून जातो ! रविवार म्हणजे बेताल वागण्याचा दिवस, रविवार म्हणजे आयुष्यनाश व अव्यवस्थितपणा याच्या प्रदर्शनाचा दिवस असें न समजतां विद्यार्थ्यांनी सुटी म्हणजे वेगळ्या स्वरूपाच्या कामाचा दिवस आहे असें समजावें.

## कार्यांतर म्हणजे विश्रांति

मनुष्य म्हणजे कांही यंत्र नाही. माणसाने अगदी चरकात किंवा तुरुंगांत टाकल्याप्रमाणें वागणें हें शक्य व इष्ट नाही. माणसाला विश्रांति पाहिजे, व स्वातंत्र्यही पाहिजे, हें सर्व बरोबर आहे पण विश्रांति म्हणजे स्वस्थ बसणें, लोळणें, निजणें असे नसून **कार्यांतर म्हणजेच विश्रांति होय.** मनुष्य अगदी रिकामा असू शकत नाही. त्याला काही ना काही करावेंसे वाटतेंच. रोजच्या बांधलेल्या कामापेक्षा सुटीच्या दिवशी स्वेच्छेनें व हौसेनें निरनिराळीं कामें करणें म्हणजेच विश्रांति होय! म्हणून विद्यार्थ्यांनी आठवड्याच्या दीडदोन दिवसांच्या सुटीत कांहीं घरगुती कामें काढावीत. घरांतील बाग, पुस्तकें, कपडे, जनावरें, यांच्याकडे थोडें लक्ष द्यावें. मागें सातव्या प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें खोलीची, कपड्यांची, पुस्तकांची व इतर स्वच्छता करावी. जमल्यास दहापांच विद्यार्थ्यांनी बरोबर थोडें पाथेय घेऊन पायी अथवा सायकलीवरून एकादें रम्य स्थळ, एकादा डोंगर अथवा एकादें ऐतिहासिक स्थान पाहण्यास अवश्य जावें व सायंकाळी परत यावें. असा सबंध एक दिवस मोकळ्या हवेंत बाहेर काढल्यास गोष्ट हुषारी वाटते.

केव्हां केव्हां सकाळी एकदोन तास अभ्यास व स्वच्छता यांत घालविल्यावर विद्यार्थ्यांनी नदी, विहिरी, तलाव अशा ठिकाणी पोहावयास जावें. तास दीडतास पोहण्याची दमचक्की केल्यानें चांगला उपयोग होतो. नवा व्यायाम व मोटार हांकण्यास शिकणें, सायकलीवर बसणें, ड्रिल, कवाईत संघ व्यायाम करणें असेंही रविवारी सकाळी करावें. दोनप्रहरी भोजनोत्तर विद्यार्थ्यांनी आपापले जमाखर्च लिहावेत, पत्रें पाठवावीत आणि कांहीं वाचावें. सर्व विद्यार्थ्यांनी आपला जो विषय कच्चा असेल त्याचें एकदोन तास चिंतनिका करून सायंकाळी खेळावयास अथवा फिरावयास जावें किंवा घरचा बाजारहाट करावा. घरच्या माणसांना कांही काम करण्यास साहाय्य करता आलें तर तें उत्तमच.

विद्यार्थ्यांना मधून मधून ज्या कांहीं पांचसहा दिवसांच्या सुट्या मिळतात, त्या वेळीं त्यांनीं मागें राहिलेला अभ्यास वर्गाबरोबर आणावा. एकादा ग्रंथ सबंध वाचून काढावा, एकादा निबंध लिहावा, चारदोन दिवसांत एकाद्या

ठिकाणी जाऊन एकादें काम उरकतां येणें शक्य असल्यास ते उरकावें. गांवा-तील उत्सव, सभा, समारंभ असा कांहीं प्रसंग असल्यास त्यांतही भाग घ्यावा.

## सुटीचा योग्य उपयोग करा

सुटीच्या पूर्वी निश्चित कार्यक्रम ठरवून तो नेटानें पार पाडणारे विद्यार्थी जवळजवळ नसतात. सुटीमध्यें अमुक करूं, तमुक करूं असें म्हणणारे व सुटींत अभ्यास करण्याकरितां पुस्तकांचे ओझें घरीं नेणारे विद्यार्थी पुष्कळ आढळतात. पहिले चारदोन दिवस आज करूं, उद्यां करूं, असें करण्यांत जातात. पुढें कांहीं तरी काम निघतें. शेवटीशेवटी पुस्तकांची गांठ पडते आणि ठरविल्याप्रमाणे अभ्यास झाला नाहीं, सुटी फुकट गेली असे उद्‌गार निघतात! पुष्कळ शिक्षकांचा अनुभवही असाच आहे की सुटीमध्यें विद्यार्थी कांहीं अभ्यास करूं शकत नाहींत. रोजची टोचणी, रोजची विचारणा असते म्हणूनच अभ्यास होतो. · पुष्कळ पालकाच्या तोंडूनही असेंच उद्‌गार निघतात कीं मुलें बाहेर असली म्हणजेच ठीक असतात. तीं घरी आली की ना ताळ ना तंत्र! ना नियमितपणा ना वेळेला जेवण! केव्हां तरी उठणें, वाटेल त्या वेळीं अवेळीं खाणें, काही तरी खेळणें, गप्पा झोडणें, करमणूक, भाग पाडणें अशा दगांतच विद्यार्थी गर्क झालेले आढळतात. लहान मुलें तर सुटीच्या दिवशीं सगळें घरच डोक्यावर घेतात. चारपांच दिवस सुटी असली की घरच्या माणसांना केव्हा एकदां शाळा सुरू होईल असें होऊन जातें. प्रौढ विद्यार्थीसुद्धां आपल्या वागणुकीनें घरच्या माणसांना कंटाळा आणतात व स्वतः टीकेला पात्र होतात. सुटींतील बेताल वागण्यानें पुष्कळ विद्यार्थी आजारी पडतात. कुणाचें पोट दुखतें, कुणाचें डोकें दुखतें तर कुणाला ताप येतो. तात्पर्य, सुटीचा उपयोग विद्यार्थी चांगला करून घेत नाहींत

'नरदेहीचें आयुष्य क्षण। न मिळे देतां कोटी सुवर्ण।' म्हणजे एका क्षणाची किंमत फार मोठी आहे, हें सदैव ध्यानांत ठेवून नवयुगीन विद्यार्थ्यांनीं सुटीचा उपयोग उत्तम प्रकारानें करून घ्यावा. मग ती सुटी अर्ध्या दिवसाची असो, दीड दिवसाची असो वा दहापांच दिवसांची असो. प्रौढ आणि मध्यम विद्यार्थ्यांना उन्हाळ्याच्या सुटींत पुष्कळ काम करून दाखवितां येण्याजोगें आहे. मे महिना म्हणजे लग्नकार्याचे दिवस असतात.

आप्त, इष्ट, सोयरेधायरे याकडे लग्न, मुंज, कार्यप्रसंग यापैकीं कांहीं तरी असतेंच. अशा प्रसंगीं विद्यार्थ्यांनीं अंग मोडून काम करावें व पत्करलेलें काम उत्तम करून दाखवावें. कोणतेंही काम केल्याशिवाय साधत नाहीं.

केल्यानें होत आहे रे । आधीं केलेंच पाहिजे ।। रामदास

शिक्षित माणसांनीं न शिकलेल्या माणसापेक्षां कोणतेंही काम उत्तम व व्यवस्थित करून दाखविलें पाहिजे. कार्यप्रसंग, उत्सव, जत्रा अशा ठिकाणीं अनेक लोकांशीं संबंध येतो. कोणाशीं कसें वागावें हें त्यामुळें कळतें, आणि मनुष्यस्वभावाचें उत्तम ज्ञान होतें. या दीडदोन महिन्यांत विद्यार्थ्यांना थोडेंबहुत सार्वजनिक कार्यही करतां येण्याजोगें आहे. समाजाच्या हिताचें, समाजाला उपयुक्त असें कार्य जबाबदारीनें अंगावर घेऊन करण्याची सवय लहानपणापासून असावी. मोठमोठीं राष्ट्रकार्यें पुढें करावयाचीं असल्यास त्याचें बाळकडू लहानपणींच मिळालें पाहिजे, आणि सूक्ष्म दृष्टीनें पाहिल्यास विद्यार्थ्यांना अनेक सार्वजनिक कार्यें अभ्यास सभाळून करतां येण्याजोगीं आहेत.

विद्यार्थ्यांनीं विद्यार्थिदशेंत अभ्यास सोडून सर्वस्वी एका कार्याला वाहून घ्यावें, असें कोणी म्हणत नाहीं. परंतु अभ्यास सभाळून व अभ्यास म्हणूनच लहानसहान देशकार्यें करतां येण्याजोगीं आहेत. प्रौढ, मध्यम व बाल विद्यार्थ्यांनीं आपल्या संस्थेंतील लहानसहान कामें अंगावर घेऊन तीं पार पाडण्याचा अभ्यास करावा. हल्लीं शाळेला विद्यार्थीगृहें जोडलेलीं असतात. सहकारी दुकानें असतात. विद्यार्थ्यांच्या चर्चासंस्था, व्यायामसंस्था आणि लेखनसंस्था असतात. त्यांतील सर्व कामें आप्तांच्या व शिक्षकांच्या नेतृत्वा-खालीं करणें, हें एक देशकार्यच आहे. आपल्या विद्यार्थीगृहाचा अथवा क्लबाचा कार्यवाह होऊन बाजारहाट आणि इतर व्यवस्था करून तें काम चोख करावें.

सहकारी दुकान उत्तम चालवून स्वदेशी लेखनसाहित्य व स्वदेशी वस्त्रें यांचा प्रसार करावा. स्वयंसेवक दल, बालचर दल हीं उभारून त्यांचीं कामें करावींत. आपल्या व्यायामसंस्थेंतील सर्व तऱ्हेचीं कामें, वर्गणी गोळा करणें, मेळ्यांत भाग घेणें, मेळ्यांच्या सामन्याचे वेळीं काम करणें, अशीं कामें करावींत. हस्तलिखित मासिकाचा संपादक, चर्चासंस्थेचा कार्यवाह होऊन अथवा न होतांसुद्धां या कामांना पुष्कळ साह्य करतां येतें. हल्लीं गांवोगावीं

ग्रामपंचायतीपासून तों शहरांत निरनिराळी सार्वजनिक कार्यें चाललेली आढळतात. या सर्व कार्यांना स्वयंसेवक लागतात. विद्यार्थ्यांनी थोडे मनात आणल्यास त्यांना अशा कार्यांना पुष्कळ साहय करता येईल. वाचनालयें, ग्रंथालयें, यांची कामें आठवड्याच्या सुटीत अवश्य करावीत. ग्रंथ व वृत्तपत्रें व्यवस्थित ठेवणें, त्यांची नोंद करणें, वर्गणी जमा करणें, जमाखर्च लिहिणें, हीं लहान पण महत्वाची कामें केल्यानें आत्मविश्वास वाढतो. साम्प्रत दसरा, पाडवा, भाऊबीज अशा सणांच्या निमित्तानें आणि मोठमोठ्या कर्त्या पुरुषांच्या पुण्यतिथीच्या दिवशीं कांहीं द्रव्य–निधी जमविण्याची पद्धत पडू लागली आहे. अशा वेळीं विद्यार्थ्यांनी स्वयंसेवक म्हणून पुढें यावें, व हिंडून द्रव्य जमविण्याचें काम करावें. काही विद्यार्थी आपली खोली व आपली पुस्तकें या-बाहेर न पहावे अशा कूपमंडुक वृत्तीचे असतात. असले पुस्तककृमी आरोग्य, शिक्षण, धर्म, समाज आणि राजकारण या क्षेत्रातील आंदोलनांकडे पाहात नसल्यामुळें त्यांचें अहित होतें. राष्ट्रातील तरुण पिढीनें विविध कार्यांपासून स्वतःला अगदीं सोंवळें ठेवणें खरोखर अनिष्ट होय. विशेषतः हल्लीच्या जागृतीच्या काळांत विद्यार्थ्यांनी यात्रा, जत्रा, सभा, संमेलनें, राष्ट्रीय सभा, महासभा, समाजसभा अशा सर्व वेळीं स्वयंसेवक म्हणून जबाबदारीनें कार्य करण्यास पुढें आलेंच पाहिजे. विविध प्रकारची लहानमोठी सार्वजनिक कामें केल्यानें मनोवृत्तीला चांगलें वळण मिळतें व पुष्कळ माहिती मिळते.

## सार्वजनिक कार्यें व शिक्षण

सार्वजनिक कार्यांमुळें मनाचा उच्छृंखलपणा व उथळपणा जातो. इष्ट-कार्याविरुद्ध कोणी बोलला तरी सहनशीलतेनें ऐकून घेण्याची सवय होते निराश होण्याचे प्रसंग आले असतानाहि आशेचा किरण चमकूं लागतो. मनुष्यस्वभावाचें ज्ञान होतें. बोलघेवडा कोण, लबाड कोण, ढोंगी कोण, टिकाऊ माणसें कोणती, दमदार कोणती, आणि हे सर्व कसें ओळखावें याचें ज्ञान होतें. सर्वांचें हृदय समजावून घेऊन अधिक उणें न बोलतां व कोणाला न दुखविता प्रत्येकानी कसे मिळते घ्यावें व कार्य कसें साधावें हें अंगवळणी पडतें. स्वभाव मनमिळाऊ, उत्साही व कार्यतत्पर असा बनतो. कोणत्याही सार्वजनिक कार्याला जी एक स्वभाववृत्ति बनावी लागते, ती वृत्ति बनल्यावर सार्वजनिक

कार्याची पात्रता येते. अनेकांच्या ओळखीदेखी, अनेकांशी मैत्री यामुळें अनेक स्नेही जमतात. सार्वजनिक कार्याचें मुख्य भांडवल हेंच आहे. या भांडवलाला विद्यार्थ्यांनी अतिशय जपलें पाहिजे.

राजकारण म्हणजेच देशकार्य होय, असे नाही. देशकार्याचीं अंगें विविध आहेत. त्या सर्वांचा या ना त्या द्वाराने राजकारणाशी संबंध येतोच. राजकारणापासून अलिप्त असे कोणतेही कार्य असू शकत नाही. म्हणून विद्यार्थ्यांनी देशकार्य या दृष्टीने राजकीय हालचालींकडेही पाहिलें पाहिजे. राजकारण म्हणजे एक व्यवहार आहे. अभ्यासक्रम संपवून पदवी मिळविली की या व्यवहाराचें ज्ञान होते असे नाही. पाण्यात गेल्याशिवाय जसें पोहता येत नाही तसेच राजकारणांत पडल्याशिवाय खरे राजकारणही समजत नाही. विद्यार्थ्यांनी अभ्यास सोडून नित्याच्या राजकारणात मुळीच पडू नये. त्यांनी अभ्यास सभाळूनच राजकीय हालचालींकडे लक्ष पुरवावें. कारण आजचे विद्यार्थी हे उद्यांचे नागरिक असल्यामुळे त्यांना राजकारणाचें संपूर्ण ज्ञान पाहिजे.

विद्यार्थीदशेत विद्यार्थ्यांनी राजकारणाशी किती संबंध ठेवावा हा प्रश्न वादग्रस्त असून मोठमोठ्यामध्येंही मतभेद आहेत. तथापि एवढें खरें की अभ्यास पुरा झाल्यावर पूर्ण विचार करून राजकीय आखाड्यांत उतरावें, म्हणजे पश्चात्तापाचा प्रसंग येणार नाही. प्रसंगी राजकीय हुल्लड उठली की अभ्यास सोडूनसुद्धा तिला साह्य करावें, कारण हें कार्य नैमित्तिक असतें.

## खेडुतांची सेवा करा

जे विद्यार्थी खेड्यात राहतात, ज्यांचे उत्पन्न शेती भाती, देणें घेणें खेड्यात असून जे अभ्यासाकरिताच शहरात जातात त्यांना मे महिन्याच्या सुट्टीत खेडुतांची बरीच सेवा करता येईल. हल्ली ग्रामोद्धाराची चळवळ सर्वत्र पसरत आहे. शेती कशी करावी, बी कोणते वापरावें, ते कसे पेरावें, खते कोणती घालावीत, शेतातील जिन्नस केव्हा विकावेत, घर व गाव कसें स्वच्छ ठेवावें, सहकारी पतपेढ्या या कार्यक्षम कशा कराव्या, गावांतील उत्सव व जत्रा यांना आधुनिक स्वरूप कसें व कोणते द्यावें, खेडुताच्या धार्मिक वेडगळ समजुती कशा बदलाव्या, ग्रामसभा कशा चालवाव्या, साक्षरता कशी

वाढवावी आणि एकंदरींत प्रत्येक खेडें हें कार्यक्षम, स्वावलंबी आणि विनभाडखोर कसें करतां येईल या संबंधाची समाजांत पुष्कळच चर्चा चालू आहे. प्रौढ विद्यार्थ्यांनी आपल्या गावी येण्यापूर्वी एखाद्या विषयाचा थोडा अभ्यास करावा आणि सुटीचा एकदीड महिना खेडुतांच्या सेवेंत घालवावा. यामुळें खेडुत व शिक्षित यांमध्यें सहकार्य, विश्वास आणि प्रेमसंबंध उत्पन्न होतील. तात्पर्य विद्यार्थ्यांनी थोडा विचार केल्यास ही सर्व लहान पण महत्त्वाची देशकार्यें विद्यार्थीदशेंत करण्याजोगी आहेत, असे त्यांचें त्यांनाच दिसून येईल.

सार्वजनिक कार्य म्हणजे तें समाजाचें कार्य असतें. त्या कामाकरितां कोणी पैसे देत नसले म्हणून तीं बेशिस्तीनें व लहरीनें पाहिजे तशी करावीत असें मात्र नाही. वैय्यक्तिक कार्यापेक्षा सार्वजनिक कार्याचें महत्त्व अधिक आहे. हीं कार्यें उगाच पुढें पुढें होण्याकरिता, वृत्तपत्रांतील प्रसिद्धीकरितां, चार माणसांबरोबर फोटो निघावा म्हणून आणि प्रसंगी चार दिवस वहुवा झोडण्याकरितां करावयाची नसतात. तर ही सर्व कार्यें उच्च भावनेनें, शिस्तीनें कर्तव्यबुद्धीनें समाजहिताकरिता करावयाची असतात. पूर्वीपेक्षां कार्यें वाढली म्हणून शिस्तीचें बंधनही पाळलें पाहिजे. सार्वजनिक कार्याला शिस्त, संघटना व पद्धत यांची आवश्यकता आहे. चार माणसांनी ठरवून, वाटून घेऊन, मिळून मिसळून काम करावयास शिकण्याचे हे दिवस आहेत. पूर्वीचा काळ मी सांगतों तें ऐका, असें म्हणणाऱ्याचा होता; तर साम्प्रतचा काळ आपण सर्व ठरवू व त्याप्रमाणें वागू असें म्हणणाऱ्यांचा आहे. प्रत्येक माणसानें रोज थोडेंबहुत सार्वजनिक कार्य करावें; तें मी पत्करलें आहे, मला कर्तव्य आहे, मी तें उत्तम करीन अशा वृत्तीनेंच करावें. प्रत्येकानें आपापलें काम उत्तम केलें की सबंध काम उत्तम होतें. स्वतःवर सोपविलेलें काम उत्तम करून साधल्यास इतरांना मदत करणें असें ब्रीद असावें, अर्थात् या ब्रीदाचें बाळकडु विद्यार्थ्यांना बाळपणांतच मिळालें पाहिजे.

मंडळीच्या बाहेर राहून नावें ठेवणारी, स्वतः काही न करता टवाळी करणारी अशी माणसें आज फार आढळतात. मोठें काम होत नाही व लहान कामांत कमीपणा वाटतो, म्हणून कोणतेच काम न करणारे पठ्ठे गावोगांवी दिसतात. बहुतेक गावांत अगदी ठराविक माणसेंच सार्वजनिक कार्यें करणारीं दिसतात. या सर्वांचे कारण हेच की मेल्या पिढीला अशा तऱ्हेच्या लोकसेवेचें

वळण फार कमी होते. समष्टिधर्म, समाजकार्य, देशाभिमान, देशकार्य, हे सर्व विचार नवे आहेत म्हणून नव्या युगांतील या नव्या नागरिकांनीं विद्यार्थीदशेपासून थोडा तरी सार्वजनिक कार्याकडे आपला वेळ मोडावा. विशेषतः सुटीच्या दिवसात तरी शिक्षण या दृष्टीने सार्वजनिक विविध कार्यें करावीत. आतां सुटीचा उपयोग प्रवासाकडे कसा करावा हे सांगून हे प्रकरण संपवितो

*प्रवास हे एक ज्ञान मिळविण्याचें व मिळविलेलें ज्ञान पचविण्याचें मोठें* साधन आहे. प्राणिमात्रांची रीतिभाति प्रवासामुळेच समजते अनेक देश, रिवाज, लोक व समाज पाहिले म्हणजे बुद्धीला प्रगल्भता येते, व संकुचितपणा जातो. पाश्चात्य देशात विद्यापीठाकडूनच प्रवास करविला जातो. आपणाकडेही ती चागली चाल पडू लागली आहे. उदड देशाटन केल्याने उदड ओळखी होतात, अनेक मित्र जोडले जातात, नवे नवे पाहावयास मिळते, अनुकरणीय विभूति भेटतात, त्यामुळे बुद्धीचा शिणवटा जाऊन तरतरी येते, आत्मविश्वास वाढतो, व जोमाने एकादे कार्य करावे असे वाटते अनुकूल असल्यास वर्षातून काही दिवस तरी प्रवास अवश्य केला पाहिजे

अलीकडे विद्यार्थ्यांमध्ये सायकलीवरून प्रवास करण्याची प्रवृत्ति वाढत आहे, ती फार उत्तम आहे प्रवासाला निदान चार पाच विद्यार्थ्यांनी मिळून जाणे उत्तम. निघण्यापूर्वी स्वयपाक करणे, भाडी घासणे, पाणी ओढणे वस्त्रे धुणे, व जमल्यास पाहिजे ते करण्याचा थोडा अभ्यास करावा म्हणजे प्रवासात कुठेही नडत नाही प्रवासाला जाण्यापूर्वी ज्या भागात पाहावयास जावयाचे त्याची खडान् खडा माहिती पुस्तके, नकाशे यावरून मिळवावी. ज्या भागात जावयाचे तेथे मोठे गृहस्थ कोण आहेत, त्यांची परिचयपत्रें नडल्यावेळी उपयोग व्हावा म्हणून घ्यावीत. प्रवासास निघण्यापूर्वी सूचनापत्रे पाठवावीत. प्रवासात उगाच कोणालाही त्रास देऊं नये, जेवणे झोडीत बसू नये. हल्ली चारपाच विद्यार्थी अचानकपणे एकाद्यावर हल्ला करून ४।८ दिवस जेवणें काढीत बसतात हें वाईट आहे. त्यामुळें किंमत कमी होते. कोठेही गेल्यास भोजनाचा भार कोणावरही पाडूं नये. मुद्दाम बोलाविले तर अवश्य जावे. श्रीमंतानी पैसा खर्च करून खाणावळीत जेवावें. गरिबानी सरळ भिक्षा मागावी अगर मधुकरवृत्तीचा अवलंब करावा. मध्यम विद्यार्थ्यांनी

स्वहस्ते स्वयंपाक करीत सावकाश प्रवास करीत जावे. याचा अर्थ परिचित मित्र व इतर यांचा लाभ घेऊ नये असा नव्हे तर शक्य तो स्वावलंबी वृत्ति ठेवावी.

दररोज १०।१५ मैलाप्रमाणे पायी प्रवास करणे वाईट नाही १०।१२ विद्यार्थ्यांनी अशा पद्धतीने १५ दिवस प्रवास करावा सकाळी चालावे व दुपारी पहावे. लांबचा प्रवास असल्यास आगगाडीला पैसे दिलेच पाहिजेत. हल्ली मोटारींचीही सोय आहे. आर्थिक अनुकूलतेप्रमाणे ही साधने वापरावी. प्रत्येक प्रवासाचे अनुभव निरनिराळे येतात व त्यात काही हानिकारक नसते. पूर्वी म्हातारपणी केवळ धार्मिकदृष्ट्या यात्रेच्या निमित्ताने प्रवास करीत. परंतु सांप्रत विद्यार्थ्यांनी तरुणपणीच जुनी तीर्थे, क्षेत्रे, ऐतिहासिक स्थळे, राजकीय स्थळे. किल्ले, कोट, दुर्ग, नद्या, धबधबे, डोंगर, पर्वत, दरीखोरी इत्यादि सर्व झाडून पहावीतच, पण शक्य तर एखाद्या परदेशाचीही यात्रा करावी. परस्थ लोक आपल्या देशात येऊन अनेक दृष्टींनी निरीक्षण करितात, माहिती जमवितात; अनेक ठिकाणांचे व प्रकाराचे फोटो घेऊन जातात त्या दृष्टीने विद्यार्थ्यांनी प्रवास करावा.

सांप्रत बेकारीचा प्रश्न दत्त म्हणून उभा आहे अशा वेळी विद्यार्थ्यांनी एखाद्या दुकानाचा फिरता अडत्या या नात्याने विविध प्रांतात प्रवास करावा. व्यापारीदृष्ट्या निरीक्षण केल्यास कोणता माल, कुठे, कसा व किती खपतो आणि खपेल याचीही कल्पना येते आणि पुढे ज्यांना या धंद्यात पडावे लागते त्यांना या शिक्षणाचा पुष्कळ लाभ होतो.

तीर्थे व पवित्र स्थाने पाहतांना त्या स्थानाचा पूर्वेतिहास पाहावा व सद्यःस्थितीशी तुलना करून हल्ली पावित्र्य का व कसे बिघडले आहे, लोक अनाठायी द्रव्य कसे घालवितात, क्षेत्रस्थ लोक कसे लुबाडतात, धर्मभावनेचा दुरुपयोग कसा होत आहे लोकांच्या या धर्मभावनेला काही निराळे वळण देता येईल काय, अशा विविध दृष्टींनी तीर्थे, क्षेत्रे व पवित्र स्थाने यांचे निरीक्षण करावे.

ऐतिहासिक स्थळांचे दर्शन तर फारच महत्त्वाचे असते जुना इतिहास नव्यांना स्फूर्ति देतो. अयोध्येस जाऊन रामाचे अवशेष व मथुरेस जाऊन श्रीकृष्णाची विविध स्थाने बारकाईने व स्वतंत्र बुद्धीने पाहण्याचा यत्न करावा.

दिल्लीला तर कित्येक मनन्राचा इतिहास घडला आहे. विजयानगर येथे दक्षिणेंतील सर्व राज्यसूत्रें हल्त असत उज्जयिनी, विजापूर, लाहोर, लखनौ, पाटणा, काशी या ठिकाणींसुद्धा इतिहासाची घटण घडलेली आहे. निरनिराळे किल्ले म्हणजे मोठे ऐतिहासिक पुरुषच आहेत म्हणून महाराष्ट्रांतील महत्त्वाच्या किल्ल्याकडे विद्यार्थ्यांनी मोर्चा वळवावा तात्पर्य, येवढेंच की विविध दृष्टींनी अनेक ठिकाणीं जाऊन पाहून आलें पाहिजे.

ज्यांना समाजाच्या विचाराचें व भावनांचें शोधन कर्तव्य आहे; त्यांनीं तर पुष्कळच प्रवास केला पाहिजे संन्याशानें एका ठिकाणीं तीन दिवसच राहावें व ब्राह्मणानें एका ठिकाणी सतत राहू नये, महतानें उपाधींत गुंतू नये, असे जें पूर्वी म्हणत त्यातील आशय हाच की पाण्यातील तेलाच्या बिंदूप्रमाणें बुद्धि प्रसरणशील व्हावी. कारण लोकांना वरचेवर सांगणें व सांगितल्याप्रमाणें ते वागतात किंवा नाहीं हें पाहणें अशा दोन्ही कामांकरितां प्रवास लागतो. तात्पर्य विद्यार्थ्यांनी सुटीमध्यें सवडीप्रमाणें प्रवास करावा येवढें सांगून हें प्रकरण पुरें करतों.

---

## प्रकरण १४ वें

# राष्ट्रकार्यसाधक वृत्ति

कोणत्याही कार्याची योग्यता त्या कार्याचा पसारा व कार्याचें फल यांपेक्षां तें कार्य करण्याच्या मुळाशी जी वृत्ति, जो भावना व जो हेतु असतो, त्यावरून ठरवावयाची असते. अत्यंत शुद्ध हेतु, सद्धेतु, निरभिलाष वृत्ति ठेवून जें कार्य केलें जातें त्याची योग्यता केव्हांही श्रेष्ठ ठरते गेल्या पांच शतकांत बृहन्महाराष्ट्रांत व हिंदुस्थानात विविध देशकार्ये उपस्थित झाली असून त्यामध्यें हजारो कार्यकर्ते जिवापाड मेहनत करीत आहेत. स्वदेशी बहिष्काराच्या

चळवळीपासून तों निर्बंधभंगाच्या आंदोलनापर्यंत ज्या चळवळी झाल्या त्यांचा आढावा घेतल्यास असें दिसेल कीं देशकार्य करण्याला अथवा कोणतेंही सार्वजनिक कार्य करण्याला जी एक वृत्ति लागते ती अद्याप उत्पन्न झालेली नाहीं. पाव शतकाचा कालखंड म्हणजे कांही लहानसहान नाहीं. या काल-खंडांत जग पुढें गेलें, जगाबरोबर हिंदुस्थानही आणि हिंदुस्थानाबरोबर अखिल महाराष्ट्रही पुढें खेचला गेला यांत शंका नाहीं. या कालखंडात सगुण स्वराज्याच्या कल्पना आल्या, देव नि धर्मविषयक कल्पनांचें शोधन झालें, शास्त्रीय शोधामुळें अनेक क्षेत्रांतील कुतूहल नष्ट झालें, हें सर्व खरें। तथापि राष्ट्रोन्नतीचा मार्ग आक्रमणाऱ्या साधकाची वृत्ति कशी पाहिजे, साधकानें त्या मार्गानें जातांना बरोबर केवढी शिदोरी व कोणतें ओझें जवळ बाळगावें, अशा सर्व प्रश्नांचें विवेचन आत्मनिरीक्षणपूर्वक करण्याची वेळ आली आहे; म्हणून प्रस्तुत प्रकरणात राष्ट्रकार्यसाधक वृत्तीचा विचार करतों.

'आत्मा वा अरे द्रष्टव्यः'

असें वेदांतशास्त्र सांगतें. लोक, समाज आणि राष्ट्र पाहून देशकार्येच्छूंनीही आत्मनिरीक्षण केलें पाहिजे.

देशकार्य म्हणजे कपिलाषष्ठीसारखी एकादी पर्वणी नाहीं कीं, जी साधण्याकरितां घाई केली पाहिजे. देशकार्य हा नित्याचा व्यवहार आहे. राजकारण म्हणजे तर मोठा गुंतागुंतीचा, चिकट व चामट असा व्यवहार आहे. राजकारण म्हणजे कांही तुमुल युद्ध नव्हे. युद्धसुद्धां दमादमानें व धिमेपणानेंच करावें लागतें. म्हणून कार्येच्छूनीं विद्यार्थीदशा संपली, स्वभावांत गांभीर्य आलें, परिस्थितीचें आणि आपल्या बुद्धीचें व शक्तीचें नीट आकलन झालें म्हणजे सार्वजनिक कार्याला वाहून घ्यावें. अभ्यास मध्येंच सोडून अर्धवट स्थितीमध्यें कोणत्याही कार्यांत सर्वस्वी पडणें धोक्याचें आहे.

तारुण्यात भावना जोरदार असते. भावनेचा प्रबळपणा हा कार्यसिद्धीला कारणीभूत होतो यांत शंका नाहीं. तथापि हुक्कीसरशी भरी भरणें, हुल्लडीनें हुरळून जाणें, वृत्तपत्रात नाव दिसलें कीं समाधान मानणें ही वृत्ति केव्हांही कनिष्ठ प्रतीची होय। उथळवृत्तीनें, कच्चेपणानें कार्य आरंभिलें तर कार्यनाश होतो. कोणतेंही कार्य करण्याला अधिकार लागतो. अधिका-

नील दुसरी एकादी व्यक्ति पुढें येईल व ते कार्य करील, आपल्यावाचून कांही अडणार नाहीं, अशी वृत्ति ठेवावी; म्हणजे कार्यसिद्धि होते व कर्त्यालाही त्यापासून सात्त्विक सुख लाभते. याविषयी नवयुगीन तरुणांनी आमच्या "गीता प्रदीपातील निमित्तप्रदीप हें प्रकरण काळजीपूर्वक वाचावें"

तरुणांनी अशा तऱ्हेची वृत्ति ही एकदम येईल असें समजू नये. कार्य करताकरतांच ही वृत्ति बाणते. देशकार्य करण्याची जशी घाई करूं नये, तशीच दिरंगाईही करू नये. *अद्याप मी फार कच्चा आहे, अधिकार यावयाचा आहे, वृत्ति बनवावयाची आहे असें समजून जो वाट पहात बसेल, त्याला कार्याची संधि कधीच मिळणार नाही.* गेल्या पिढींतील कांही माणसें बराचसा पैसा, मानमान्यता, मातबंडें यांची प्राप्ति झाल्यावर देशकार्य करूं असें म्हणत होती. परन्तु ही हाव कधींच थांबत नाहीं. म्हणून नेहमी कांहीतरी समाजकार्य करण्याची वृत्ति ठेवली पाहिजे. कार्य करताकरताच वृत्ति बनत असते.

## याचा, पैसा पाहिजे

आजचें सगळें जग हें अर्थप्रधान आहे. Every man has his own price या म्हणीप्रमाणें प्रत्येक माणसाची किंमत पैशावर मोजली जाऊं लागली आहे. माणसाच्या गरजा, सुखसाधनें व आकांक्षा वाढल्यावर पैशाला महत्त्व येणार हें सहजच आहे. राजकारणांत, समाजकारणांत, धर्मकारणांत जेथें तेथें पैशाला मान आहे. घरपट्टी भरणाऱ्याशिवाय म्युनिसिपालिटींत मत नाहीं, इतकी राज्यांत आणि संस्थानांतही जी विधिमंडळें आहेत, तेथेंही आठ रुपयांपासून कर देणाऱ्यालाच मताचा अधिकार आहे. मोठ्या शास्त्र्याला व पंडिताला मत नाहीं. प्राप्तीवरील कर भरणाऱ्याला मताचा हक्क आहे. कोणत्याही सार्वजनिक सभेंत, राष्ट्रीय सभेंत पैसे पुष्कळ देणाऱ्याला पुढची खुर्ची मिळते. फार काय पण शंकराचार्यांच्या मठामध्ये सुद्धा अधिक दक्षणा देणाऱ्याचाच मान सांभाळला जातो विद्या, कर्तृत्व व त्याग यांस मान असला तर तो पैशाच्या खालोखाल आहे पैसा असला म्हणजे *या सर्व गुणांना शोभा येते, व तो नसला म्हणजे कोणीसुद्धा विचारीत नाहीं.* अशीच वस्तुस्थिति आहे.

कारण ही वृत्ति आसुरी होय! राष्ट्रविमोचनालासुद्धा दैवी संपत्तीचीच आवश्यकता आहे.

### बहुमताला मान द्या

कोणत्याही सार्वजनिक कार्याला आज जो एक गुण अवश्य हवा तो म्हणजे बहुमताला मान देणें होय! बहुमताला मान देऊन म्हणजे समष्टीला मान देऊन, व्यक्तीनें आपली मतें बाजूस ठेवून उत्साहानें काम करण्याचा गुण आपल्या समाजात नाहीं. आपल्या समाजांत एकांडे शिलेदारी व प्रतान विरोध झाला की भांडणें, ही फार घातक प्रवृत्ति आहे. नव्या कार्येच्छूंनी हे ध्यानांत ठेवले पाहिजे कीं कोणतेंही समाजकार्य ठरविताना वाटेल तेवढी चर्चा करावी, मतभेद मांडावे व तीव्र विरोधही दाखवावा. पण त्यानंतर बहुमतानें जे ठरेल त्याला तितक्याच उत्साहानें पुष्टि देऊन कार्य केलें पाहिजे. समजा, बहुमतानें युद्ध पुकारलें, युद्ध पुकारू नये असें जरी आपलें मत पूर्वी असलें, तथापि बहुमतानें युद्ध करण्याचें ठरविल्यावर खांद्यावर बंदुक टाकून स्वतः युद्धास तयार झालेंच पाहिजे. याच गुणानें जगांतील इतर राष्ट्रें उत्कर्षास पावत आहेत. अर्थात् याच्याच अभावी आमचें राष्ट्र अधोगतीस जात आहे. शिक्षणसंस्था, व्यापारी पेढ्या, कारखाने, बँका या सर्वांमध्यें जो ऱ्हास होतो, याचें कारण बहुमताला मान देण्याची शिस्त नाहीं हे होय! एकाद्याचा मतविरोध झाला की फार तर त्यानें बाहेर पडावें व दुसरें कार्य सुरू करावें पण स्थिति अशी होते की असा फुटून गेलेला मनुष्य दुसरीकडे जाताच पूर्वीच्या कार्याचा नाश करण्याच्या उद्योगास लागतो संस्थेंतून बाहेर पडलेला मनुष्य आपल्याच संस्थेच्या नाशाचा उद्योग करू लागतो, कारखानदार पूर्वीच्या कारखान्याला बुडविण्याची इच्छा करतो आणि यामुळें सर्वच मरतात.

एकत्र कुटुंबातही हाच दुर्गुण दिसतो. एकत्र कुटुंब म्हणजे एकत्र राहणें नसून सर्व कुटुंबाची एक मिळकत ठेवणें, ती वाढविणे, हे होय! समजा एका कुटुंबात चार बंधू आहेत. त्यांनी जमत नसेल तर खुशाल वेगळें राहावें. पण सर्व कुटुंबाची मिळकत सर्वांनी सांभाळावी, वाढवावी आणि श्रमाप्रमाणें पगार घेऊन ही संस्था बहुमतानें ठरेल त्याप्रमाणे जगवावी पण आमच्या

कुटुंबात ही वृत्ति दिसत नाही, तीच आमच्या समाजातही दिसत नाही. इतर देशांत मात्र यापेक्षा निराळी स्थिति आहे.

शिवाजी महाराज जन्मले, त्या वेळची बँक म्हणजे अद्याप इंग्लंडमध्यें आहे. शिवाजीनें सुरत लुटले त्याच वेळी एक किराण्या मालाचें दुकान इंग्लंडला स्थापन झालें! त्याचा त्रिशत सांवत्सरिक उत्सव काहीं वर्षांपूर्वी साजरा झाला. लहानसहान दुकानेसुद्धा इतरत्र शतशतकें चालतात पण आपल्याकडे कुटुंबात व समाजातही याच्या उलट होते, याचे कारण बहुमताला मान देण्याची वृत्ति आपल्यामध्ये नाही हेच होय!

इतर देशांत प्रथम एकटा मनुष्य कार्यारंभ करतो व नंतर तो अनेक भागीदार जोडून कार्याला शेंकडो संरक्षक निर्माण करतो, त्यामुळे त्या संस्था चालतात. आपल्या इकडे प्रथम द्रव्य एकत्र करण्याकरिता भागीदार शोधले जातात व जरा जम बसल्यावर एकमेकांस बुडविण्याचा यत्न सुरू होतो. सख्खे भाऊसुद्धा पक्के दाईज होतात, याचे कारणही हेंच आहे. सामायिक कार्य, सामायिक भांडवल, सामुदायिक संस्था हे मुख्य अंग, व व्यक्ति व व्यक्तींचें अस्तित्व अंशी समजून पाहिजे. सर्व व्यक्तींनी मिळून कार्याचा विचार करावा. पण शेवटी आपले मत निराळे असले तरी बहुमताला मान द्यावा हेच याचें सार होय!

गेल्या निर्बंधभंगाच्या आंदोलनात अनेक तरुणांनी मोठा त्याग केला. पण या त्यागी तरुणांनी पुढें आपल्या गावोगावी येऊन केले काय तर जुन्या कर्त्या पिढीचा उपमर्द केला, आणि दुही माजविली! अनेक कारणामुळे जे सत्प्रवृत्त लोक शांतिसंग्रामांत प्रविष्ट झाले नाहीत, त्यांना देशद्रोही म्हणणें म्हणजे त्यांच्या आजवरच्या कामगिरीविषयी कृतघ्नपणा दर्शविणे होय! नव्या आंदोलनांत नव्या पिढीनेच पडावयाचें, पण जुन्याविषयीं कृतघ्नबुद्धि ठेवणे हा असमंजसपणा होय. चार रुपड्याचा त्याग केला, चार महिने तुरुंगाची हवा खाल्ली, म्हणजे काही गंगेंत घोडे न्हाले असे नव्हे. एवढ्यामुळें सद्‌गुणसंपन्नता येत नाही. झालेलें कार्य काहीच नव्हे, अद्याप पुष्कळ कार्य व्हावयाचे आहे, या वृत्तीनें अंगीकृत कार्याचे संगोपन व वर्धन करणें हेंच खऱ्या कार्यकर्त्याचें लक्षण आहे.

## दुसऱ्यावर विसंबून कार्यप्रवृत्त होऊं नका

नवकार्यकर्त्यांनीं कोणाही पुढाऱ्यावर फाजील विश्वास ठेवून कार्य प्रवृत्त होऊं नये. कोणतीही चळवळ निघाली की तिला यशस्वी करण्याकरितां पुढारी तरुणांना आव्हान करीत असतात. याचा अर्थ मात्र असा नव्हे की ते पुढारी पुढे तरुणांची सर्वस्वीं जबाबदारी घेण्यास सिद्ध असतात! व ते अशक्य आहे. आंदोलन करणें, चळवळ उठविणें एवढेंच त्यांचें ध्येय असतें. म्हणून कोणत्याही आंदोलनांत समाविष्ट होण्यापूर्वी तरुणांनीं स्वतः पूर्ण विचार करूनच त्यांत पडावें. म्हणजे पुढें पुढाऱ्यांच्या नांवानें बोटें मोडण्याचा प्रसंग त्यांचेवर येणार नाही. राजकारणाची गति ही नेहमीं कुटिल असते. तिच्या अनुरोधानें पुढाऱ्यांना वागावें लागतें त्यामुळें विसंगतपणाही उत्पन्न होतो. पण त्याला नाइलाज आहे! नवकार्यकर्त्यांनी याचा पूर्णविचार करावा.

महाराष्ट्र हा बुद्धिमान देश आहे. भावनाप्रधान आणि भावडा असा प्रांत नाही. तीक्ष्ण बुद्धीमुळें अनेक प्रामाणिक मतभेद हे व्हावयाचेच. तल्लख बुद्धींतून विचाराचे जोरदार फवारे कारंज्याप्रमाणे उडले तरी कोणताही विचार कृतीत आणावयाला भावनेचा दमदारपणाही अवश्य आहे. हा दमदारपणा कमी असल्यामुळें महाराष्ट्रांत मतभेदाच्या सिका-बरोबर वैयक्तिक मत्सराचें पीकही वाढू लागलेलें आहे. मत्सर व अनुदारता हे महाराष्ट्रियांचे दोन मृत्युतुल्य दुर्गुण आहेत या दुर्गुणामुळेंच महाराष्ट्राबाहेर महाराष्ट्रीय आक्रमण करूं शकत नाहीत. याशिवाय यावज्जीव झिजवून दोनदोन तपें काम केलेले पुढारीसुद्धा मतभेद होतांच आपल्या मित्रा-वर देशद्रोहाचा आरोप करून वाटेल तसे अनुदार बोलतात, हें अत्यंत लाजिर-वाणें आहे. मित्र, सहकारी, गुरु, उपकारकर्ते, अन्नदाते, असे कोणीही असले तरी मतभेद होताच या सर्वांसंबंधी वाटेल ते लिहिण्याची व बोलण्याची घातक प्रवृत्ति दिसून येते. तरुणांनीं हे मागच्या पिढीतील दुर्गुण त्या पिढीबरोबरच गाडले पाहिजेत मला स्वतःला जशी बुद्धि आहे, तशीच दुसऱ्यालाही आहे. मी व माझा पक्ष जेवढा शहाणा, तसाच माझा मित्र व त्याचा पक्षही प्रामाणिक नाही काय? सर्व सद्गुणाचा व कार्याचा मक्ता आपल्याच पक्षाला दिला आहे काय? आपल्या विरुद्ध पक्षानेंही त्यागी, धोरणी, आणि कर्ते असे लोक

नाहीत काय ? हा सर्व विचार उदार वृत्तीने कार्यकर्त्यांनी करावा म्हणजे शत्रुत्व वाढणार नाही, कार्याची हानि होणार नाही व त्याचा लाभ परक्यांना मिळणार नाही. आजचे राजकीय पक्ष मोठे हटवादी आहेत. वहून हट्ट केला की तेथें तट पडतात! हे तट एकमेकांचा पाडाव करण्यात गुतले की कार्य बाजूलाच राहाते ही पूर्वपरंपरा नव्या कार्यकर्त्यांनी विच्छिन्न केली पाहिजे.

मतभेद हा बुद्धीचा धर्म असला तरी मतभेद म्हणजे निराळ्या कामाची हौस असाच खरा अर्थ आहे. प्रत्येक मनुष्याला कार्यक्षेत्र लागते आणि महत्त्व व सत्ता ही हवी असते. एका क्षेत्रात रावांना हे अशक्य असते. म्हणून कार्यकर्त्यांनि माणसाची नैसर्गिक प्रवृत्ति विसरता कामा नये. पिता व पुत्र, बंधु-बंधु, सासवा व सुना यांमध्ये खटके जे होतात त्याचे कारण कर्तृत्वाची कुचंबणा, कार्यक्षेत्राचा अभाव, आणि सत्ता व महत्त्व याची हाव हे होय! पुढारी व अनुयायी, शहरचे पुढारी व खेड्याचे पुढारी या सर्वांची यासाठीस यामुळेच होते हा मनुष्यस्वभाव लक्षात घेऊन सर्वांनी एकमेकांशी उदारबुद्धीने वागले पाहिजे.

मनुष्य कोठेही असो, तो कोणतेही लहानमोठे कार्य प्रामाणिकपणें जर करीत असेल तर त्याची योग्यता थोर आहे असे समजावें व त्याचा गौरव करावा विशेषत. या लोकशाहीच्या काळात आपण सर्व बरोबरीचे आहोत, सर्वांची योग्यता सारखी असे समजून सर्वांना सारखे वागवावे भविष्य काळच्या कार्यामध्ये सर्वांचा संबंध आहे, सर्वांचे साह्य हवें म्हणून समाजातील खालच्या थरापासून तों वरच्या थरापर्यंत सर्व कार्यकर्ते एका सूत्रांत गोवून घ्यावेत उपमर्दकारक वृत्ति आणि तुच्छता ही औषधालाही दिसता उपयोगाची नाहीत

## मतभेद म्हणजे कार्यांतराची इच्छा

मतभेद म्हणजे निराळ्या कार्याची इच्छा हे ध्यानात ठेवले की मत्सराचे कारण उरत नाही. सबंध देश मोकळा आहे, अनेक कार्ये पडली आहेत, कामाचा सुकाळ असून माणसाचा दुष्काळ आहे, हे अक्षरश. खरें आहे आधी मतभेद, पुढें अनुदार भाषा व त्यापुढे शत्रुत्व ही जी परंपरा आज दिसते ती अनिष्ट आहे. महाराष्ट्रांतील प्रत्येक संस्थेत, कारखान्यात,

पेढ्यामध्ये व पक्षामध्यें जीं भांडणें आढळतात ती यापुढे समूळ नष्ट झाली तर उत्तम, निदान तीं सभ्यपणे तरी चालविली पाहिजेत. भांडणें वृत्तपत्रात आणणें म्हणजे वेशीवर उभें राहून ओरडा करण्याइतकेंच मूर्खपणाचे आहे. गेल्या पाव शतकांत शिस्त, संघटना आणि संस्थात्मक जीवन हे आपल्या समाजांत थोडेंबहुत आले आहे. पण पुढच्या पिढीनें संस्थाची निर्मिती करुन यंत्राप्रमाणे बिनबोभाट कार्य करण्याची सवय लावून घेतली पाहिजे. इंग्रजांच्या राजकीय व इतर संस्था जशा यंत्राप्रमाणे बिनबोभाट चाललेल्या दिसतात, कोणी आला, गेला, मतभेद झाला तरी या कानाचे त्या कानाला न कळू देता त्याचें जसें सर्व चालते तसेंच आपणही चालविलें पाहिजे

बृहन्महाराष्ट्रांत ज्या शिक्षणसंस्था व व्यायामसंस्था चालू आहेत त्यामध्यें एक धार्मिक शिस्त येऊं लागलेली आहे. अशा संस्थातील कार्यकर्ते पैसा, लौकिक, चैन, विलास यासंबंधीच्या आशा दूर करूनच कार्य करीत आहेत. कोणतेही सार्वजनिक कार्य म्हणजे खूप पैसा मिळविण्याचें साधन आहे असें मुळींच समजूं नये. आधीं राष्ट्र दरिद्री, त्यांत अनेक सार्वजनिक कार्यें, त्यांना साहाय्य करणारे टराविक आश्रयदाते, अशा स्थितीत सार्वजनिक कार्याच्या निमित्ताने हातीं येणारा पैसा जपूनच वापरला पाहिजे राष्ट्रात बेकारी वाढलेली, पदवीधर व वकील यांची रेलचेल झालेली अशा स्थितीत पन्नास पाऊणशें रुपयावर आज जे अनेक कार्यकर्ते काम करीत आहेत ते आर्थिक दृष्ट्या मोठासा त्याग करतात असे मुळीच नाही. प्रपंचापुरेसें द्रव्य घेऊन काम करणें हा अगदीं अल्प त्याग आहे. पण जे सामुदायिक दुर्गुण म्हणजे मत्सर, अनुदारता, एकांडे शिलेदारी, फाजील निस्पृहता इत्यादि जे सर्वत्र भारखे आज दिसतात त्याचा त्याग खरोखरी केला पाहिजे, अर्थात् हाच खरा त्याग होय! पांचवीला पुजलेले दुर्गुण टाकून इतर प्रांतीयाशी मैत्री, स्नेह, सहानुभूति आणि आपलेपणा वाढवून कार्य करण्याचे हे दिवस आहेत. महाराष्ट्रीय हे तुसडे, दुसऱ्याला न मोजणारे, फटकून वागणारे, इतर प्रांतांना बिलकुल महत्त्व न देणारे, अप्रामाणिक असा जो दुर्लौकिक क्वचित् ऐकावयास येतो, तो नव्या कार्यकर्त्यांनी घालविला पाहिजे. यापुढें जाहिरातीचें व वर्तमानपत्री देशकार्य नाही. राजकारणसुद्धा अधिक खोल खोल जात आहे. अशा वेळेला लोकैषणा, द्रव्यैषणा, बाजूस ठेवून आपल्या स्वभावास व विद्वत्तेस-

साजेसें कोणतेंही आवडीचें कार्य सतत करीत राहणें, हेंच खरें देशकार्य आहे. जो स्वत:ला विसरून शास्त्र, शेतकी, संशोधन, व्यायाम, राजकारण, व्यापार, भाषा, धर्म, समाज अशा विविध क्षेत्रांत कोणतेंही लहानमोठें कार्य करतो, तोच खरा देशभक्त होय. मग त्याचें नाव व फोटो वृत्तपत्रांत येवो वा न येवो, तो राजकारणाच्या पक्षांत असो वा नसो, त्याची पर्वा नाहीं गीतेंतील सात्त्विक कर्ता हाच होय. अर्थात् हीच वृत्ति देशकार्याला साधक आहे

---

## प्रकरण १५ वें

# देव, धर्म, नीति व संस्कृति

सांप्रत नवयुगाला प्रारंभ झालेला आहे जुन्या युगांतील जीर्ण विचार जात आहेत व ते अवश्य गेले पाहिजेत. तथापि कोणत्याही युगांत समाज व राष्ट्र यांच्या जीवनाला अत्यंत पोषक असे जे विचार असतात ते मात्र टिकाऊ भाग आहे हल्लीं रशियांतील विचाराचीं भाषांतरें इकडे चालली असून अपूर्ण विचारानें देव, धर्म, नीति, संस्कृति, हें सव झूट आहे, थोतांड आहे, ही एक अफूची गोळी आहे असें सांगण्यांत येऊं लागलें आहे त्याचप्रमाणें वेश्यागमन, मदिरापान, परस्त्रीसंभोग यांतही कांहीं वाईट नाहीं, असें कित्येक प्रतिपादूं लागलेले आहेत. शारीरशौच, अर्थशौच, मन पावित्र्य, ब्रह्मचर्य यांची टवाळी होऊं लागली आहे. या धूलिप्रक्षेपामुळें विद्यार्थ्यांच्या दृष्टीस मांद्य येण्याचा संभव आहे, म्हणून प्रस्तुत प्रकरणीं त्यासंबंधीं थोडें सांगावयाचें आहे.

### जगाच्या अंतापर्यंत देव आहे

जगांत देव आहे की नाहीं याविषयीं संशय दाखविणारे, परमेश्वर विसाव्या शतकांत मेला असें म्हणणारे अनेक वाग्वीर आजवर होऊन गेले; तथापि जगांत परमेश्वर आहे; याचें कारण ईश्वराच्या अस्तित्वाचा उदय

मानवी अज्ञानांतून होतो हे होय. अनेक सृष्ट चमत्कार मनुष्याने पाहिले, त्याला आश्चर्य वाटलें आणि या सर्वांचा नियामक कोणी तरी पाहिजे असे त्यानें ठरविले. जगातील सर्व व्यापार सुबद्ध, सहेतुक व सुयंत्रित दिसतात त्यावरुनही वरील अनुमान दृढ होतें. साक्षात् ईश्वर असा आजपर्यंत कोणीही पाहिला नाही. परंतु तो मूर्त असावा आणि अमूर्तही असावा असे तज्ञांनी अनुमानानेंच ठरविले आहे.

जगांत जसजसें ज्ञान वाढेल तसतसे ईश्वराचे शुद्ध स्वरूप ध्यानीं येईल. आज ज्ञानाची वाढ पूर्वीच्या मानाने पुष्कळ झालेली असली, तथापि अद्याप मानवी अज्ञानही पुष्कळच आहे. मृत्यूनंतर जीव नेमका कुठे जातो, स्थूल व सूक्ष्म शरीराव्यतिरिक्त जीव कसा आहे, आत्मा आहे की नाही, त्याचे स्वरूप कसें आहे वगैरे अनेक प्रश्न आधुनिक शास्त्रानाही सुटलेले नाहीत. तेव्हां ईश्वर नाही असें मानण्यापेक्षां तो आहे असें मानण्यालाच अद्याप भरपूर आधार आढळतात, म्हणून विद्यार्थ्यांनी आस्तिक्यबुद्धीनेच जगन्नियामक ईश्वराकडे पाहावें.

ईश्वर हा ज्ञानमय आहे. ईश्वराच्या विशुद्ध स्वरूपाचे ज्ञान ज्ञानाच्या प्रकर्षानेच होणार आहे. मनुष्यप्राणी ज्ञानशील आहे. यास्तव जोवर आपल्यापेक्षां श्रेष्ठ ज्ञानमय शक्ति आहे असे माणसाला पटते, तोवर त्या ज्ञानापुढें आपले डोकें तो नमवितोच. श्रीमत् शंकराचार्य व मंडनमिश्र यांच्या वादासंबंधाची एक आख्यायिका प्रसिद्ध आहे. श्रीमत् शंकराचार्यांनी बुद्धिमत्तेने व विवादकौशल्याने मंडनमिश्राला पराभूत केले. ठरल्याप्रमाणे मंडनमिश्राने संन्यास स्वीकारला. समुद्रकांठी वाळवंटात दोघे बसले असता काय आपले ज्ञान आहे, केवढी ही अगाध विद्वत्ता! अशी स्तुति ऐकताच शंकराचार्य हातांतील दंड समुद्रात बुचकळून व बाहेर काढून म्हणाले ' हे पहा, या अगाध समुद्राप्रमाणें विद्या आहे. या दंडाला जेवढा जलाचा अंश चिकटला आहे, तेवढाच या माझ्या अंत:करणावर विद्येचा संस्कार झालेला आहे, विद्येचे क्षेत्र फारच व्यापक आहे. हे ऐकताच मंडनमिश्राने ती नम्रता पाहून अभिवादन केले! तात्पर्य ज्ञान हें अगाध आहे. त्या ज्ञानाचे आकलन पूर्णत्वाने जोवर होत नाही, तोंवर जगात सर्व ज्ञानमय अशा ईश्वराविषयीं आस्तिक्यबुद्धि ही जगाच्या अंतापर्यंत राहणार!

ईश्वराचें विशुद्ध स्वरूप हिंदुधर्मातच तर्कशुद्धपणे सांगितले आहे. इतर पंथांमध्यें व सांप्रदायामध्यें ईश्वराविषयी कांहीं तरी ओबड धोबड विचार मांडले आहेत. पण ईश्वर हा ना सगुण ना निर्गुण असा अनिर्वचनीय आहे हेंच खरे आहे. उपासकांच्या कार्याकरिता निर्गुण ईश्वराला सगुण मानतात. तो दयाळु आहे, भक्तवत्सल आहे, आर्तांचा त्राता, वरदहस्त, कृपासागर, सर्वसाक्षी, सर्वशक्तिमान, हे सर्व गुण ईश्वराला सगुण मानूनच आरोपित करतां येतात. ईश्वराला सगुण मानल्याविना त्याची भक्ति संभवत नाहीं. समोर मूर्ति असो वा नसो, चर्च व मशिदीमध्यें कोणी मूर्ति ठेवो वा न ठेवो, पण उपासना करावयाची म्हणजे त्याला सगुण मानावेंच लागतें. म्हणून विद्यार्थ्यांनी आपल्या आवडीप्रमाणें प्रतीक, मूर्ति, चित्र, परमेश्वराचा प्रतिनिधि म्हणून उत्कृष्ट आदर्श पुढें ठेवावा व त्याचे गुण अंगीं यावेत म्हणून यत्न करावा.

रामकृष्णाच्या मूर्तींत देव नाहीं. चित्रें व फोटो यामध्यें टिळक, गांधी नाहीत, तर त्यामागें जी आपली प्रबळ भावना असते, त्या भावनेंतच देव व विभूति असतात. भावनेला कांहीं मर्यादित असे सामर्थ्य असतें म्हणून अशा प्रतीकाकडे शुद्ध भावनेने व गुणग्रहणदृष्टीनेंच पाहावें. मनुष्याला नेहमी स्वतःपेक्षा उच्च, आकर्षक, गुणवान् व श्रेष्ठ असा आदर्श लागतो. म्हणून मनुष्यमात्र आपल्या भावनेप्रमाणें कुठें तरी हें श्रेष्ठत्व प्रस्थापित करितो आणि सामर्थ्याची याचना करितो. यास्तव विद्यार्थ्यांनी नेहमी उत्कृष्ट आदर्श पुढें ठेवून त्याचें अनुकरण करण्याच्या हेतूनें स्मरण व चिंतन करावें.

माझ्या कर्माकर्माचें फळ ईश्वर देणार आहे. आज ना उद्या केव्हा तरी मी ईश्वराजवळ जाणार आहे ही भावना माणसाला मोठी प्रोत्साहक असते. यास्तव दररोज प्रातःकाळीं व सायंकाळीं ईश्वराची प्रार्थना अवश्य करावी. प्रातःस्मरण, उपासना, सामुदायिक प्रार्थना यांची समाजास व व्यक्तीस आवश्यकता आहे. केव्हांही प्रसन्न मन असेल त्या वेळीं कोणत्याही स्थितींत ईशचिंतन व स्मरण करावें. आत्मगुरु हे सर्वांमध्यें श्रेष्ठ आहे ; म्हणून चित्तप्रसाद, आत्मशुद्धि व मनःपावित्र्य याकरिता वैयक्तिक व सामुदायिक भजन, स्मरण, चिंतन केलें पाहिजे. ईश्वरासंबंधी अधिक विवेचन आमच्या गीताप्रदीपांत विद्यार्थ्यांनीं पाहावें असें सांगून आतां धर्माकडे वळतो.

समाजाला देवाप्रमाणें धर्माचीही सदैव गरज आहे. धर्म हा समाजाकरिता आहे, समाजाच्या अभ्युदयाकरितां आहे. धर्माने समाजाची धारणा व प्रभव ही साध्य केली पाहिजेत. आजपर्यंत हे असेच चालू आहे. मनुष्यप्राणी समाजशील आहे. समाजांत व्यक्तीला स्थान आहे. परंतु समाजस्वास्थ्याकरिता व्यक्तीला स्वतःचें स्वातंत्र्य मर्यादित करावें लागते व तें नियमन म्हणजेच धर्म होय. व्यक्ति व समाज यांच्या मनोवृत्ति, परस्परपोषक होऊन उभयतांचा उत्कर्ष साध्य करून देणारे जे नियम त्यांनाच धर्म म्हणतात. धर्म म्हणजे नयम, दैवी संपत्ति, शील, चारित्र्य यांची जोपासना व वाढ करणारी व्यवस्था असें म्हटल्यास कांही हरकत नाही. किंबहुना धर्म म्हणजे आत्मविकास, व्यक्तित्वाची वाढ व स्नेहाचें वर्धन होय. माणसाला धारणा, वृद्धि, संग्रह, सत्ता पाहिजे. यालाच धर्म, अर्थ, काम व मोक्ष असे पुरुषार्थ म्हणतात. पुरुषार्थसिद्धीचे नियम सांगणाऱ्या धर्माला अफूची गोळी असें जे म्हणतात तें अफूच्या तारेंतच बरळतात असें दिसतें. धर्माची अंगे आचार, नीति व तत्त्वज्ञान अशीं आहेत. आत्मा, ईश्वर, कर्म हे विषय तत्त्वज्ञानात मोडतात. अहिंसा, सत्य, अस्तेय हीं नीतितत्त्वें होत आणि चाली, रीती, रूढी, कर्तव्यें वगैरे सर्व आचारांत अंतर्भूत होतात.

आचारधर्म हा परिवर्तनशील आहे. तो वरचेवर बदलतो व पुढेंही समाजाच्या गरजेप्रमाणें तो अवश्य बदलावा. नीतितत्त्वे सापेक्ष असतात आणि तत्त्वज्ञानसुद्धां कालानुरूप बदलत आलेले आहे. धर्माचे हें असे सोज्वल स्वरूप ध्यानीं घेतलें तर धर्माला अफू म्हणणारे लोक खरोखरच वेडे दिसतात. रशियातील धर्म वेडयाचा होता म्हणूनच तो गेला. आपल्या धर्मातही कलि, शकुन, विटाळ, जन्मजात अस्पृश्यता व उच्चनीचता वगैरे जे वेडगळ व अनिष्ट प्रघात आहेत ते घालविले पाहिजेत यांत शंकाच नाही. वेडयाचा धर्म व धर्मातें वेड नष्ट करून धर्माचे विशुद्ध व सात्त्विक स्वरूप लोकांपुढे मांडले पाहिजे. धर्मामुळें लोक आळशी बनतात, हतप्रभ होतात असें नसून धर्माच्या खोटया कल्पनेमुळे तसें होतें. म्हणून तसला धर्म घालविलाच पाहिजे. परंतु मुळीच धर्म नको असें म्हणणें म्हणजे खोकला येतो म्हणून गळाच कापावा असें म्हणण्याइतपत समजस आहे. हे सर्व ध्यानांत घेऊन विद्यार्थ्यांनी धर्माचा विचार करावा. डोळसपणाने आचार

पाळावेत. परिस्थित्यनुसार परिवर्तन कोणते करावें हेंही ठरवावें आणि स्वधर्माचा अभिमान बाळगावा.

देव नि धर्म याची आवश्यकता विवेचिल्यानंतर समाजाला नैतिक बंधनाचें कारण काय असें विचारणेंच मुळी चुकीचें आहे. मनुष्याला जगण्याला जसें अन्न, पाणी व हवा इत्यादि पाहिजेत, त्याप्रमाणे त्याला नैतिक बंधनेंही पाहिजेत. खून करणे, चोरी करणें, खोटें बोलणें, व्यभिचार करणें, मद्यपान करणें हीं पंचमहापातकें होत, असें समाजधारणेंकरिताच म्हटलेलें आहे. धर्माचे व नीतीचे संस्कार हजारों वर्षे चालू आहेत. म्हणूनच माणसें एकमेकांना ठार मारीत नाहीत, प्रत्येकजण दुसऱ्याचे खिसे कापीत नाहीं, एकसारखा थापाडेपणा करीत नाही व दारूच्या धुंदीत पडत नाहीं ! नुसत्या राजसत्तेने वरील आसुरी वृत्तीला आळा घालणें अशक्य आहे. अमुक चांगलें आहे, त्याचें आचरण करावें म्हणजे सद्गति मिळते अशी शिकवणूक मारवी पाहिजे. म्हणून नीति नको, नीतिबंधनें झुगारून द्या असें जे सांगतात ते समाजाला भलत्या मार्गास नेत आहेत असें विद्यार्थ्यांनी समजावें. राजदंडाला चुकवून खून, चोऱ्या व व्यभिचार पचविता येतात; परंतु या वृत्तीनें समाजधारणा व शेजारधर्म मुळीच संभवत नाहीं. दुसऱ्याचा गळा युक्तीनें कसा कापावा, दुसऱ्याची स्त्री हिकमतीनें कशी पळवावी असा विचार करणाऱ्यानें आपणा स्वतःवर तो प्रसंग आल्यास काय होईल, याचाही विचार केला पाहिजे.

खरें बोलणें, ही साधी गोष्ट घेतली तर खरेपणामुळेंच नवराबायको-मध्ये, मित्रामित्रामध्यें प्रेम राहातें व उभयतांना सुख होतें. परस्पर विश्वास ही नीति व्यापारामध्यें केवढी सभाळावी लागते बरें ! पोस्ट, रेल्वे, टकसाळ अशा खात्यांत प्रत्येक व्यवहार कांहीं चिठ्ठीचपाटीनें लेखी होत नाही. सर्व गोष्टी विश्वासानें चालतात. प्रत्येक मनुष्य जर असा एकमेकाला फसवू लागेल व खोटेपणानें वागेल तर व्यवहार चालणार नाहीं, व खोट्या माणसाचें अनहितच होईल. मनुष्य स्वार्थासाठी खोटें बोलतो. पण तो त्याची लबाडी उघडकीस आली की त्याचा स्वार्थ साधत नाहीं. अशा माणसाला कोणी जवळ उभें राहू देत नाहीं. वास्तव स्वार्थ साधण्यास व सभावितपणानें जगण्यास दानत, सचोटी, प्रामाणिकपणा ही नीति लागते. व्यापारी तर धोतराच्या पदराखालीं हातावर आकडे लिहून पटकर्णी न बोलता तीं देवघेव नेमकी पुरी

करतात ! नोकराचें इमान, धन्याचा शब्द, कार्याची निष्ठा या सर्व गोष्टी नीतिमत्तेंतच मोडतात.

## स्वाभिमानानें जगा

स्वाभिमानाने जगणें हा एक नीतीचाच भाग आहे. जाज्वल्य स्वाभिमानामुळें कर्तव्यनिष्ठा येते व दुसऱ्याच्या श्रमावर जगण्याची लाज वाटू लागते. परावलंबन, पराश्रय, परभृतता हा मोठा दोष आहे. म्हणून विद्यार्थ्यांनी स्वाभिमानयुक्त स्वावलंबनानें जगण्याची पहिल्यापासून वृत्ति ठेवावी. अभ्यास म्हणा, काम म्हणा, वसल्याही बाबतीत कुणाचे मी बोलून घेणार नाही व कोणावर अवलंबून राहणार नाही, अशी वृत्ति विद्यार्थ्यांत पाहिजे. मी स्वकष्टावर विद्यार्जन करीन व द्रव्यार्जन करून चैनही करीन, अशीही भावना धरण्यास हरकत नाही. पण आजच्या विद्यार्थ्यांमध्ये जो अधःपात दिसतो तो हा की ते इतरांच्या पैशावर चैन करूं इच्छितात. एकदा ही वाईट सवय कॉलेजपासून लागली म्हणजे मग पैसा तर पुढें मिळत नाही, चैनीची चट तर लागलेली, अशा स्थितीत ही माणसें अधिक पतित होतात ! कोणी फुकट चहा दिला, कोणी सिनेमा दाखविला तर त्याच्यासारखें बोलण्याची वृत्ति मिधेपणामुळें येते. अर्थात् ना स्वाभिमान ना स्वकष्ट अशा स्थितीत अर्थपावित्र्य, शब्दपावित्र्य, आणि कार्यपावित्र्य हीसुद्धा राहात नाहीत

विद्यार्थ्यांमध्यें आज जी भोगलोलुपता दिसते ती अविवेकमूलक आहे. या अविवेकामुळेच त्यांचा अधःपात होतो. विवेक वाढण्यास व अधःपाताचा प्रतिबंध करण्यास स्वाभिमान हा गुणच वाढला पाहिजे. या स्वाभिमानांतील स्व हा इतका व्यापक आहे की त्यात स्वदेश, स्वधर्म, स्वसंस्कृति वगैरे सर्व येतात. म्हणून स्वच्या अभिमानानें जगणें हे एक मोठें नीतितत्त्व आहे.

कुटुंबसंस्था नको, वैवाहिक बंधन नको, संयम नको असें म्हणणारे लोक एक नंगे फकीर अथवा वेडे समजले पाहिजेत. समाजांत कुटुंबसंस्था पाहिजे, वैवाहिक बंधन पाहिजे. कारण त्याशिवाय सुप्रजा निपजणार नाही व तिचें संगोपनही होणार नाही. सुप्रजेचें सातत्य म्हणजेच राष्ट्र होय. स्वैराचाराने अभिजात वर्ग नष्ट होईल, आणि राष्ट्र मृत्युमुखी पडेल. स्त्रीपुरुषांनी विवाहबद्ध होऊन परस्परांशीं विश्वासानें वागणें, याचेंच नांव एकपत्नीव्रत

व एकपतिव्रत. या निष्ठेनेंच सुप्रजा उत्पन्न होते व तिच्या संगोपनाकरितां द्रव्याचा संग्रह अवश्य असतो. रशियातील सर्व विचार हल्ली बदलत चालले आहेत व तें प्रयोगावस्थेमध्यें आहेत. म्हणून विद्यार्थ्यांनी विद्यार्थीदशेंत त्या विचारांना मुळीच स्थान देऊं नये आणि नीति, सदाचार, चारित्र्य, शील यांचाच अभ्यास करावा. अहिंसा, सत्य, अस्तेयादि तत्त्वे सापवाद आहेत. कारण आततायी दुष्टाचा वध अवश्य करावा, चोराशी कधींही खरें बोलू नये, प्राण जात असेल तर चोरून अन्न खावें व जगावें हें सर्व अपवाद तारतम्यानें ठरवून वागावें. परंतु नैतिक बंधनें झुगारून द्यावीत हें म्हणणें सर्वस्वी घातक आहे.

जगातील राष्ट्रें ही शास्त्र, शोध, संघटना, शिस्त, स्वदेशाभिमान यांच्या जोरावर जशी पुढें आली आहेत तशीच ती दानत, नीतिमत्ता, चारित्र्य, त्याग आणि स्वसंस्कृतीचा अभिमान यामुळेंही पुढे आलेली आहेत. नैतिक बंधनें झुगारून द्यावीं असें म्हणणाऱ्यांनी हे ध्यानात ठेवले पाहिजे की चहाच्या कपाकरिता, दोन बिस्किटाच्या तुकड्याकरिता, चार दिडक्या कमावण्याकरिता, चार ग्राहक मिळविण्याकरिता जर माणसें पाहिजे ते करूं लागली, तर स्वदेशद्रोहाचेच कार्य अशी माणसें फार चांगलें करतील. आजच्या जपानांत अशी स्थिति आहे की हॉटेलांत कोणी उतरला व त्याच्याजवळ कांहीही असले तरी त्याला कोणी हात लावीत नाही, आणि त्या खोलीला कोणी कुलूपही लावीत नाहीत. रेल्वे, ट्रॅम, टॅक्सीमध्यें काही राहिले तर ते नेमके वरिष्ठाकडे पोचते होते व मालक आल्यास त्यास ते मिळतें! केवढी ही दानत व केवढा हा व्यवस्थितपणा! इंग्लंडसारख्या देशात रस्त्यावर वर्तमानपत्राचे ढीग व पेट्या ठेवलेल्या असतात. वृत्तपत्राच्या ढिगातून कोणीही पत्र उचलावे व एक पेनी टाकावी. तेथें हा असला दंडक बरोबर पाळला जातो की सायंकाळी पत्रें व पेनी यांचा हिशेब बरोबर मिळतो! ही नीति कांहीं लहान आहे काय? हे अर्थशौच आणि हें अर्थपावित्र्य आमच्या समाजात धर्म, संस्कृति, परंपरा, पापपुण्य, स्वर्गनरक अशा कल्पनांनीं उत्पन्न केलेलें होतें. या कल्पना बदलून दुसऱ्या सांगण्यास कांहीच हरकत नाहीं. परंतु अर्थपावित्र्य नको, वैवाहिक शुचिता नको, असें म्हणणें आचरटपणाचें आहे.

## संस्कृति म्हणजे सुसंस्कार

प्रत्येक राष्ट्राला संस्कृति असते. त्या संस्कृतींत कांही विकृति झालेली असते. ती विकृति घालवून संस्कृतीच्या मूळ स्वरूपाला उजळा देण्याचें काम अवश्य करावें. पण संस्कृति नको, ते थोतांड आहे हे म्हणणें खोटें आहे. संस्कृति म्हणजे मनावर झालेले सुसंस्कार. संस्कृति म्हणजे इष्ट संस्काराची जपणूक. संस्कृति म्हणजे समाजानें पद्धतशीरपणें अनेक क्षेत्रांत केलेली प्रगति. श्रमोत्पन्न अन्न खाणें, अग्नि व वीज यांचा उपयोग करणें, विणलेली वस्त्रें वापरणें, स्वच्छतेनें वागणें, शुद्ध भाषा बोलणें, सभ्यता, विनय, शील, चारित्र्य यांचें संवर्धन करणें, म्हणजे संस्कृतीच होय. आज समाज ज्या स्थितींत आहे त्यांत पुष्कळ सुसंस्कृतपणा आहे. तेव्हां सुसंस्कार नष्ट करणें हें शहाणपणाचें होईल काय? संस्कृति म्हणजे केवळ देवपूजा नव्हे, किंवा सोवळें ओंवळें नव्हे. देवपूजेच्या जागी आज वीरपूजा अगर समाजसेवा खुशाल सांगावी. सोवळ्याच्या जागी स्वच्छता आणावी पण यांत कांही अर्थ नाही, सब झूट आहे असें म्हणणें हें गैर आहे. संस्कृतीची वाढ, संस्कृतीचा विकास याचकरितां सत्ता पाहिजे असते. संस्कृति हा शब्द इतका व्यापक आहे की मानवी जीवनाची सर्वांगें त्यांत अंतर्भूत होतात. चित्रकला, गायन, नाट्य, शिल्पशास्त्र यांसारख्या कादर्णे असले विषयसुद्धा संस्कृतींत येतात. मानवी जीवनाचीं विविध अंगें वाढण्यास हातांत सत्ता लागते, आणि त्या सत्तेला स्वराज्य म्हणतात. राज्य पाहिजे पण तें स्वकरितां म्हणजे स्वसंस्कृतीच्या विकासाकरितां पाहिजे. संस्कृतीचाच उच्छेद केल्यावर मग राज्य हें केवळ नोकऱ्या, धुगऱ्या व भाकऱ्या याचकरितां पाहिजे की काय? आज जी विचार-सरणी मांडण्यांत येते त्यांत कामकरी व शेतकरी यांचा मोठा कळवळा दाख-विण्यांत येतो. तो योग्य असला तरी जगांत नोकऱ्या, धुगऱ्या व भाकऱ्या यांवर संतुष्ट असणारा वर्ग कधींच क्रांति करूं शकत नाही. क्रांति ही अभिजातवर्ग, सुसंस्कृत वर्ग आणि महत्त्वाकांक्षी वर्गच करतो. हा वर्ग थोडा असला तरी पुरतो. हिंदुस्थानांतील क्रांति ही उदरांतीनेंच होणें शक्य व इष्ट असल्यामुळें नवयुगीन विद्यार्थ्यांनीं सर्वोच्छेदक व सर्वविध्वंसक विचारांची हकालपट्टीच केली पाहिजे.

## सर्वं बलवतां पथ्यं।

प्रौढ विद्यार्थ्यांनी हें पक्के ध्यानात ठेवले पाहिजे कीं आपला देश परतंत्र आहे. अर्थात् परतंत्र राष्ट्रांनी स्वतंत्र होण्याकरितां जे उद्योग, ज्या चळवळी आणि जी मतें अंगिकारली त्यांचाच अभ्यास आपण केला पाहिजे. आज जी राष्ट्रे स्वतंत्र आहेत तेथें पुष्कळ चांगल्या गोष्टी असतील, त्या मोठ्या मोहक व आकर्षकही वाटतील. परंतु स्वतंत्र राष्ट्राची गोष्ट निराळी आणि विधर्मी व विदेशी अशा दास्यात्व्य पचार्टीत सापडलेल्या राष्ट्राची गोष्ट निराळी. 'सर्वं बलवतां पथ्यं' बलवानाला कशाचीच बाधा होत नाहीं, पण रोगी मनुष्य जर निरोगी व दणकट माणसाप्रमाणें पाहिजे ते व पाहिजे तितकें खाऊं लागेल तर प्रकृतीला अपाय होऊन तो मरेल. गरिबानें एकाएकाणें जर श्रीमंताच्या मुलाचें अनुकरण करण्याचा यत्न केला तर तो फार लौकर पंथाला लागेल. मोर नाचतो म्हणून लांडोर नाचूं लागली तर ते हास्यास्पद होतें. गृहस्थाश्रमातील भोग व चैनी जर विद्यार्थी विद्यार्थीदशेंतच भोगूं लागेल तर त्या मूर्खपणाला दुसरें कोणतें नांव देतां येईल?

बलवानांचा धर्म निराळा व दुर्बलाचा धर्म निराळा; ज्याचें सर्व यथास्थित चाललें आहे त्याची गोष्ट निराळी व जो आपत्तींत आहे त्याची गोष्ट वेगळी. स्वतंत्र राष्ट्राचें ऐश्वर्य, विलास, दिमाख आणि अभिनिवेश ही परतंत्र राष्ट्राला उपयोगी नाहीत. हें सर्व सांगण्याचें कारण इतकेंच कीं आज रशियांत असें आहे, तेथें अमुक व्यवस्था आहे, तेथें अमुक व्यवस्था आहे, जर्मनींत असें आहे, जपानांत तसें आहे, असें म्हणून भलत्या गोष्टी करण्याची जी प्रथा पडत आहे ती फार घातक आहे. आपल्या देशाची सांप्रतची स्थिति काय आहे, लोकांची शक्ति किती आहे, आर्थिक सामर्थ्य किती आहे याचा बरोबर अदमास घेऊनच पुढें पाऊल टाकलें पाहिजे. उगाच मार्क्स असें म्हणतो, रस्किन तसें म्हणतो, डॉ. पराईट अमुक विधान करतो असें म्हणून अर्थशास्त्रविषयक सामाजिक बेतात व स्वैरवृत्तीचा प्रतिपादन्याची जी प्रथा पडूं लागली आहे, ती परतंत्र राष्ट्राला हानिकारक आहे. यास्तव विद्यार्थ्यांनी स्वतःच्या आपल्या परिस्थितीचा विचार करण्यास शिकावें.

हिंदुस्थान हें असें कुरण आहे की त्यांत पाहिजे त्यानें पाहिजे तें आणून सोडावें. त्याप्रमाणें स्वराज्याकरितां आज रशियांतील विचारांचे गाठोडें आणून येथें सोडलें जात आहे. या गाठोड्यांत ज्या चिंध्या व जो केर आहे तो फेकून देऊन, कामकरी व शेतकरी वर्गाची पिळवणूक थांबविण्याजोगा जो भाग आहे तेवढाच उपयुक्त आहे. बाकी सर्व फोल आहे.

विद्यार्थ्यांना नागरिक या नात्यानें पुढें या विषयांचा विचार करावा लागेलच. विद्यार्थीदशेंत जे हे विचार पुढें येतात, त्यासंबधानें कांही तरी निश्चित मत बनवितां यावें म्हणून तें येथें मांडलें आहे. आतां विद्यार्थ्यांच्या क्षेत्रांतील त्यांना अवश्य असे बहुतेक सर्व विषय विविध प्रकरणांतून सांगितलेले असल्यामुळें नवयुगीन भारतीय विद्यार्थ्यांना साह्य करणारे जे दोन मुख्य घटक पालक व शिक्षक त्यांच्याशीं पुढील दोन प्रकरणांत थोडें हितगुज करतो.

---

## प्रकरण १६ वें

# पालकांस सूचना

नवयुगांतील विद्यार्थ्यांच्या ठिकाणीं बुद्धिबल, शरीरबल, आणि शील हीं यावीत, ते चांगले नागरिक व्हावेत या दृष्टीनें विद्यार्थ्यांना उद्देशून जेवढें सांगावयाचें, तेवढें येथवर सांगितलें. आतां विद्यार्थ्यांना अहर्निश साह्य करणारे जे पालक आणि शिक्षक त्यांना पुढील दोन प्रकरणांमध्यें कांहीं सुचवावयाचें आहे.

पालकांचे साधारण तीन वर्ग पडतात. अशिक्षित, शिक्षित व अर्धशिक्षित. अशिक्षित पालकांचें ( आईबाप व आप्त ) शिकलेल्या मुलांपुढें कांहीं चालत नाहीं. आपल्याला तर कांहीं कळत नाहीं, मुलगा तर शहाणा, म्हणून आईबाप मुलाकडे कौतुकानेंच पाहतात. अशिक्षित पालक

मुलांचे ठिकाणीं सद्गुण वाढतील असेंही केले पाहिजे. मुलगा नापास झाला की कसें तरी करून वरच्या ईयत्तेंत ढकला एवढी भीड शिक्षकाला घालण्यापुरते पालक केव्हा तरी शाळेंत जातात. उभ्या वर्षात शिक्षकाची व पालकाची भेट नसते. भेट झाली तरी पालक उदासीनच! मुलाचे ठिकाणीं सद्गुण यावेत म्हणून आहारविहार, निजणेंबसणें, खेळ, वाचन, शाळा, अभ्यास अशा सर्व बाबीकडे पालकांनी शिक्षकाच्या सहकार्याने अवश्य लक्ष दिले पहिजे.

मुलाना शिक्षण देण्याच्या कामीं गृहशिक्षणाचाच मुख्यत उपयोग होतो. मुले शाळेंत सहा तास जात असली तरी अठरा तास घरीच असतात. म्हणून मुलाच्या पालकांवर मोठीच जबाबदारी आहे. पालकानी मुलाना लहानपणापासून चांगल्या सवयी लावण्याचा यत्न केला पाहिजे मुलाचीं मनें हीं चिकण मातीप्रमाणे मऊ असल्यामुळे त्याना जे वळण द्यावें तें लागतें. मुलांना नेहमी कामाची व चांगल्या सवयींची गोडी लावावी. त्याकरितां त्याना उत्तेजन द्यावें. पण वारंवार खाऊ आणि बक्षिसें याचे प्रलोभन काहीं उपयोगी नाही. मुलें चुकली तर चुकीचा तिटकारा दाखवावा, पण मुलाचा उपहास कधीं करू नये. रागाच्या भरात कधीही शिक्षा करू नये. शिक्षा केल्यास ती कोणत्या चुकीबद्दल आहे हे मुलाना नेमके कळलें पाहिजे. मुलानें अपराधसुद्धां अहेतुक व अहेतुपुरस्सर असे होतात, त्याकडे लक्ष देऊन शिक्षा केली पाहिजे. शिक्षा हे एक औषध आहे, अर्थात् ते औषध केव्हां तरी द्यावयाचे असतें. वरचेवर औषध दिल्याने तें जसे परिणामकारक होत नाही तशीच गोष्ट शिक्षेची आहे.

मुलें हीं अनुकरणप्रिय असतात. ती वडील माणसाचें अनुकरण चटकन् करतात. खोटें बोलणें, थापा देणे, वगैरे वगैरे सवयी शिक्षेच्या भीतीमुळें मुलांना जडतात. घरातील वडील माणसाची वागणूकही मुलाना खोटें बोलण्यास शिकविते. वडील माणसें मुलाना नेहमी थापा देऊन फसवू लागली म्हणजे मुलानाही तीच सवय जडते. मुलानी काम करावें, त्यानी उत्साही असावे असें वाटत असेल तर प्रत्येक घरातील पालकांनी ती वृत्ति आपल्यामध्यें उत्पन्न केली पाहिजे. मुलांशी खेळणे, गप्पागोष्टी करणें, त्याना घेऊन फिरावयास जाणे, त्याच्या भावनांशी समरस होणें, जसे अवश्य

आहे, तसेच मुलाना पूर्ण स्वातंत्र्य देणें हेही युक्त आहे. मारखें पालकांच्या नजरेंत राहाणें मुलांना आवडत नाहीं म्हणून पालकांनी मुलांना मधून मधून स्वातंत्र्य द्यावें

पालकानी मुलांना आज्ञा करतांना अशी काळजी घ्यावी की मुलांना ती आज्ञा मोडावीशी वाटणार नाही. आज्ञा, हुकूम, याचा पारसा प्रसंग न यावा कारण मारख्या हडेलहप्पीमुळे मुलाच्यामध्यें निष्कारण अविश्वास उत्पन्न होतो. प्रत्येक पालकाला थोडीतरी शिक्षणशास्त्राची व मानसशास्त्राची माहिती पाहिजे. निदान सुबुद्ध व समजस पालकांनी तरी यासंबंधाची पुस्तकें अवश्य वाचावी म्हणजें त्याचा उपयोग त्याच्या मुलांना खास होईल

पालकानी मुलांच्या मनोवृत्तीचा अभ्यास करून त्याचा अभ्यासक्रम ठरवावा. मुलाचा स्वभाव, मुलाची वृत्ति ही ध्यानात घेऊन त्याला प्रोत्साहन द्यावें पुष्कळ मुलाना हस्तकौशल्याचा, गायनाचा, चित्रकलेचा असा निरनिराळा नाद असतो हे नाद शाळेच्या अभ्यासक्रमाचे बाहेरील असले तरी त्याला उत्तेजन द्यावे, म्हणजे मुलाची कुचंबणा होत नाही. मनावर सुसस्कार होण्याचे जसे शिक्षण हवे, तसेच नागरजीवनाला उपयुक्त अशा धद्याची व कलाची माहिती प्रत्येक माणसाला अवश्य हवी अर्थात् हें सर्व ज्ञान प्रत्यक्ष प्रयोगानेंच होत असते; पुस्तकी शिक्षणानें होत नाही ही व्यापक दृष्टि ठेवून पालकानी वागावें.

पुष्कळ पालकाना आपली मुले भराभर वरच्या इयत्तातून उड्या मारीत जावी असे वाटतें व ते त्याकरिता मारख्या शिकवण्या ठेवतात, हें अत्यंत घातुक आहे. जुलमाने कोंबलेले ज्ञान हे पचन नाही आणि त्यामुळें मेंदूला अपाय मात्र होतो. म्हणून शिक्षण म्हणजे काही पुस्तकें लौकर लौकर घोकणें असे नसून बुद्धीचा, मनाचा व शरीराचा स्वाभाविक विकास म्हणजेच शिक्षण होय. मुलगा केवळ परीक्षाच पास होतो किंवा नाही हें न पाहतां त्याच्या शरीरप्रकृतीची ईयत्ता, गुणाची ईयत्ता, बलाची ईयत्ता प्रत्येक वर्षी वाढत आहे की नाही हेंही पाहिलें पाहिजे. पुस्तकी ईयत्तांबरोबर शरीर, मन, बुद्धि, गुण आणि कार्य याच्याही ईयत्ता वाढत नसल्यास अभ्यासक्रमात व अभ्यासाच्या पद्धतींत कांहीं तरी फरक केला पाहिजे.

पालकांनी मुलांचे बाबतीत देशकाल वर्तमान चागलें ओळखलें पाहिजे; आणि आपल्या मुलांपुढें उच्चात उच्च असें ध्येय ठेवण्याचा यत्न केला पाहिजे. परतंत्र राष्ट्राने स्वतंत्र होणें, हें मुख्य ध्येय आहेत. पण त्याशिवाय धर्म, समाज व संस्कृति यांचें रक्षण, स्वदेशी व्रत, स्वदेशाभिमान अशी उच्च ध्येयेंही मुलांच्यापुढे नेहमी ठेविली पाहिजेत. सुबुद्ध व मज्ञ पालकांनीं शास्त्रीय ज्ञान, त्यामुळें वाढलेल्या कला व धदे याची कल्पना मुलाना दिल्यास मुलांचेमध्यें एकांगीपणा कधी राहणार नाही.

मुलांशी वागतांना, आज्ञा करतांना, 'शिक्षा' करतांना प्रत्येक बाबतीत त्याचा स्वाभिमान वाढविण्याकडे पालकाचें लक्ष असावें. अलीकडे सारखें पुस्तकी ज्ञान कोंबण्याची क्रिया चालू असल्यामुळें बुद्धीला अजीर्ण होतें व विद्यार्थी स्वाभिमानी होत नाही. **कोणत्याही स्थितींत मुलांचा स्वाभिमान वाढेल अशीच वागणूक पालकांनीं ठेवावी.** स्वाभिमान वाढला म्हणजे स्वावलंबन व स्वकष्टानें जगण्याची वृत्ति आपोआप वाढते **'पुत्रे मित्रवदाचरेत्'** हा न्याय पालकानी ओळखला पाहिजे. मुलें सोळा वर्षांची म्हणजे प्रौढ झालीं कीं त्यांचा स्वाभिमान वाढतो अशा वेळी पालकानी मुलाना धाकांत व धारेवर वागविण्याचें कधीही मनात आणू नये. कारण अशा वागणुकीमुळें मुलें भित्री बनतात व मोकळ्या मनाने वागत नाहीत. मुलांचे मनांत वडिलांविषयी कधीही अशी अढी वसता कामा नये धाक, धपटशा, दडगा यापेक्षा बुद्धिवाद आणि मोकळ्या मनानें वागणें हेंच इष्ट असते. मुलांना थोडा धाक असावा, अगदीच सैलपणाने वागवू नये; कारण तीं त्यामुळें वडिलाचा अगदींच वोज ठेवणार नाहीत; हे जरी खरे असलें तथापि पालकानी मुलांशी शिक्षकाप्रमाणें बुद्धिवादच केला पाहिजे. समजावून सांगणे, चुकी झाल्यास ती दाखविणे, काम बरोबर केल्यास प्रोत्साहन देणें, हें सर्व पालकानी करावें. मुलाला सागतांना सुद्धां सारखें तुझें चुकतें आहे, तू मूर्ख आहेस, दगड आहेस, बेअकली आहेस, असें म्हणत सुटू नये. त्यामुळ मुलाचा आत्मविश्वास ढासळतो. नेहमी सूचक व प्रोत्साहकच बोलावें. मुलांना असें वाटलें पाहिजे की, वडील जें सागतात त्यांत पुष्कळ तथ्य आहे, तें आपल्या हिताचें आहे आणि त्याप्रमाणे वागण्यांत आपले कल्याण आहे. वडिलांची आज्ञा म्हणून मुलांनी एखादी गोष्ट करण्यापेक्षां वडिलांनीं

सांगितलेला उपदेश आपल्या हिताचा आहे असे समजून मुलांनी तसे वागणें हेच अधिक इष्ट आहे.

पुष्कळ वेळा नवशिकेपणामुळे मुले चुकतात पुष्कळ वेळा मुलांना आपल्या चुका कळत नाहीत व घरातील वडीलमंडळी का कावतात व रदरतात हेंही त्यांच्या ध्यानी येत नाही म्हणून पालकानी एकदम मुलावर न उसळता, न रागावता, न खेकसता झालेली चुकी समजून द्यावी. चुकी कळल्याविना आणि चुकल्याविना शहाणपण येत नसते. काम करणें, करताना चुकणे, आणि झालेल्या चुका पुन्हा न करणें हा शहाणपणचा मार्ग आहे, असें मुलाना पटवून द्यावे चूक सहज झाली का बुद्धिपुरस्सर केली हे शांतपणाने लक्षात घेऊन पालकानी मुलाशी वागावे वडिलांकडून, शिक्षकांकडून, इतर आप्तेष्टांकडून झालेल्या चुकांबद्दल मुलांचा सारखा उपहास होऊ लागला तर ती फारच ओशाळतात, धीटपणाने पुढेसुद्धा येऊ इच्छित नाहीत व नेहमी भीतीमुळे चोरट्यासारखी वागतात.

आजकाल विद्यार्थी व पालक यांचा एका पंक्तीस जेवण्याचा प्रसंग बहुधा रविवारी येतो. मुले आधी जेवून जातात व नंतर पालक जेवतात, असेच पुष्कळ ठिकाणी होते मुलांची व पालकाची पंगत एक होण्याचा जेव्हा सुयोग येतो, तेव्हा पालकाला मुलाला शिक्षण देण्याची तीच वेळ आहे असे वाटते, व जेवढे कांही मनात विचार येतात किंवा मुलांना बोलावयाचे जे जे काही राहिलेले असते ते सर्व पालक बोलू लागतो रागे भरणे, टोचून बोलणे, प्रसंगी रागावणें असे सर्व भोजनप्रसंगी होऊ लागले म्हणजे मुले वडिलांशी असहकारिता करू लागतात म्हणून पिताजींनी मुले जेवावयास बसली असताना त्यांच्याशी प्रेमळपणाने बोलावे विनोद करून त्यांना सूचना द्याव्या आणि मोकळेपणाने वागावे पूर्वीच्या आकसाने जेवावयाला बसलेल्या मुलांना केव्हाही बोलू नये; आणि जे बोलावयाचे असेल ते प्रेमळ व स्पष्ट असे बोलावे.

सांप्रतच्या या यांत्रिक आणि कृत्रिम धावपळीच्या आयुष्यक्रमामुळें शहरामध्यें पुष्कळ घरीं मुलांची व बापाची भेटही रोज होत नाही, असें म्हणतात. कारण पिताजी सकाळी आठ वाजतां जेवून जो बाहेर पडतो, तो रात्री दहा वाजता घरी परत येतो. त्यावेळी मुले भोजन करून डारडुर

घोरत पडलेली असतात. सकाळी मुलें उठण्याच्या आतच पिताजी जर आठ वाजताच भोजन उरकून कामास गेला तर मुलाची व बापाची ओळख तरी कशी राहणार. तेव्हा फक्त रविवारी मुलांची व बापाची भेट ! अशा स्थितीमुळे लहान मुले आईला सरळ विचारतात की

हा दर रविवारचा पाहुणा कोण ?

रोज तर जेवावयाला दिसत नाही, आणि रविवारीच तेवढे हे गृहस्थ कोण जेवावयास येतात ? आईला सरळ उत्तर द्यावे लागते की बाबा, हे तुझे वडील आहेत, त्याना सारखें काम असतें म्हणून रोज भेट होत नाही. आज सुटी म्हणून त्याची भेट होते.

खरोखर अशी जर वस्तुस्थिति असेल तर पालक मुलाना काय वळण लावणार ? आणि जर एखाद्या प्रसंगी बापामुलाची भेट झाली, तर त्या वेळी जर तो मुलाना असें काही टोचून बोलू लागेल तर त्याचा परिणाम इष्ट होईल काय ?

मुले लहान व मोठी असली तरी त्याना कळत नाही असे मात्र नव्हे. प्रत्येकाला आपापल्या मतलबापुरते कळत असतें. शब्द हे एक तीक्ष्ण शस्त्र आहे या शस्त्राने झालेली जखम भरून येत नाही. याम्तव उपरोधिक बोलणे, टोचून बोलणें, घालून पाडून बोलणे हे प्रकार पालकानी टाळलें पाहिजेत. 'दोन वेळां गिळावें, गांवभर हिंडावें, इकडची काडी तिकडे करू नये, म्हणजे चांगली अक्कल येते, असें बोलण्यापेक्षा सरळ 'लौकर उठत जा, अभ्यास करा, व्यायाम करा, शहाणे व्हा' असे सांगणे चांगले इष्टमित्र, आप्त, शेजारी यांच्या देखत तर मुलाची खरडपट्टी कधीही काढू नये. परक्या माणसादेखत मुलाचा पाणउतारा होऊ लागला म्हणजे त्याच्यामध्ये लाजाळू-पणा, धास्ती व भीति हे दुर्गुण येतात. मुलाचे मनावर चांगली गोष्ट अनेक प्रकारानी विशेषतः बुद्धिवादाने ठसविणे हेंच पालकाचें काम आहे. हे काम करण्यास सर्व पालक समर्थ नसतात हे खरे पण म्हणून त्यानी तऱ्हेवाईक वर्तणूक करावी असें मात्र नव्हे

पूर्वी अशी समजूत होती की बापापुढे मुलाने ब्रही काढता कामा नये, अवाक्षरही बोलता कामा नये, तर मोठ्या अदबीने व नम्रतेने वागावें. कित्येक तर असे समजत की बापापुढें मुलाने अगदी चळचळा कापले पाहिजे पण या

सर्व कोत्या समजुती आतां बदलत आहेत व बदलल्या पाहिजेत. बाप म्हणजे कर्दनकाळ नव्हे किंवा बाप म्हणजे यमाचा सहोदर नव्हे. बाप व मुलगा हे दोघे मित्र आहेत हेंच खरें. म्हणून प्रौढ मुलानींही वडिलांशी चर्चा करावी, मतभेद मांडावे, बुद्धिवाद करावा, आणि मतविरोध असला तरी वडिलांनी मागितलेले व सोपविलेले कार्य बिनबोभाट पार पाडावे.

पुत्र हा पित्याचा आत्मा होय ! त्याच्याशी पित्याने मित्राप्रमाणेच वागले पाहिजे मुलें आपल्या मित्राशी जशी मोकळेपणें वागतात, तशी वडिलांशी वागत नाहीत, याचे कारण वडिलांची वागणूक हेच होय. घरोघरी बापामुलांचे जे बिनसलेले दिसतें याचें कारण प्रौढ मुले व मुली आणि पालक यांच्या विचारांत पडलेलें अंतर हेंही एक असतें. प्रौढ मुलामुलींच्या आकांक्षा निराळ्या असतात, तर वडिलांच्या मनांत काही निराळेच विचार घोळत असतात आपल्या मुलामुलींशी चर्चा करून बौद्धिक आणि मापनिक स्थिति समजावून घेऊन त्यांच्या आकांक्षाना वाव देणें हें खरोखरी वडिलांचें काम असतें पण वडील माणसें आपण होऊन या गोष्टी करीत नाहीत. शेजारीपाजारी, आप्तइष्ट यांच्याद्वारे आडपडद्याने बोलण्याचे जे व्यवहार होतात हे सर्व अनिष्ट होत.

घरी प्रौढ मुलगा व प्रौढ मुलगी झाली की त्यांना थोडें स्वातंत्र्य हवे असतें. मुलांमुलींना स्वातंत्र्य दिलें की मातापितरांना थोडें पारतंत्र्य येतेच! विवाहाचे बाबतीत तर हे स्वातंत्र्य आपण होऊन दिलें म्हणजे ती मुले आपोआप वडिलांचा विचार घेऊं इच्छितात मुलीची इच्छा शिकण्याची तर वडिलांची इच्छा तिचें लग्न करण्याची; मुलाची इच्छा धंद्यात पडण्याची, तर वडिलांची इच्छा मुलानें एल्‌एल्‌ बी. ची परीक्षा पास व्हावें अशी, असा विरोध घरोघरी दिसतो. आईबापानी आपल्या मुलामुलींबद्दल अनुदार भाषा शेजारी व स्नेही यांचेजवळ कधींही काढूं नये. आपली मापनिक स्थिति व इच्छा ही प्रौढ मुलामुलीपुढें जर वडिलांनी सरळ मांडली आणि त्यांच्याशी चर्चा केली तर मुलांना वडिलांचें म्हणणे पटतें. वडील म्हणजे एक जुलमी सरकार आहे; व आपण महत्त्वशील प्रजाजन आहोत असें मुलांना वाटता कामा नये. ज्यांना एकुलत्या मुलामुलीपेक्षां अनेक मुलें व मुली आहेत, त्यांनी तर आपली वागणूक मनमोकळ्या मित्रा[illegible] पाहिजे.

वडील मुलगा व वडील मुलगी यांचें अनुकरण इतर मुलें करतात; म्हणून वडील भावंडें निरोगी, हुषार, व्यवस्थित, व कर्ती असली म्हणजे लहानाना स्वाभाविक चांगले वळण लागतें. घरदार पैसाअडका, देणें घेणें; तात्पर्य, एकंदर गृहस्थिति ही प्रौढ मुलाना योग्य वेळीं कळणें अत्यंत हितकर असते. म्हणजे ती त्या दृष्टीनें वागूं लागतात.

पालकांनी मुलांना सकाळी लौकर उठण्याची सवय लाविली पाहिजे. मुलांना दांत घासावयाचा आळस असतो, नी तोंड नीट धूत नाहीत. शौचास जाऊन आल्यावर डावा हात माती लावून धुणें, खुळखुळून चुळा भरणें, हात पाय स्वच्छ धुणें, हें करीत नाहीत. याचें कारण त्यांना लहानपणी त्याचें महत्त्व वाटत नाहीं. दाताच्या बाबतीत तर तरुणांत विशेष काळजी घेतली जाते. प्रातःस्नान विशेषतः शीतोदक स्नान हें वडिलांनी स्वतः करून जरी न दाखविलें तरी मुलाना त्याचें महत्त्व समजावून देऊन त्याची सवय लावावी. प्रातःस्नान, स्वच्छता, कपडे धुणें, स्वच्छ आचरणें, वगैरे आई-बापांच्या नेतृत्वाखाली मुलें चांगली करूं शकतात, तशी इतरांच्या सांगण्यानें करु शकत नाहीत. प्रत्येक घर म्हणजे या दृष्टीनें स्वयंभू राष्ट्रीय शिक्षणाची शाळाच आहे. मुलांना वळण लागावें म्हणून आणि स्वतःच्या आरोग्या-साठीं पिताजींनी रोज नमस्कार घालावेत अथवा मुलांचे देखत इतर व्यायाम करावा. मुलांना घेऊन स्वतः फिरावयास व पळावयासही जावें. मुलाचे बरोबर असा नित्य व्यायाम वडील माणसें करूं लागली की मुलाना हुरुप येतो. प्रत्येक जिवंत माणसाला व्यायाम अवश्य आहे; म्हणून वडिल माणसांनी कधी कधी मुलाच्या बरोबर व्यायाम करावा म्हणजे व्यायामाचें महत्त्व त्याना पटतें. वडील माणसें जर नुसतीं तंबाखूच्या पिचकाऱ्या मारीत किंवा चहा पीत, पत्ते व असलेच बैठे खेळ कुटीत बसून मुलाना व्यायाम करा असें सांगतील, तर त्याचा उपयोग मुळीच होणार नाहीं. वडीलधाऱ्यांनी फिरणें, खेळणें, असें स्वतः थोडेतरी केलें पाहिजे. टेनिस, बॅडमिंग्टन आणि असेच अनुकूलते-प्रमाणें खेळ मोठ्या माणसांनी मुलांना ती सवय लागावी म्हणून अवश्य खेळले पाहिजेत. कारण खेळाडूपणा हा वृद्ध आणि तरुण अशा सर्वांमध्यें यावयास पाहिजे.

विद्यार्थ्यांच्या अन्नामंबधीं घरातील वडील मंडळींनीं पुष्कळच लक्ष देण्याजोगें आहे. चहा, चिवडा, भजी इत्यादि तामसी पदार्थ खाण्याची सवय लहानपणीं शक्य तों न लावणें हे आईबापांचे हातांत असतें अमुक पदार्थ आणि अमुक अन्न हें वाईट आहे अशी वृत्ति घरीं उत्पन्न केली आणि ती व्यवहारात आणली म्हणजे अपायकारक अन्नाकडे व पेयांकडे महसा मुलांची प्रवृत्ति होत नाहीं त्यांतूनही मुलांना दुकानांत जाऊन खावेंसे वाटलें व तीं गेलीं, तथापि मनांत विषाद न मानता, दुकानांत जाऊनसुद्धा कोणते पदार्थ खावेत; आरोग्यदृष्ट्या व आर्थिक दृष्ट्या हितकर काय आहे हें पालकांनी स्वतः समजावून दिलें पाहिजे. आज जगांत जी आमिषें आहेत, त्याकडे मुलांची प्रवृत्ति अनिष्ट असली तरी होणारच. ती प्रवृत्ति अत्यल्प प्रमाणांत होईल आणि अपायकारक न होईल येवढें पालकांनीं लक्ष ठेविल्यास होण्याजोगें आहे.

प्रत्येक पालकाला आपल्या मुलाच्या अभ्यासाकडे लक्ष देता येईल असें नाहीं. तथापि लहानपणीं प्रत्येक पालकाला मुलाच्या जवळ बसून त्याच्या अभ्यासाला थोडेंबहुत साहाय्य करता येईल. निदान वेळापत्रकात अभ्यास काय दिला आहे. त्याप्रमाणे मुलगा अभ्यास करतो किंवा नाहीं, हे मधून मधून पाहिलें पाहिजे पोलिसाप्रमाणें मुलावर सक्त पहारा ठेवूं नये. पण अगदीं दुर्लक्षही असू नये मुलांना आपल्यावर लक्ष ठेवणारे आपले आईबाप आहेत, ते आपले हितचिंतक आहेत, अशी निरंतर जाणीव असली पाहिजे.

आपल्या मुलानें कोणता व्यायाम घ्यावा व तो किती घ्यावा हेंही पालकांनी तज्ञ व आपला मुलगा याचे विचारें ठरविलें पाहिजे. कारण न झेपणाऱ्या अशा व्यायामानें आणि अति व्यायामाने प्रकृतीला अपाय होतो. मुलगा नुसता व्यायामसंस्थेंत जातो, तेवढ्यावर समाधान न मानतां, तो तेथें कोणता व्यायाम करतो व किती करतो इकडेही पालकांचें लक्ष पाहिजे.

मुलांना सुटीमध्यें प्रवास करावासा वाटतो. पायीं प्रवास, सायकल प्रवास, आणि रेल्वे प्रवासही करण्याची अनुज्ञा पालकांनीं आपल्या आर्थिक सामर्थ्याप्रमाणें द्यावी. ऐतिहासिक स्थळें, प्रेक्षणीय स्थानें, दऱ्याखोरी, पर्वत, नद्या हीं सर्व तरुणपणीं पाहण्यांतच विशेष आनंद असतो. म्हणून

मुलांना नाउमेद करूं नये. तर ऐतिहासिक स्थळें कशीं पहावीत, धार्मिक स्थळें पाहतांना कोणती दृष्टि ठेवावी, प्रवासाकरिता साधने कोणती असावीत, या सर्वांची माहिती पालकांनी द्यावी अधिक खर्चाची बाब असल्यास स्वावलंबनानें प्रवास करण्यास सांगावें सार्वजनिक कार्याची हौस मुलामध्यें असते. ती पालकांनी अवश्य वाढवावी. नसत्या भानगडी करू नकोस. आपलें घर बरें कीं आपण बरें! ही घातुक विचारसरणी पिताजींनी आतां सोडून द्यावी. स्वार्थाबरोबर परोपकार करा, देशकार्य साधा, सार्वजनिक कार्य करा, समाजधर्म पाळा, असा उपदेश वेळोवेळीं पालकांनी मुलांना करावा.

मुलांच्या ब्रह्मचर्याच्या बाबतीत पालकाचेवर खरोखर फारच जबाबदारी आहे. जो विषय संकोचाने बाप मुलाजवळ कधीही बोलत नाही, अगर शिक्षकही सांगत नाही, तो विषय मुलगा नेमका अन्य मार्गानें समजून घेतो. प्रत्येकाला आपल्या आयुष्याचा अनुभव असतो गद्धेपंचविशीतील चुक्या प्रत्येक पालक जाणतो. म्हणून भिडस्तपणा न ठेवता मुलाचे मनावर ब्रह्मचर्याचें महत्त्व बिंबवावें. ब्रह्मचर्याचा ऱ्हास कसा होतो, ते किती महत्त्वाचें आहे, विद्यार्थीदशेंत त्याचा संचय आणि गृहस्थाश्रमांत व्यय ही व्यवस्था कशी योग्य आहे, त्याकरितां जीभ का आवरून धरली पाहिजे, सिनेमा, नाटकें, कादंबऱ्या का वर्ज्य केल्या पाहिजेत, हें सर्व नीट समजून सांगितलें पाहिजे. वास्तविक या लैंगिक शास्त्रावर प्रौढ व भारदस्त अशीं व्याख्यानेच तज्ञांनी विद्यार्थ्यांपुढें दिलीं पाहिजेत. त्या व्याख्यानास शिक्षक, पालक, विद्यार्थी व डॉक्टर अशा सर्वांनी उपस्थित राहिले पाहिजे. हल्लीं कांहीं ठिकाणीं अशीं व्याख्यानें होतात, त्यांना पालकांनीं प्रोत्साहन दिलें पाहिजे. सुसंस्कृत व सुशिक्षित पालकांनीं आपल्या मुलांच्या हातांत कोणत्या कादंबऱ्या व लघुकथा पडूं नयेत, तसेंच त्यांनीं कोणते बोलपट पहावेत, व कोणते पाहूं नयेत, ते कां पाहूं नयेत हे स्वतः मुलाचे बरोबर चर्चा करून ठरवावें ब्रह्मचर्यनाशाचे विषय मुलांना वाममार्गानें कळतात. त्यापेक्षा ते सरळ मार्गानें आणि आप्तांकडून कळणें हें अधिक उपयुक्त व श्रेयस्कर आहे. सुशिक्षित व समंजस पालकांनी या दृष्टीनें विचार केल्यास मुलाचें जन्माचे कल्याण करण्याची शक्ति खरोखरीच त्यांच्या हातांत आहे. मात्र या संधीचा लाभ त्यांनी करून घेतला पाहिजे.

## प्रकरण १७ वें

# शिक्षकांशीं हितगुज

विद्यार्थ्यांना उत्तम नागरिक बनविण्याचें कार्य सर्वस्वी शिक्षकाच्या हातीं आहे. शिक्षक ही एक मोठी शक्ति आहे. शिक्षक हेच पुढच्या पिढीला वळण लावतात, मार्गदर्शक होतात आणि नवे राष्ट्र उत्पन्न करतात. शिक्षकाची विद्वत्ता, वर्तन, भाषण आणि आचरण अशा सर्वांचे संस्कार विद्यार्थ्यांचे मनावर होतात विद्यार्थी शिक्षकाच्या देखरेखीखाली जरी पाचसहा तास असतात तथापि विद्यार्थ्यांच्या इतर वेळेवरसुद्धा शिक्षकांचें नियमन असतें. तात्पर्य शिक्षक हें एक नव्या पिढीच्या उन्नतीचें मोठें साधन असल्यामुळें त्यांच्याशी थोडें हितगुज येथें कर्तव्य आहे.

गुरुबद्दल आदर असण्याचे हल्ली कारणच उरलेले नाही पूर्वी गुरुशिष्यात ज्ञानाचे, वयाचें अंतर असे. गुरु निर्लोभ वृत्तीनें शिकवी. सांप्रत तर विद्येचासुद्धा बाजारच झाला आहे. शिकणारे पैसे देतात, शिकविणारे पैसे घेतात. सर्व काही पैशात असल्यामुळे गुरुचीही कदर राहिली नाही. धर्मासंबंधाची उदासीनता ही शिक्षक व पालक यात सारखीच आहे. नीति व तत्त्वज्ञान याविषयीं फारशी आस्था नाही. तेव्हा ना देवाची, ना पापपुण्याची भीति ना वडिलांविषयी आदर, ना गुरुबद्दल प्रेम ! अशा स्थितीत शिक्षक तरी बिचारे काय करणार असा प्रश्न केला जातो ही सर्व स्थिति गृहित धरूनच पुढील विवेचन केलें आहे

शिक्षक हा सत्प्रवृत्तीचा असावा, आपल्या विषयातील तज्ज्ञ असावा, कलोपासक असावा, त्याला विद्येची अभिरुचि व अध्यापनाची हौस असावी. शिक्षक चांगला उत्साही असला तरच शिक्षणाचे कार्य उत्साहानें होऊन मुलांच्यामध्यें उत्साह उत्पन्न होतो.

<u>शिक्षक व विद्यार्थी यांचें नातें पितापुत्रासारखें असतें.</u> शिक्षकाची योग्यता पित्याहून अधिक आहे. अत्यंत प्रेमानें विषय सुगम व सुलभ करून शिकविण्यामध्यें शिक्षकानें रगून गेलें पाहिजे. मुलाबरोबर

शिकावें व जांवयाच्या पंक्तीस जेवावें ही म्हण अर्थपूर्ण आहे. पण हल्ली शिक्षकच जर स्वत.च्या मुलांना शिकवीत नसतील तर इतराची गोष्ट कशाला ?

शिक्षक हे विद्यार्थ्यांना बहुतेक चांगले म्हणत नाहीत. गेल्या पिढीतील विद्यार्थी चागले व त्या मानानें आतांचे जरा कमी योग्यतेचे अशी समजूत बहुतेक शिक्षकांची असते. पण कालमान, ज्ञानाची वृद्धि आणि ज्ञानाची साधने यांकडे लक्ष दिल्यास असें दिसत आहे की शिक्षणशास्त्राचा विकास पूर्वपेक्षां अधिक होत आहे. आतां एवढें खरें की पूर्वीचे विद्यार्थी फार मर्यादशील असत. ते वडिलांचा व शिक्षकांचा मान चांगला ठेवीत. तितक्या आदरानें व विनयानें हल्लीचे विद्यार्थी हे वागत नाहीत. पण त्याची कारणे निराळी आहेत. असो !

शिक्षणाचें कार्य मोठें उदात्त, पवित्र असें आहे, अर्थात् हें कार्य करणाऱ्याची योग्यता व प्रतिष्ठा समाजात असली पाहिजे. पण 'मिळत नाही भीक तर पंतोजीपणा शीक' याप्रमाणें वाटेल ती माणसें, अनधिकारी माणसें धंदा म्हणून या क्षेत्रांत पडत आहेत व शिक्षणाचे पावित्र्य बिघडवीत आहेत. विद्याभिरुची व अध्यापनाची हौस ही जर शिक्षकांत नसतील तर शिक्षकाचा दर्जा वाढणार नाही व त्यांना मानही मिळणार नाहीं. उगाच रैमेडोके आणि अलबते गलबते असल्यानें जर शिक्षक होऊं लागले तर त्यामुळें शिक्षणही बिघडतें आणि विद्यार्थीही बिघडतात. आजची स्थिति संक्रमणाची असल्यामुळें फारसें बोलतां येत नसले तथापि, शिक्षणक्षेत्रात अपवित्रता उत्पन्न होण्यात राष्ट्राची मोठी हानि आहे हे स्पष्ट सांगितलें पाहिजे. हे ध्यानात ठेवून शिक्षकांनीं आपल्या हाती असलेली जी राष्ट्राची संपत्ति तरुणपिढी तिची फार काळजी घेतली पाहिजे.

समाजात आज शिक्षकाबद्दल पूज्यबुद्धि नाही, त्याना समाजांत मान नाही, भरपूर वेतनही मिळत नाही, पालकाचें सहकार्य असत नाही, उत्तेजन तर नाहीच नाही आणि विद्यार्थ्यांच्या मनावर शिक्षकाव्यतिरिक्त इतरांच्या मनाचा परिणाम अधिक म्हणून विद्यार्थ्यांकडूनही शिक्षकाचा आदर ठेवला जात नाही. या व अशा तऱ्हेच्या अनेक कागाळ्या शिक्षकाकडून ऐकू येतात, त्यांत बरेंच तथ्य आहे. पण शिक्षकांचा दर्जा वाढण्यास, पालकानी त्यांच्याशी

सहकार्य करण्यास आणि विद्यार्थ्यांमध्ये योग्य आदर उत्पन्न होण्यास योग्य यत्न शिक्षकाकडूनच व्हावयास पाहिजे.

शिक्षकांनी प्रथम शिक्षकाचे संघ स्थापन करुन शिक्षणशास्त्रावरील पुस्तकांचा संग्रह केला पाहिजे. शिक्षकाचे शिक्षणविषयक ग्रंथालय प्रत्येक मोठ्या शहरी पाहिजे आणि तेथे निरंतर विविध विषयावी आणि ते कसे शिकवावेत यांची चर्चा झाली पाहिजे. शिक्षकच जर स्वत. संघटित नसतील, विचार व कृति करण्याकडे ते जर दुर्लक्ष करतील तर पालकाचे सहकार्य मिळणें थोडे कठीणच पडेल. म्हणून प्रथमतः शिक्षकसंघाची प्रतिष्ठा व्हावी, नंतर प्रत्येक तालुक्याच्या गांवी आणि मोठ्या गावीं शिक्षक व पालक याचे संयुक्त संघ असावेत. महिन्यांतुन एकदां तरी दहापाच शिक्षक व दहापांच पालक यांनी जमून तरुणपिढीच्या शिक्षणाचा विचार केलापाहिजे. शिक्षकांचा संघटितपणा आणि शिक्षक व पालक यांची गट्टी जमली की विद्यार्थ्यांवरही आपोआप वचक बसतो. शिक्षकांनी पालकाना मुलांविषयी कोणती काळजी घ्यावी हे जसें सांगितले पाहिजे, तसेंच पालकांनीही शिक्षकाकडून आपण कोणत्या अपेक्षा करतों हेंही वरचेवर स्पष्ट केले पाहिजे. दोघाच्या सहकार्याने भावी पिढीचें शिक्षण उत्तम करणे हे ध्येय असावें. शिक्षक व पालक अशा या एक ध्येयावर सलग्न झाले म्हणजे शिक्षकांची पालकांविषयीची बेपर्वा आणि पालकाची शिक्षकांविषयींची तुच्छता आपोआप कमी होईल. विद्यार्थ्यांनाही आपले पालक आणि शिक्षक हे एकत्र जमतात, विचारांची देवघेव करतात, शिक्षणाविषयी अगत्य दाखवितात, असे समजले म्हणजे आज जो त्यांच्या ठिकाणी शिस्तीचा, विवेकाचा, विधायक गोष्टी करण्याचा, चांगल्या सवयी ग्रहण करण्याचा अभाव दिसत आहे तो हळूहळू कमी होईल. शिक्षक व पालक हे काही सर्व वातावरणाचे नियामक बनू शकत नाहीत हें खरें! कारण सिनेमा, नाटके, लघुकथा आणि अशा प्रकारची बाह्य परिस्थिति याचे संस्कार मुलांच्या मनावर होतात. तथापि हे संस्कार बदलण्याचा यत्न जरी अंशतः शिक्षक व पालक यांचेकडून झाला तरी तो हितप्रद होईल.

शिक्षकांनी आपलें ज्ञानदानाचें कार्य हे मोठ्या निष्ठेनें—तें देशकार्य आहे असे समजून—चालविलें पाहिजे. ज्ञान, कर्तृत्व, द्रव्य आणि सेवा अशा

रूपानें राष्ट्रांत परंपरा अखंड चालली पाहिजे. म्हणून शिक्षकानें आपल्या विषयाचा निरंतर निदिध्यास घेतला पाहिजे. शिक्षकांना स्वप्नेंसुद्धां अध्यापनाचीच पडावीत. विषयाचें पूर्ण आकलन झाल्याविना त्यांत सुगमता व सुलभता आणतां येत नाहीं. विषय सुगम, सुलभ असा करून तो थोडक्या वेळांत विद्यार्थ्यांच्या बुद्धींत उतरेल असें करणें हेंच खरें कौशल्य आहे. या मुळेंच तेजस्वी परंपरा चालते. शिक्षकानें विद्यार्थ्याला शिकविलें, तो दुसऱ्याला, दुसरा तिसऱ्याला शिकवितो व ज्ञानाचें असें सातत्य अखंड चालतें. प्रो. कर्वे यांनी प्रो. परांजपे यांना रँगलर केलें, त्यांनीं महाजनींना शिकविलें, त्यांनी अनेक विद्यार्थी पढविले; याप्रमाणें गणितशास्त्राचा जिवंतपणा महाराष्ट्रांत राहिला. शिक्षणाच्या प्रत्येक क्षेत्रांतील अशी परंपरा सारखी चालली पाहिजे. या परंपरेंत भर घालणें ही मोठी सेवा आहे असें शिक्षकांनी समजावें.

शिक्षकांच्या बाजूनें असें सांगितलें जाईल की, शिक्षकाना पोटापुरेसा पैसा मिळत नाहीं, त्याना स्वास्थ्य असत नाही, त्यांना प्रपंचाची गुजराण करण्याकरिता इतर अनेक जोडधंदे करावे लागतात आणि ते करण्यांत त्यांचा वेळ गेल्यानंतर हौस असूनही त्यांच्या हातून कर्तव्य पार पडत नाही. शिक्षकाचें म्हणणें मान्य करूनसुद्धां शिक्षकानीं अर्थ या विषयाकडे थोडें कमीच लक्ष द्यावें असें म्हणावेंसें वाटतें. कारण सर्व जगांतच शिक्षकाला पैसा कमी मिळतो. इंग्लंड, फ्रान्स, अमेरिका, या देशांतसुद्धां इतरांच्या मानानें शिक्षकांना पैसा कमी मिळतो. अलीकडे जपाननें मात्र प्राथमिक शिक्षकाना पगार भरपूर वाढविले आहेत, असें समजतें.

पैसा ही वस्तु अशी आहे की, त्याची हांव कधी संपतच नाहीं. मारगी वगवग व सारखी हांव ही काहीं मोठी चांगली नव्हे शिक्षकानें कोठें तरी रेषा मारलीच पाहिजे; आणि आपल्या हातीं असलेल्या तरुण पिढीच्या उन्नतीकडे सर्व लक्ष दिलें पाहिजे. हल्ली शिक्षक शाळांमध्ये फारसें शिकवीत नाहींत, तर रोज परीक्षा घेऊन हजेऱ्या भाडतात असा त्यांच्यावर आरोप आहे! वर्गांत मुलें पुष्कळ, अभ्यासाचे विषयही पुष्कळ! त्यामुळें शिक्षकांना प्रत्येक मुलाकडे एकेक मिनीट देण्यासही फुरसत मिळत नाहीं, मग ते बिचारे काळजीपूर्वक शिकविणार तरी काय? आणि शिकविण्याचें मनांत आणलें तरी उत्साह व शक्ति आणावयाची कोठून?

कांही शिक्षक किराणा मालाची दुकानें चालवितात, काही दुधाची दुकानें काढतात, काही शिकवण्या करतात, काही व्याजबट्टा करतात, तर कांही सकाळचा सर्व वेळ निराळ्या तऱ्हेच्या लेखनात घालवितात. रोज तीनचार तासाप्रमाणें अध्यापनाव्यतिरिक्त अशा विषयावर श्रम केले गेल्यास विद्यालयांतील अध्यापनाकडे नीटसें लक्ष लागत नाही. याचा परिणाम तरुण पिढीला भोगावा लागतो! शिक्षकानी स्वार्थ सोडावा, आपला प्रपंच सोडावा आणि सार्वजनिक उपाधी सोडाव्यात असें म्हणणें चुकीनें आहे. पण त्याबरोबरच शिक्षकानी कांही विद्यार्थी मी उत्तम तयार करीन, आदर्श माणसें मी निर्माण करीन अशी आकांक्षा धरली पाहिजे; मात्र त्याकरता द्रव्याची हाव थोडी कमी करावी लागेल. शिक्षक जर खरोखरीच त्यागी वृत्तीनें आणि कर्तव्यबुद्धीनें पुढच्या पिढीच्या शिक्षणाचें कार्य करतील तर आज अनेक शिक्षकांकडून वरिष्ठ अधिकाऱ्याच्या शिस्तीविरुद्ध जी तक्रार ऐकू येते, ती मुळीच येणार नाही, आणि शिक्षकाविषयी आदरही वाढेल.

शिक्षकांना पगार कमी मिळतो म्हणून आणि त्यांच्या प्रापंचिक गरजा वाढल्या आहेत म्हणून जोडधंदे करावे लागतात हे खरें. पण अध्यापनाशी विसगत असे धंदे करण्यापेक्षा शिक्षक जर विद्यार्थ्यांची वसतिगृहें ठिकठिकाणीं चालवितील तर धंदा या दृष्टीनें त्यांना प्राप्ति होऊन मुलानाही त्या संस्थेचा उपयोग होईल. हल्ली तालुक्याच्या ठिकाणी सुद्धां विद्यार्थी वसतिगृहाची आवश्यकता भासू लागली आहे. भोजनाचा खटाटोप न करताही मुलें नुसती एका ठिकाणीं राहावयास, खेळावयास, व अभ्यासास येऊं लागली तर त्याना एक प्रकारची शिस्त लावण्यास, व त्याचे ठिकाणीं सुसंस्कार उत्पन्न करण्यास पुष्कळ साहय होईल. मात्र शिक्षक हा उत्साही, होतक व या कामाची आवड असणारा असा पाहिजे.

शिक्षकाला मुलांचें मानसशास्त्र चांगलें अवगत पाहिजे. मुलांच्या ठिकाणीं अनेक नाजुक भावना वसत असतात. शिक्षकाच्या कठोर वर्तनानें त्याना धक्का बसला तर त्याचा अनिष्ट परिणाम मुलाच्या स्वभावावर होतो. शिक्षकांनी शाळेंतील जीवन व वातावरण अत्यंत उत्साही व सौंदर्यवर्धक ठेवण्याचा यत्न केला पाहिजे. मुलें शाळेंत असोत वा घरात असोत, त्यांच्या सर्व हालचालींकडे लक्ष ठेवून त्यांना सुधारणें हे आपलें कर्तव्य आहे असें

शिक्षकाला सारखें वाटलें पाहिजे. मुलांना वरचेवर टाकून बोलू नये, त्याच्या-वर उठल्या सुटल्या रागावूं नये, त्यांच्या स्वाभिमानास धक्का बसेल असें वागूं नये. प्रेमानें, ममताळुपणानें, आप्त म्हणून, जर शिक्षक मुलांशीं वागतील तर शिक्षकाबद्दल मुलांचे मनांत आदर खास वाढेल. मुलांच्या व्यक्तित्वाचा विकास आणि बौद्धिक संस्कारांचा विकास या दोन्ही गोष्टी महत्त्वाच्या आहेत. शिक्षकांनीं मुलांना शिस्त शिकवितांना तो गुण मुलांच्या ठिकाणीं स्वाभाविक येईल असें धोरण ठेवलें पाहिजे. मार देणें, कडकपणानें वागणें, भलत्या शिक्षा करणें यामुळें मुलें आंतल्या गाठीचीं, एकलकोंडीं आणि कोडगी बनतात. मुलांच्या स्वभावात नेहमी मोकळेपणा राहील आणि निर्भयता उत्पन्न होईल अशी वागणूक शिक्षकांनीं मुलाशीं ठेवली पाहिजे.

विद्यार्थ्यांमध्यें शिक्षकाची टिंगल उडविण्याची प्रवृत्ति पोरपणामुळें स्वाभाविक असते. परंतु थोडा प्रौढपणा येताच ती प्रवृत्ति कमी होते व सत्प्रवृत्त शिक्षकांच्या भजनी विद्यार्थी लागतात. तात्पर्य हें सर्व शिक्षकांचे हातीं आहे. शिक्षक व पालक जे करतील तें होईल. म्हणून शिक्षकांनी उदात्त दृष्टीने विद्यार्थ्यांच्या स्वच्छतेकडे, सवयीकडे, शीलाकडे, सद्गुणाकडे एकसारखी नजर ठेवली पाहिजे. शिक्षकाची स्वार्थी दृष्टि वाढली व अध्यापनाकडे दुर्लक्ष होऊं लागलें असें बहुतेक पालक म्हणतात. हा आरोप नष्ट करणें शिक्षकांचे हातीं आहे. प्रस्तुत या नवयुग विद्यार्थीधर्मामध्यें ज्या अनेक विषयांचा ऊहापोह संक्षेपतः केला आहे, त्या प्रत्येक विषयाचें सांगोपांग ज्ञान शिक्षकांस असावें. कारण येथें एका प्रकरणांत जो जो विषय मांडला तो तो एकेका ग्रंथाचा विषय आहे. अर्थात् बोलता चालता ग्रंथ म्हणजे शिक्षक होय ! स्वच्छता, व्यायाम, अन्न, वस्त्र, अभ्यास, ब्रह्मचर्य, प्रवास व स्वदेश-कार्य, शिष्टाचार अशा सर्व विषयांसंबंधी विद्यार्थ्यांना योग्य माहिती देणें व दिशा दाखविणें हें काम शिक्षकच करूं शकतात. असें कर्तव्य निरलसपणें होऊं लागल्यावर विद्यार्थी कृतज्ञतेनें शिक्षकांचे पुढें कां नमणार नाहीत ?

शिक्षकांनीं मुख्य गोष्ट ध्यानांत ठेवावी की राष्ट्रहिताचे दृष्टीनें विद्या, शील, सद्गुण, यांची जोपासना अत्यावश्य आहे. पैसा कांहीं पुरा पडत नाहीं व राहातही नाहीं. तेव्हां स्थिर राहणारें आणि राष्ट्रोद्धार करणारें असें कार्य आपल्या हातून ह्याच क्षेत्रांत होण्याचा संभव आहे. प्रत्येकाचें

कार्यक्षेत्र भिन्न असतें. परंतु त्या त्या क्षेत्रांत प्रत्येकाला पुष्कळ करितां येतें. तरुण पिढीवर उत्तम संस्कार करण्याचें ज्यांच्या हातांत आहे त्यांनी ते कार्य करुन मातृभूमीच्या ऋणातून मुक्त होणे हेंच उचित होय.

शिक्षक वर्ग हा समजस, सुज्ञ व जाणता आहे. त्यांना स्वत ला जें कळतें तेच येथें निवेदिलें आहे. जे विचार त्याना अस्वस्थ करितात, त्यानाच येथें वाचा फोडली आहे, हे शिक्षकांनी ध्यानांत घ्यावे म्हणजे गैरसमजाला जागा राहणार नाही.

---

## प्रकरण १८ वें

# उपसंहार

आतां या नव्या युगांतील विद्यार्थ्यांचा निरोप या प्रकरणात घ्यावयाचा. विद्यार्थ्यांनो, तुमच्या विद्यार्थीदशेचें व तारुण्याचें, विविध दृष्टीने महत्व काय आहे, हे पहिल्या प्रकरणांत सांगितलें. प्रत्येकाला आपले राष्ट्र प्रिय असतें, यात शंका नाही. पण या आपल्या भारतभूची धन्यता, उज्वलता व उदात्तता इतर राष्ट्रांपेक्षा कशी विशेष आहे, हे तुम्हाला दुसऱ्या प्रकरणावरुन कळलेंच. मनुष्यानें स्वत.चें निरीक्षण करावें, परिस्थितीकडे पाहावें, आपलें ध्येय ठरवावें, मानवी जीवित कशाकरता आहे हे पाहावें, याचें विवेचन करुन विद्यार्थ्यांनीं भारतभूच्या उद्धाराला साधक असेंच ध्येय ठरवावें असा विषय तिसऱ्या प्रकरणीं कथन केला. चौथ्या प्रकरणात कोणत्याही ध्येयाच्या आड जे मारक विचार मारेकऱ्यांसारखे दगा देतात त्याचा परामर्श घेतला. विद्यार्थ्यांनो, कोणतेंही ध्येय गांठण्याला, शक्ति, युक्ति, आणि शील ही साधनें अवश्य लागतात. साध्यानुसार साधनें हस्तगत केली पाहिजेत. त्यातील मुख्य साधनांचा विचार पाचव्या प्रकरणांत केल्यावर विद्यार्थीदशेंत जें जें कांही मिळवावयाचें तें अभ्यासानेच मिळतें, अभ्यास हा एक सूर्य आहे-

तो अखंड तळपत असतो हे योगवासिष्ठाधारें सहाव्या प्रकरणांत तुम्हांपुढें मांडले. सातव्या प्रकरणांत शरीर, मन, वाणी यांची शुचिता कशी राखावी, स्वच्छता कशी ठेवावी, यांचा विचार करून आठव्यांत अभ्यास कसा करावा, केव्हां करावा याचेंही दिग्दर्शन केलें. प्राणिमात्रांच्या जीवनाला लागणाऱ्या मुख्य वस्तू म्हणजे अन्न आणि वस्त्र! अन्नवस्त्राच्या बाबतीत विद्यार्थी परावलंबी असले तरी त्यांना अन्नाकडे कसें लक्ष्य देतां येईल व तसें करणें किती आवश्यक आहे याची कल्पना नवव्या प्रकरणांत दिली. दहावें प्रकरण तर तुमच्या आवडीचें, कारण त्यांत व्यायाम, खेळ, आणि झोप यांचाच अध्याय वाचला.

विद्यार्थ्यांनो, तुमचा हा ब्रह्मचर्याश्रम आहे. या आश्रमात शरीरपोषक द्रव्याची यातायात होऊं नये म्हणून तुम्ही किती जपलें पाहिजे, आहारविहारात कशी काळजी घेतली पाहिजे; याविषयी अकराव्या प्रकरणांत सूचना केल्या. बाराव्या प्रकरणांत घरीं व दारी कसें वागावें, शिष्टाचार कोणते पाळावेत, याची साधारणत: नोंद केली. सुटीमध्यें उगाच लोळत व आळसांत दिवस न घालवितां तिचा सदुपयोग कसा करून घ्यावा, हें तेरावें प्रकरणच तुम्हांला सांगेल! आज राष्ट्रांत अनेक देशकार्यें चालू आहेत, पुष्कळ माणसें कार्य करीत आहेत, पण अद्याप समाजांत राष्ट्रकार्यसाधक जी एक वृत्ति यावयास पाहिजे तिचा अभाव दिसतो. त्या वृत्तीची आवश्यकता चौदाव्या प्रकरणांत पटवून दिल्यानंतर प्रकरण पंधरामध्यें नवी नीति (रशियन नीति) जी धिंगाणा घालीत आहे, तिचा परामर्श घेऊन देव, धर्म, नीति आणि संस्कृति म्हणजे काय आहेत यांचें प्रवचन केलें.

विद्यार्थ्यांनो, तुम्हांला तुमच्या या नव्या युगाला उपयुक्त म्हणून जें जें सांगावयाचें ते अवश्य तेवढें सांगितल्यावर तुम्हांला साह्यभूत असणारे पालक व शिक्षक असे जे दोन घटक त्यांच्याही कानाशी प्रकरण सोळा व सतरा मध्यें मी लागलो आहे. मात्र त्यांच्याशी कानगोष्टीही केल्या नाहीत, किंवा त्याना कानपिचक्याही दिल्या नाहीत. तर त्यांच्याशीं केवळ हितगुज बोललों आहे.

माझ्या लहानपणीं ज्या गोष्टी मला समजल्या असत्या तर उत्तम झालें असतें असें मला वाटतें, आणि ज्या गोष्टी पुष्कळ शिक्षकांच्या मनें विद्या-

कार्यक्षेत्र भिन्न असते. परंतु त्या त्या क्षेत्रांत प्रत्येकाला पुष्कळ करितां येतें. तरुण पिढीवर उत्तम संस्कार करण्याचे ज्याच्या हातात आहे त्यानी ते कार्य करुन मातृभूमीच्या ऋणातून मुक्त होणें हेच उचित होय.

शिक्षक वर्ग हा समजस, सुज्ञ व जाणता आहे त्यांना स्वत ला जें कळतें तेंच येथें निवेदिले आहे. जे विचार त्याना अस्वस्थ करितात, त्यानाच येथें वाचा फोडली आहे, हे शिक्षकानी ध्यानात घ्यावे म्हणजे गैरसमजाला जागा राहणार नाही

---

## प्रकरण १८ वें

# उपसंहार

आतां या नव्या युगांतील विद्यार्थ्यांचा निरोप या प्रकरणात घ्यावयाचा. विद्यार्थ्यांनो, तुमच्या विद्यार्थीदशेचे व तारुण्याचें, विविध दृष्टीने महत्त्व काय आहे, हे पहिल्या प्रकरणात सांगितले. प्रत्येकाला आपले राष्ट्र प्रिय असतें, यांत शंका नाही. पण या आपल्या भारतभूची धन्यता, उज्वलता व उदात्तता इतर राष्ट्रांपेक्षा कशी विशेष आहे, हें तुम्हाला दुसऱ्या प्रकरणावरुन कळेलच. 'मनुष्याने स्वत.चें निरीक्षण करावे, परिस्थितीकडे पाहावे, आपलें ध्येय ठरवावे, मानवी जीवित कशाकरता आहे हे पाहावे, याचे विवेचन करुन विद्यार्थ्यांनी भारतभूच्या उद्धाराला साधक असेंच ध्येय ठरवावें असा विषय तिसऱ्या प्रकरणी कथन केला. चौथ्या प्रकरणात कोणत्याही ध्येयाच्या आड जें मारक विचार मारेकऱ्यासारखे दगा देतात त्याचा परामर्श घेतला. विद्यार्थ्यांनो, कोणतेंही ध्येय गांठण्याला, शक्ति, युक्ति, आणि शील ही साधनें अवश्य लागतात. साध्यानुसार साधने हस्तगत केली पाहिजेत त्यांतील मुख्य साधनांचा विचार पांचव्या प्रकरणात केल्यावर विद्यार्थीदशेंत जें जें कांही मिळवावयाचें तें अभ्यासानेच मिळते, अभ्यास हा एक सूर्य आहे.

तो अखंड तळपत असतो हें योगवासिष्ठाधारें सहाव्या प्रकरणांत तुम्हांपुढें मांडलें. सातव्या प्रकरणांत शरीर, मन, वाणी यांची शुचिता कशी राखावी, स्वच्छता कशी ठेवावी, याचा विचार करून आठव्यांत अभ्यास कसा करावा, केव्हां करावा याचेही दिग्दर्शन केलें. प्राणिमात्रांच्या जीवनाला लागणाऱ्या मुख्य वस्तू म्हणजे अन्न आणि वस्त्र! अन्नवस्त्राच्या बाबतीत विद्यार्थी परावलंबी असले तरी त्यांना अन्नाकडे कसें लक्ष्य देतां येईल व तसें करणें किती आवश्यक आहे याची कल्पना नवव्या प्रकरणांत दिली. दहावें प्रकरण तर तुमच्या आवडीचें, कारण त्यांत व्यायाम, खेळ, आणि झोंप यांचाच अध्याय वाचला.

विद्यार्थ्यांनो, तुमचा हा ब्रह्मचर्याश्रम आहे. या आश्रमांत शरीरपोषक द्रव्याची वाताहात होऊं नये म्हणून तुम्ही किती जपलें पाहिजे, आहारविहारांत कशी काळजी घेतली पाहिजे; याविषयीं अकराव्या प्रकरणांत सूचना केल्या. बाराव्या प्रकरणात घरीं व दारीं कसें वागावें, शिष्टाचार कोणते पाळावेत, याची साधारणतः नोंद केली. सुट्टीमध्यें उगाच लोळत व आळसांत दिवस न घालविता तिचा सदुपयोग कसा करून घ्यावा, हें तेरावें प्रकरणच तुम्हांला सांगेल! आज राष्ट्रांत अनेक देशकार्यें निघत आहेत, पुष्कळ माणसें कार्य करीत आहेत, पण अद्याप समाजांत राष्ट्रकार्यसाधक जी एक वृत्ति यावयास पाहिजे तिचा अभाव दिसतो. त्या वृत्तीची आवश्यकता चौदाव्या प्रकरणांत पटवून दिल्यानंतर प्रकरण पंधरामध्यें नवी नीति (रशियन नीति) जी धिंगाणा घालीत आहे, तिचा परामर्श घेऊन देव, धर्म, नीति आणि संस्कृति म्हणजे काय आहेत यांचें प्रवचन केलें.

विद्यार्थ्यांनो, तुम्हांला तुमच्या या नव्या युगाला उपयुक्त म्हणून जें जें सांगावयाचें तें अवश्य तेवढें सांगितल्यावर तुम्हाला साह्यभूत असणारे पालक व शिक्षक असे जे दोन घटक त्यांच्याही कानाशीं प्रकरण सोळा व सतरा मध्यें मी लागलों आहे. मात्र त्यांच्याशी कानगोष्टीही केल्या नाहीत, किंवा त्यांना कानपिचक्याही दिल्या नाहीत. तर त्यांच्याशी केवळ हितगुज बोललों आहे.

माझ्या लहानपणी ज्या गोष्टी मला समजल्या असत्या तर उत्तम झालें असतें असें मला वाटतें, आणि ज्या गोष्टी पुष्कळ शिक्षकांच्या मतें विद्या-

त्यांना व्यवहारांत कळल्या पाहिजेत असे आहे, त्या सर्व येथे सांगितल्या आहेत. ईश्वर करो व या भारतातील हे विद्यार्थी या नव्या युगाला तोंड देणारे असे होवोत ! ईश्वर करो व आमचे विद्यार्थी शेकडो वर्षे जगणारे, शेकडो वर्षे उपभोग घेणारे असे सर्व व शांत होवोत ! ईश्वर करो व विद्यार्थ्यांच्या हातून (भावी नागरिकांकडून) राष्ट्राला स्वातंत्र्य प्राप्त होवो ! अशी प्रार्थना करून हा ग्रंथ पुरा करतो.

। उत्तिष्ठत । जाग्रत । प्राप्य वरान्निबोधत ।



# पहाटे विद्यार्थ्यांनीं म्हणावयाचें प्रातःस्मरण

यं ब्रह्मावरुणेंद्ररुद्रमरुतः स्तुन्वंति दिव्यैः स्तवैः ।
वेदैः साङ्गपदक्रमोपनिषदैर्गायन्ति यं सामगाः ॥
ध्यानावस्थिततद्गतेन मनसा पश्यन्ति यं योगिनो
यस्यान्तं न विदुः सुरासुरगणा देवाय तस्मै नमः ॥ १ ॥
पृथ्वी सगन्धा सरसास्तथापः स्पर्शीच वायुर्ज्वलनः सतेजाः ॥
नमः सशब्दं महता सहैव कुर्वन्तु सर्वे मम सुप्रभातम् ॥

## स्वातंत्र्याची भूपाळी.

रक्ष रक्ष ईश्वरा भारता प्राचीना जनपदा ।
भोगियली बहु जयें एकदां वैभव सुख संपदा ॥ धृ० ॥
सगरद्वीपाहुनी सिंधु तो काश्मीरापासुनी ।
कृष्णकुमारीकडे शांतिचें राज्य देइ पसरुनी ।
प्रेमभाव धरुनिया पुत्र हे ऐक्य करुत झडकरी ।
कर्तव्या जागुनी करूं दे कर्तव्यें हीं खरीं ।
शाश्वत सत्य ज्ञानदिवाकर उगवो हृदयांतरीं ।
धर्मतेज देखुनी चकित हो देववृंद अंबरीं ।
गाढ तमीं बुडतसे राष्ट्र हें उद्बोधन या करी ।
कृपाकटाक्षें पुन्हां चढूं दे वैभवशिखरावरी ।
रोमरंध्रि चैतन्य खेळवी राष्ट्राच्या ईश्वरा ! ।
सात समुद्रांवरी फडकुं दे यशोध्वजा सुंदरा ।
हे पार्थ सारथे ! हे कंसारि विजयवंता ! ।
हे एकवचन रामा ! हे धनुर्धरानंता !

सोडि न यास विपदा हा काळ असे पडता।
आर्यपुत्र जरि अपात्र दिसले ध्याया स्वीया पदा।
रक्ष भारता सहायहीना ईशा! चिरसौख्यदा ॥ १ ॥
रक्ष रक्ष ईश्वरा भारता प्राचीना जनपदा।
भोगियली बहु जयें एकदां वैभव सुखसंपदा ॥

---

## विद्यार्थ्यांनीं प्रातःकाळीं व सायंकाळीं म्हणावयाचें

### वैदिक ईशस्तवन

१ ॐ विश्वतःश्चक्षुरुत विश्वतोमुखो विश्वतोबाहुरुत विश्वतस्पात्।
सं बाहुभ्यां धमति संपतत्रैर्द्यावाभूमी जनयन्देव एकः ॥
२ ॐ मयि मेधां मयि प्रजां मयीन्द्र इन्द्रियं दधातु।
मयि मेधां मयि प्रजां मय्यग्निस्तेजो दधातु।
मयि मेधां मयि प्रजां मयि सूर्यो भ्राजो दधातु ॥
३ ॐ सह नाववतु। सह नौ भुनक्तु। सह वीर्यं करवावहै
तेजस्वि नावधीतमस्तु। मा विद्विषावहै ॥
४ ॐ शृणुयाम शरदःशतम्। प्रब्रवाम शरदःशतम्।
अदीनाः स्याम शरदःशतम्। भूयश्च शरदःशतात् ॥
५ ॐ नन्दाम शरदःशतम्। मोदाम शरदःशतम्।
भवाम शरदःशतम्। अजीताः स्याम शरदःशतम् ॥
६ ॐ समानीव आकूतिः समाना हृदयानि वः।
समानमस्तु वो मनो यथा वः सुसहासति ॥

७ द्यौः शांतिरंतरिक्षंशांतिः पृथिवी शांतिरापःशांतिरोषधयः शांतिः। वनस्पतयः शांतिर्विश्वेदेवाः शांतिर्ब्रह्म शांतिः सर्वं शांतिः शांतिरेव शांतिः सा मा शांतिरेधि ॥

८ यन्तु नदयो वर्षन्तु पर्जन्याः सुपिप्पला ओषधयो भवन्तु । अन्नवतामोदनवतामामिक्षवताम् । एषाँ राजा भूयासम् । ओदनमुद्ब्रुवते परमेष्ठी वा एषः । यदोदनः । परमामेवैनँ श्रियं गमयति ।

## मराठी भावार्थ

१ ज्या परमेश्वराला सर्व बाजूला डोळे, तोंड, हात, पाय आहेत, (अर्थात् आपण कोणांस न कळत कांहीं केलें तरी ईश्वर तें पाहा-तोच)जो बाहूपासून स्वर्ग, पायापासून पृथिवी हीं उत्पन्न करितो तो स्वर्ग पृथिवी इत्यादिं सर्व जग उत्पन्न करणारा परमात्मा एकच आहे.

२ भगवान् इंद्र मला स्मरणशक्ति, मुलेंबाळें आणि इंद्रियसामर्थ्य देवो. भगवान् अग्नि मला स्मरणशक्ति, मुलेंबाळें व विचारशक्ति देवो. भगवान् सूर्य मला स्मरणशक्ति, मुलेंबाळें व तेजस्विता देवो.

३ परमात्मन् ! आम्हां गुरुशिष्यांचें रक्षण कर. दोघांसही ऐश्वर्य दे. दोघांकडून मोठे पराक्रम होऊं देत. आमचें ज्ञान तेजस्वी रहावें ; आणि आमच्यामध्यें नित्य प्रेमभाव राहो. हे परमेश्वरा ! सर्वदा शांति असो.

४ शंभर वर्षांच्या आयुष्यांत जगापासून आम्हांला ज्ञान प्राप्त होवो. शंभर वर्षांच्या आयुष्यांत आम्ही जगाला ज्ञान देत रहावें. शंभर वर्षांच्या आयुष्यांत आम्हांला कधीं दैन्य प्राप्त न व्हावें. किंबहुना शंभर वर्षांपेक्षां अधिक आयुष्य मिळून यांत अशाच गोष्टी व्हाव्या.

५ शंभर वर्षांच्या आयुष्यांत आम्हांस ऐश्वर्य मिळत असावें. शंभर वर्षांच्या आयुष्यांत आम्हांस सुख मिळत असावें. शंभर वर्षांच्या आयुष्यांत आप्तइष्ट, पुत्रपौत्र यांची समृद्धि व्हावी. शंभर वर्षांच्या आयुष्यांत आम्ही सर्वांपेक्षां सर्व गुणांत वरचढ व्हावें.

६ परमेश्वराची आज्ञा आहे की तुम्हां सर्वांचे विचार, बुद्धि व मन एकसूत्री राहूं देत. यामुळें तुमचा समाज एकजीव होऊन ऐश्वर्यवान् होईल.

७ द्युलोक, आकाश पृथ्वी औषधी, वनस्पति, विश्वांतील देव आणि सर्वत्र असणारें ब्रह्म या सर्वांमध्यें शांति, ( सुख, आनंद ) असावी व ती मला प्राप्त व्हावी.

८ पाऊस उत्तम पडो, नद्या भरून वाहोत. शेतें उत्तम पिकूं देत. सर्व प्रकारचें पौष्टिक अन्न आम्हांस रगड मिळावें, आम्ही अन्नाचे राजे व्हावें. अन्न हें फार थोर आहे, अन्न सर्वांचें पोषक आहे; तें मनुष्याला उत्कर्ष देतें.

## राष्ट्रगीत—॥ वंदे मातरम् ॥

सुजलां । सुफलां । मलयजशीतलाम् ।
सस्यश्यामलां मातरम् । वन्दे मातरम् ॥ धृ० ॥
शुभ्रज्योत्स्ना पुलकितयामिनीम् । फुल्लकुसुमितद्रुमदलशोभिनीम् ।
सुहासिनीं सुमधुर भाषिणीम् सुखदां वरदां मातरम् ॥ १ ॥ वन्दे०
त्रिंशत्कोटिकंठकलकलनिनादकराले। द्वात्रिंशत्कोटिभुजैर्धृतखरकरवाले
केवले मा तुमि अबले। बहुबलधारिणीं नमामि तारिणीम् ॥२॥ वन्दे
तुमि विद्या तुमि धर्म तुमि हृदि तुमि मर्म त्वं हि प्राणाः शरीरे ।
बाहु ते तुमि शक्ति, हृदये तुमि मा भक्ति, । तोमारइ प्रतिमा गडि
मंदिरे मंदिरे । त्वंहि दुर्गा दशप्रहरणधारिणी । कमला कमलदल-
विहारिणी । वाणी विद्यादायिनी नमामि त्वाम् । नमामि कमलां
अमलां अतुलाम् । सुजलां सुफलां मातरम् । श्यामलां सरलां
सुस्मितां भूषिताम् । धरणीं भरणीं मातरम् ॥३॥ वन्दे मातरम् ॥

---

# निवडक मराठी पुस्तकांची सूचनात्मक यादी

ही यादी अपुरी असली तरी कल्पना देण्यास समर्थ आहे. इंग्रजी व संस्कृत पुस्तकांची यादी विद्यार्थ्यांनीं याप्रमाणें शिक्षकांच्या साहृयानें करून घ्यावी, व तिचा उपयोग करावा.

### धार्मिक

(१) धर्मशास्त्रविचार (प्रो. काणे), (२) धर्मस्वरूपनिर्णय (कोकजेशास्त्री), (३) आनंदमीमांसा (लक्ष्मणशास्त्री जोशी), (४) धर्मशास्त्रमंथन (दिवेकरशास्त्री), (५) अस्पृश्यतेचा शास्त्रार्थ (पाठकशास्त्री), (६) हिंदुधर्मशिक्षण पु. १।२ (दिवेकरशास्त्री), (७) अनासक्तियोग (महात्मा गांधी), (८) गीतारहस्य (लो. टिळक), (९) ज्ञानेश्वरी, (१०) दासबोध, (११) समर्थसंजीवनी (पागारकर), (१२) भारत, भागवत व रामायण–मूळ अगर भाषांतर, (१३) दशोपनिषदे, (१४) आर्यांचे संस्कार (बापटशास्त्री), (१५) भारतीय तत्वज्ञान (केळकर), (१६) महाभारताचा उपसंहार (वैद्य), (१७) नवा आचारधर्म (कोकजे शास्त्री).

### निबंध, व्याख्यानें, लेखसंग्रह वगैरे

(१) अणेकृत लेखसंग्रह, (२) अस्पृश्यांचा प्रश्न, (माटे), (३) आधुनिक गीता (फडके), (४) गीता प्रदीप (दिवेकर), (५) ब्रह्मज्ञान व बुवाबाजी (दिवेकर), (६) इंदिरेस पत्रें (नेहरू, (७) विज्ञानबोध (प्रो. माटे), (८) गच्चीवरील गप्पा (चाफेकर), (९) गुजगोष्टी (फडके), (१०) निबंधमाला (चिपळूणकर), (११) जगांतील समाजक्रांति (डॉ. खैर), (१२) नीतिशास्त्रप्रवेश (वा. म. जोशी), (१३) प्रतिभासाधन (फडके), (१४) आमचा गांव, बदलापूर (ना. गो. चाफेकर), (१५) बातमीदार (टिकेकर), (१६) भारतीय समाजशास्त्र (केतकर) (१७) प्राचीन महाराष्ट्र (डॉ. केतकर), (१८) विवेकानंदाचे समग्र ग्रंथ, (१९) श्यामकांताची पत्रे, (२०) ज्ञानोपासना (बनहट्टी), (२१) सावरकर साहित्य, (२२) हिंदुत्व

(सावरकर), (२३) समाजसत्तावाद (गाडगीळ), (२४) इंद्रचें ... (पटवर्धन), (२५) ब्राह्मण व त्यांची विद्या (प्रो. गोळे), (२६) ... सारस्वत (भावे), (२७) स्वामी रामतीर्थांचे ग्रंथ, (२८) नागरिक नी (आळतेकर), (२९) राजपुत संस्कृति (देशपांडे), (३०) विश्वेचें शास्त्र (३१) हिंदुसमाज समर्थ कसा होईल? (दिवेकरशास्त्री), (३२) आर्य संस्कृतीचा उत्कर्षापकर्ष (दिवेकरशास्त्री), (३३) मानसमंदिर (प्रो फडके) (३४) आजकालचे तरुण स्त्री-पुरुष व त्यापुढील प्रश्न (फडके), (३५) कार्यक्षमता, (आठल्ये), (३६) ज्ञानकोश भाग १ ते ५.

## इतिहास

(१) मराठी रियासत भाग १।२।३।४ (सरदेसाई), (२) ... व इंग्रज (केळकर), (३) मुलाचा महाराष्ट्र (मोडक), (४) ... इतिहास (केळकर), (५) जगांतील क्रांतिकारक लढाया (ज. स. करंदीकर), (६) महाराष्ट्र देशांतील किल्ले भाग १ व २ (गोगटे), (७) पेशवेकालीन महाराष्ट्र (भावे), (८) आजचा रशिया, (९) अमेरिका (ना. ह. आपटे), (१०) आर्यांच्या सणांचा इतिहास, (त्रिवेदी), (११) कॉंग्रेसचा इतिहास, (१२) प्रतापगडचें युद्ध (कॅ. मोडक), (१३) मुसलमानी मुलखांतील मुशाफऱ्या (टिकेकर), (१४) भारतीय वीरकथा, (१५) महाराष्ट्राचा सांस्कृतिक इतिहास-पेंडसे, (१६) फिलिपाइनच्या स्वातंत्र्याचा इतिहास, (१७) राधामाधव विलासचंपु प्रस्तावना व इतर संकीर्ण लेख (राजवाडे).

## चरित्रें

(१) लो. टिळक (केळकर), (२) न्यायमूर्ति रानडे (फाटक), (३) दादाभाई नवरोजी (फडके), (४) विष्णुशास्त्री चिपळूणकर (चिपळूणकर), (५) महात्मा गांधी आत्मचरित्र, (६) पं. जवाहरलाल नेहरू आत्मचरित्र (गोरे), (७) नेपोलियन (भावे), (८) गॅरिबॉल्डी (केळकर) (९) जोसेफ मॅझिनी (जोगळेकर), (१०) डी व्हॅलेरा (फडके), (११) मॅक्स्विनी (फडके), (१२) काव्हूर (मुडले), (१३) कार्ल मार्क्स (मुरकुटे), (१४) नाना फडणीस (खरे), (१५) महादजी शिंदे (नातू), (१६) हरिभाऊ आपटे (वेणुबाई पानसे), (१७) बॅरिस्टर सावरकर आत्मवृत्त, (१८) नानासाहेब पेशवे (सरदेसाई), (१९) लाला लजपतराय (फडके),

२०) न्या. तेलग (आंबेकर), (२१) श्रीरामचरित्र (वैद्य), (२२) कृष्ण चरित्र (वैद्य), (२३) श्री रामकृष्ण परमहंस (परांजपे), (२४) नाथ (पांगारकर), (२५) आत्मवृत्त (कर्वे), (२६) आगरकर चरित्र गळतेकर), (२७) आर्यांचे धर्मदीप (तळवलकर), (२८) गोखले ारसनीस), (२९) पाश्चात्य पुरुषश्रेष्ठ (माटे), (३०) योगी अरविंद प (कुलकर्णी), (३१) पं. मालवीय (भिडे), (३२) लाला लजपतराय रमचरित्र, (३३) स्वभावचित्रें (दिवेकर), (३४) हेर हिटलर (नेने)

## कादंबऱ्या, गोष्टी व नाटकें

(१) हरिभाऊ आपटे यांच्या सामाजिक व ऐतिहासिक कांही कादंबऱ्या, २) नाथमाधव यांच्या शिवशाहीवरील कांहीं कादंबऱ्या, (३) चि. वा. ाप यांच्या पेशवाईवरील कादंबऱ्या, (४) विंध्याचल व गोविंदाची ोष्ट (परांजपे), (५) श्याममुंदर (कोल्हटकर), (६) धाकट्या सूनबाई मित्र), (७) ऐक्यांतच मौज, (८) मार्क्स रामायण (तुळजापूरकर), ९) जाईचा मंडप (डॉ.सावरकर), (१०) दुदवी रंगु, (११) पहाटेपूर्वीचा ाळोख, दिवाकर, दृष्टीस न पडणारी गोष्ट (ना. ह. आपटे), (१२) रागिणी, भिलेचा देव, इंदू काळे व सरला भोळे (वा. म. जोशी), (१३) जादुगार, ालन (फडके), (१४) दोन ध्रुव (खांडेकर), (१५) पश्चिम आघाडी- रील सामसूम, (१६) नवलपूरचा संस्थानिक (केळकर), (१७) मृत्यूच्या ाडीवर (भोपटकर), (१८) मुक्तात्मा, भगलेले देऊळ (माडखोलकर), १९) हिंदोळ्यावर (विभावरी), (२०) सुकलेले फूल, सदाफुली (देशपांडे), २१) आमची आई (साने गुरुजी), (२२) गोडू गोखले, धावता धोटा, वरेरकर), (२३) गांवसासू, परागंदा, ब्राह्मणकन्या (केतकर), (२४) ाच का धर्म? (मो. नाशिककर), २५ शून्य जगद् (पुरोहित), (२६) रेबियन नाइटस्, (२७) नवरत्नाचा हार (भोपटकर), (२८) दाजी ताम्हनकर), (२९) वायफळाचा मळा (चिं. वि. जोशी), (३०) जुना ाजार (कॅ. लिमये), (३१) मुदाम्याचे पोहे (कोल्हटकर), (३२) संपूर्ण ाळकराम, (३३) एकच प्याला (गडकरी), (३४) राजसंन्यास (गडकरी), (३५) श्री (कमतनूरकर), (३६) कीचकवध (खाडिलकर), (३७)

तोतयाचें बंड (केळकर), (३८) करीन ती पूर्व (वरेरकर), (३९) आग्र्याहून सुटका (औंधकर), (४०) संन्यस्त खड्ग (सावरकर).

इतर

(१) व्यायामज्ञानकोश (मुजुमदार), (२) दांडपट्टा, व कुस्ती (भोपटकर), (३) मयवंत, गिरीश, मायदेव, गडकरी यांचे काव्यग्रंथ, (४) कौटिलीय अर्थशास्त्र (भागवत), (५) ज्योतिर्विलास (शं. बा. दीक्षित), (६) आधुनिक सुशिक्षितांचा वेदांत (जोशी), (७) सुभाषित व विनोद (केळकर), (८) विनोद व महदाख्यायिका (चिपळूणकर), (९) लो. टिळकांच्या आठवणी व आख्यायिका भा. १।२ (बापट).